प्रतिगृ० प्रति० । दानसाङ्गतासिध्यर्थं इमां दक्षि० । अनेन वायनदानाख्येन कर्मणा श्रीलक्ष्मीनारायणौ प्रीयेताम् ॥

॥ प्रतिदिनं धर्मार्थउदकदानविधिः ॥

आचम्य देशका०र्थं उदकदानफलप्राप्तिद्वारा श्रीवसन्तमाधवप्रीत्यर्थं प्रतिदिनं मासपर्यन्तं ब्राह्मणगृहे उदकदानं करिष्ये । प्रथमदिने तदङ्गउदकपूरितघटपूजनं ब्राह्मणपूजनं च करिष्ये । उदकुम्भदेवताभ्यो नमः गन्धादिपूजां कृत्वा, विप्रं सम्पूज्य, वसन्तमाधवस्वरूपिणे ब्राह्मणाय इदमासनमित्यादिपूजां कृत्वा । स्वस्त्यस्तु, दीर्घं० । प्रत्यहं धर्मघटको वस्त्रं संवेष्टिताननः । ब्राह्मणस्य गृहे देयः शीतामलजलः शुचिः ॥ इदं उदकुम्भदानं अमुकशर्म० ब्राह्मणाय तु० । प्रतिगृ० प्रति० । अनेन श्रीवसन्तमाधवः प्रीयताम् । मासपर्यन्तं ब्राह्मणगृहे उदकुम्भाः देयाः । समाप्तिस्तु कृतस्य कर्मणः साङ्गतासिध्यर्थं तत्सम्पूर्णफलप्राप्तिद्वारा श्रीवसन्तमाधवप्रीत्यर्थं ब्राह्मणाय सोदकुम्भदानं करिष्ये । पूर्वसङ्कल्पस्थाने अयं सङ्कल्पः । शेषं पूर्ववत् ॥

॥ प्रपादानसङ्कल्पः ॥

आचम्य देशका० र्थं प्रपादानफलप्राप्तिपितृतृप्तिद्वारा पितृरूपिवसन्तमाधवप्रीत्यर्थं अद्यप्रभृति ( अमुकमास ) ( अथवा अमुकदिन ) पर्यन्तं ( यथाशक्त्योपचारेण ) प्रपादानं करिष्ये । स्थापितउदकुम्भेभ्यः गन्धादिना सम्पूज्य । अथ यथाशक्त्योपचारप्रकारः—प्रपा कार्या

च वैशाखे देवे देया गलन्तिका । उपानद्व्यजनच्छत्र-सूक्ष्मवासांसि चन्दनम् ॥ १ ॥ जलपात्राणि देयानि तथा पुष्पगृहाणि च । यानि कानि विचित्राणि द्राक्षारम्भाफलान्यपि ॥ २ ॥ ददाति यो हि मेषादौ सक्तू-नम्बुघटार्पितान् । पितॄनुद्दिश्य विप्राय सर्वपापैः प्रमुच्यते ॥३॥ वैशाखे यो घटं पूर्णं सभोज्यं वै द्विजन्मने । ददाति सुरराजेन्द्र स याति परमां गतिम् ॥ ४ ॥ प्रपादाने मह-त्फलम् ॥

॥ इति प्रातिवर्षिकपूजाकथासङ्ग्रहे

द्वितीयो भागः समाप्तः ॥



बी. के. शास्त्री द्वारा—
ज्योतिष प्रकाश प्रेस, विश्वेश्वरगंज, बनारस सिटी में मुद्रित ।
सन् १९३४ ई० ।

नमस्कारः—सूर्याचें उपस्थान नमस्कारपूर्वक करावयाचें असतें. नमस्कारांपासून शारीरिक व मानसिक ह्या दोन्ही प्रकारचे उपयोग आहेत. नमस्कार साष्टांग, ह्मणजे आंठ अंगें भुईस लागतील अशा रीतीनें घातले पाहिजेत. दोन पाय, दोन हात, दोन गुडघे, ऊर व मस्तक मिळून आठ अंगें होतात. हीं आठ अंगे मोजण्याची पद्धत कित्येक लोकांची निराळी आहे ती अशीः—

उरसा शिरसा दृष्ट्या मनसा वचसा तथा।
पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यां प्रणामोऽष्टांग उच्यते ॥

या पद्धतींत दोन्ही पाय, दोन्ही हात व दोन्ही गुडघे हीं एक एक याप्रमाणें तीनच अंगें मानिलीं आहेत. हीं तीन, आणि ऊर व मस्तक हीं दोन मिळून पांच अंगें नमस्कार घालतांना भुईस लावावयाचीं आणि दृष्टि इष्टदेवाकडे लावावयाची, मनानें त्याचें ध्यान करावयाचें व तोंडानें त्याचें नामोच्चारण करावयाचें. अशा रीतीचा हा आठ अंगांनीं युक्त नमस्कार वरील श्लोकांत सांगितला आहे. असे नमस्कार प्राणायामा प्रमाणे हळु हळू वाढवीत गेल्यास शरीरास चांगलाच व्यायाम होतो व ध्यानामुळें चित्तशुद्धि होते. विद्यार्थ्यांस बाल्यावस्थेपासूनच ही संवय लावल्यास पुष्कळ फायदा होईल.×

होमः—दररोज सकाळीं सौरसूक्तांनीं सूर्याचें व प्रजापतिसूक्तांनीं प्रजापतीचें उपस्थान करावें, आणि सायंकाळीं अग्निसूक्तांनीं अग्नीचें व प्रजापतिसूक्तांनीं प्रजापतीचें उपस्थान करावें. हा विधि सूत्रकालापासून चालत आला आहे. या होमांत सूर्याची, अग्नीची व प्रजापतीची स्तुति करून त्यास आहुति द्यावयाच्या असतात. या देवतांचा नामनिर्देश जरी निरनिराळा केला आहे तरी वस्तुतः तीं सर्व एकाच परमात्म्याची नांवें आहेत असेंही या स्तोत्रांतच सांगितलें आहे. उदाहरणार्थ—

" एकं सद् विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः। "

या मंत्रावरील सायणाचार्यांच्या टीकेंत शेवटीं खालीं लिहिलेलें तात्पर्य दिलें आहेः—

' अमुमेवादित्यमेकमेव वस्तुतः संतं विप्रामेधाविनो देवतत्वविदो बहुधा वदंति तत्तत्कारणेनेन्द्राद्यात्मानं वदन्ति.।'

---

× नमस्कार घालण्याची पद्धत रा. रा. द. चिं. मुजुमदार यानीं व्यायाम मासिकाच्या सप्टेंम्बर १९१६ च्या अंकांत विस्तृतपणें वर्णिली आहे, व चित्रें देऊन स्पष्ट केली आहे. ती सर्वांनीं अवश्य वाचावी.

कारणपरत्वें नांवें निरनिराळीं देण्यांत आलीं तरी तत्ववेत्ते परमेश्वर एकच आहे हें पूर्णपणें जाणतात. एकत्वाचा हा उल्लेख आपल्या प्राचीन ग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतो असें असून, भिन्न भिन्न धर्मपंथांचे अनुयायी विनाकारण तंटे माजवितात ही गोष्ट शोचनीय आहे.

**नित्य दानः**—परोपकारबुद्धि सतत जागृत रहावी यासाठीं नित्यदान व अतिथिपूजन हीं कृत्यें आन्हिकांत सांगितलीं आहेत. दान करावयाचें तें अर्थात् यथाशक्ति व सत्पात्रीं केलें पाहिजे.* याज्ञवल्क्यस्मृतींत ह्मटलें आहे कीं,

> **गोभूतिलहिरण्यादि पात्रे दातव्यमर्चितं ।**
> **नापात्रे विदुषा किंचिद् आत्मनः श्रेय इच्छता ॥**
> **न विद्यया केवलया तपसा वापि पात्रता ।**
> **यत्र वृत्तमिमे चोभे तद्धि पात्रं प्रकीर्तितम् ॥**

**अर्थः**—पूजा करून गाई, भूमि, तीळ, सोनें इत्यादि पदार्थ सत्पात्र मनुष्यास द्यावे. आपलें हित इच्छिणाचा सुजाण मनुष्यानें कुपात्रीं दान करूं नये. केवळ विद्येनें, अगर तपानेंच मनुष्याचे अंगीं पात्रता येत नाहीं; हीं दोन्ही असून त्यास सद्वर्तनाची जोड असली तरच अंगीं पात्रता येते.

वरील तत्व दान देणारांनीं व घेणारांनीं दोघांनींही सदोदित लक्षांत ठेवणें अवश्य आहे. जो मागावयास येईल त्यास भिक्षा घालण्याची प्रवृत्ति आपल्या लोकांत हल्लीं इतकी वाढली आहे कीं, तिला आळा घातला तरच आळशी, दुर्वर्तनी व निरुद्योगी माणसांची संख्या कमी होऊन राष्ट्रीयसंपत्तीचा ऱ्हास होत आहे तो बंद होईल.

**पूजाः**—उपचारयुक्त पूजाविधि वेदांत अगर गृह्यसूत्रांत नाहीं. मंत्रानीं देवतांची स्तुति व प्रार्थना करणें हीच वेदकालीन पूजा. सूत्रकालांत पूजा होमयुक्त झाली, आणि त्यानंतर ह्मणजे स्मृति व पुराणांच्या कालीं ह्या पूजेस मूर्तस्वरूप आलें. हल्लीं पूजेचे कोणी पांच तर कोणी दहा, कोणी सोळा तर कोणी अडतीस उपचार मानतात. ध्यान, आवाहन, नैवेद्य, निराजन व प्रणाम हे पांच उपचार जाबालीनें सांगितले आहेत. **ज्ञानमालेंत** दशोपचार पूजा, षोडशोपचार पूजा व अष्टत्रिंशदुपचार पूजा यांचे विधि सांगितलें आहेत. हल्लीं प्रायशः षोडशोपचार पूजेचा प्रघात असल्यामुळें त्या प्रकारांचा आपण विचार करूं. नागदेवानें खालीं लिहिल्याप्रमाणे षोडशोपचार सांगितले आहेतः—

---

* **दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे । देशे कालेच पात्रेच तद्दानं सात्त्विकं स्मृतं ॥**

आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् ।
स्नानं वस्त्रोपवीते च गंधमाल्यादिभिः* क्रमात् ॥ १ ॥
धूपं दीपं च नैवेद्यं नमस्कारं प्रदक्षिणाम् ।
उद्वासनं षोडशकमेवं देवार्चने विधिः ॥ २ ॥

हे उपचार ' यथा देहे तथा देवे ' ह्मणजे ज्याप्रमाणें मनुष्याची त्याचप्रमाणें देवाची पूजा करावी, या कल्पनेनें परमेश्वरास एक सन्माननीय महापुरुष मानून योजिले आहेत. या सोळा उपचारांचा क्रम खालीं लिहिल्याप्रमाणें:--

१ आवाहन—इष्टदेवास बोलावून आणणें.

२ आसन—बसावयास आसन देणें.

३ पाद्य—त्याचे पाय धुणें.

४ अर्घ्य—गंध, पुष्प, अक्षता इत्यादि पदार्थांनीं मिसळलेलें पाणी सत्कारासाठीं देणें.

५ आचमनीय—तोंड धुण्यास पाणी देणें.

६ स्नान—आंघोळ घालणें.

७ वस्त्र—आच्छादनासाठीं वस्त्र देणें.

८ यज्ञोपवीत—जान्हवें घालणें.

९ गंध—चंदनादि सुवासिक द्रव्यांचें अनुलेपन करणें.

१० पुष्प—सुवासिक फुलें वाहणें.

११ धूप—वासासाठीं धूप जाळणें.

१२ दीप—दिवा लावणें.

१३ नैवेद्य—खाण्याचे पदार्थ देणें.

१४ नमस्कार—पायां पडणें.

१५ प्रदक्षिणा--उजव्या बाजूकडून सभोंवतीं फिरणें.

१६ विसर्जन अथवा उद्वासन—रजा देणें.

---

* अदेशकाले यद्दानं अपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतं ॥
( भ० गीता, अ० १७ ).

असे हे पूजेचे सोळा उपचार सांगितलें आहेत. विसर्जनाचे ऐवजीं मंत्रपुष्प हा उपचार कित्येक निबंधकारांनीं सांगितला आहे.

षोडशोपचार पूजा अगर सगुणोपासना सुरु होण्याचें कारण मनुष्याच्या मनाची नैसर्गिक दुर्बलता हें होय. तंत्रकारांनीं पूजादिक कर्मकांडाचें बरेंच स्तोम माजविलें तथापि तंत्रग्रंथांतही मानस पूजा न करतां बाह्योपचारांनीं देवाची पूजा करणें ही गोष्ट अगदीं कनिष्ठ दरज्जाची मानली आहे. महानिर्वाणतंत्रांत ह्मटलें आहे कीं, सर्व वस्तूंत आपोआप ब्रह्म दिसणें ही मनाची उत्तम स्थिति, ध्यान करणें ही मध्यम स्थिति, मंत्रजप करणें ही कनिष्ठ स्थिति व बाह्योपचार पूजा करणें ही त्याहूनही कनिष्ठ स्थिति होय.+ असें जरी आहे तरी पण तंत्रकारांनीं मूर्तिपूजेचें प्रतिपादन केलें आहे. व ह्याचें कारण असें सांगितलें आहे कीं, ब्रह्मज्ञान संपादन करणें हेंच मनुष्य मात्रांचें अंतिम साध्य आहे व तें मिळविण्याचे मार्ग तीन प्रकारचे आहेत. १ श्रवण, मनन, निदिध्यास, २ योगाभ्यास, ३ कर्म, योग व ज्ञान ह्या त्रयींचें भक्तीयुक्त साधन. ह्या तीन मार्गां पैकीं शेवटचा मार्ग सर्वांत सोपा आणि सर्व वर्गांच्या साधकांस सुसाध्य आहे. म्हणून तो सर्वांनीं स्वीकारण्यांस योग्य आहे; कारण कीं सामान्य लोकांच्या मनाची स्थिति उच्च दशेस पोहोचलेली नसते व त्यांस निराकार स्वरुपाचें आकलन होणें अशक्य असते, या साठीं त्यांच्या मनास स्थिरता येण्या करितां साकार मूर्तींची शास्त्रकारांनीं योजना केलेली आहे.* व त्या मूर्तींची उपासना करणें तीच सगुणोपासना अर्थात् षोडशोपचार पूजा. गृह्यसूत्रानंतर कांहीं कालानें गृह्यपरिशिष्ट रचण्यांत आलें त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे.

' केचिद् गणपतिमादित्यं शक्तिमच्युतं शिवं पंचकमेव वाहरहर्यजंते तानप्सु वाग्नौ वा सूर्ये वा स्वहृदये वा स्थण्डिले वा प्रतिमासु वायजेत । '

( आ. गृ. प. २, १० ).

**अर्थः**--कित्येक लोक गणपति, सूर्य, देवी, विष्णु, अथवा शिव अगर या पांचहि देवतांचें दररोज यजन करतात व त्यांस आहुति द्यावयाच्या त्या पाण्यांत, अग्नींत, सूर्याकडे, आपल्या हृदयाकडे, स्थण्डिलांत अथवा प्रतिमांकडे उद्देशून देतात.

---

+ Principles of Tantra by Arthur Avalon, Part 11 Page 211.

* Principles of Tantra by Arthur Avalon, Part II, Page 163.

ह्यावरून असें दिसतें कीं, गृह्यपरिशिष्टाचे काळीं प्रतिमापूजा सुरु झाली होती परंतु ती लोकांत दृढ नव्हती. पूजेच्या बाकीच्या प्रकारांबरोबर प्रतिमापूजा हाही एक प्रकार मानिला जात असे.

वर लिहिलेल्या कारणां शिवाय मूर्तिपूजा प्रचलित होण्याचें दुसरें कारण ह्मटलें ह्मणजे बौद्धधर्माचा प्रसार हें होय. बौद्धधर्मांत गुरुपादुकापूजनाची पद्धत निघाली व जैनधर्मांत तीर्थंकरांचीं मंदिरें बांधण्याचा प्रघात पडला आणि त्या धर्माच्या प्रसारामुळें वैदिक धर्मास ग्लानि आली, व त्यांतील मूलतत्त्वें बाजूस राहून बौद्ध व जैन पद्धतींचें अनुकरण व्हावयास सुरुवात झाली. त्यामुळें मूर्ती स्थापून त्यांची मंदिरें वैदिक धर्माच्या अनुयायांनीं बांधिलीं व उपचारयुक्त पूजाविधिही प्रचारांत आणला. शिव, विष्णु, शक्ति, गणपति, राम, इत्यादि निरनिराळ्या इष्ट देवतांचे पंथ स्थापले गेले, व त्यामुळें आपापसांत तंटे भांडणें सुरू झालीं. निरनिराळ्या देवता ह्मणजे एका ईश्वराच्याच भिन्न भिन्न विभूती होत, असें प्राचीन ऋषि कंठरवानें पदोपदीं सांगत आले. परंतु हें मूलतत्व लोक विसरले, व भेदभाव विनाकारण जास्त जास्त वाढत गेला. विष्णुसहस्रनामानें विष्णूची पूजा केली ह्मणून विष्णु हजार होत नाहींत, ह्या साध्या गोष्टीकडे लोकांचें दुर्लक्ष झालें. ज्या शास्त्रकारांनीं पंचायतनपूजेची योजना केली, त्यांचा हेतु, भेदभाव नाहींसा होऊन ऐक्य कायम रहावें हाच असला पाहिजे, कारण कीं, मूर्तिपूजेच्या त्या वेळच्या निरनिराळ्या पंथांच्या देवता ह्मणजे रुद्र (शिव), विष्णु, देवी, सूर्य व गणपति एकत्र मांडून त्यांची पूजा करण्याविषयीं त्यांनीं सांगितलें आहे.+ आज Theosophic Society, Neo—Vedantic School वगैरे मंडळ्या जें काम करीत आहेत त्याचा कित्ता कैक वर्षांपासून आपल्या पूर्वजांनीं आपणांस दररोजच्या विधींतच घालून दिला आहे. आपण मात्र मूळ हेतु विसरून बाह्य चिन्हांसच चिकटून रहात आहोंत. वास्तविक पाहतां वस्तु एकच, पण नांवें अनेक असें असतां नांवें अनेक ह्मणून वस्तूही अनेक, अशीं भ्रांतिमूलक कल्पना उत्पन्न झाली. भेदभावना तीव्र झाली, व धर्माचार्य म्हणविणाऱ्या कित्येक आधुनिक स्वार्थसाधूंनीं अनेक प्रकारचे नामटिले, कंठ्या, कफन्या वगैरे बाह्य चिन्हांनीं या भावनेस

---

+ सूर्य अथवा सविता म्ह० उत्पन्न करणारा, विष्णु म्ह० पालन करणारा, रुद्र म्ह० संहार करणारा, अर्थात् रजस्, सत्व व तमस् ह्या गुणांचे दर्शक. पुरुष व प्रकृति ह्यां पैकीं पुरुषाचे हे गुण झाले, व प्रकृति ह्मणजे देवी. आणि गणपति ह्मणजे ॐकाररूपी सर्वव्यापी ब्रह्म. गणपतीचा आकार ॐ सारखा आहे.

पुष्टि दिली. हल्लीं Theosophic Society सारख्या मंडळ्यांनीं धर्माच्या बाबतींत क्षमाशील वृत्तीचा प्रसार करून या भेदभावनेस आळा घालण्याचे प्रयत्न चालविले आहेत तेणें करून तरीं आपण जागे होऊं या !

**पंचमहायज्ञः**—गृहस्थाच्या घरीं पांच ठिकाणीं न कळतही जीवजंतूंची हिंसा घडते. १ चूल. २ पाटा वरवंटा, जाते वगैरे, ३ केरसुणी, कुंचा वगैरे झाडलोट करण्यांचीं साधनें, ४ उखळ, मुसळ, खलबत्ता, वगैरे कांडण्याचीं साधनें आणि ५ घडा, हंडा वगैरे पाणी ठेवण्याची भांडीं, ह्या पांच ठिकाणीं हिंसा घडते. ह्या पांच ठिकाणच्या हिंसेस ‘ पंचसूना ’ अशीं संज्ञा मन्वादिक शास्त्रकारांनीं दिली आहे. व ह्या पांच प्रकारच्या हिंसेच्या प्रायश्चित्तासाठीं प्रतिदिवशीं पंचमहायज्ञ करावे असा विधि सांगितला आहे. प्राचीनकाळीं पंचयज्ञविधि अगदीं साधा होता. पुढें पुराणांतरीं प्रत्येक गृहस्थाच्या माथीं ही पांच प्रकारचीं ऋणें आहेत असें सांगितलें आहे. हल्लीं प्रचलित असलेला विधि ब्रह्मयज्ञतर्पण व वैश्वदेव, बलिहरण या प्रकरणांत विस्तृत प्रकारें दिला आहे ( पहा पा. १७४ ते २०३ ) देवतांचें अर्चन करणें, प्राचीन ऋषि आचार्य आणि आपले पितर यांचें आदरयुक्त स्मरण करून तर्पण करणें, अतिथिसत्कार करणें, जीवजंतु आदि करून सर्व प्राणिमात्रांस बलिदान करणें, आणि वेदशास्त्रपुराणादिक ग्रंथांचें अध्ययन करणें, हें या पंचमहायज्ञाचें तात्पर्य आहे. या विधींत–धार्मिक सेवा ( religious service ) व सामाजिक सेवा ( Social Service ) व अध्ययन ( Education ) अर्थात्–आपल्या संसारांत अत्यंत महत्वांच्या अशा तत्वांचा समावेश केला आहे.

**सायंविधिः**—पंचमहायज्ञ केल्यावर देवांस महानैवेद्य दाखवून अतिथीस बरोबर घेऊन भोजन करावें, व तांबुलादि ग्रहण करावें. त्यानंतर संध्याकाळीं बाहेर फिरावयास जाऊन इष्टमित्रांस भेटावें व शास्त्रोक्त सायंविधि, अर्थात् सायंसंध्या, दीपविधि व सायंहोम करावे. मग रात्रीं भोजन करून रात्रिदेवतेची आपल्या संरक्षणाविषयीं प्रार्थना करून झोपीं जावें. वाईट स्वप्न पडल्यास कालरात्रिदेवतेची पूजा करून शांति करावी, असें शौनक सांगतो.

वेदाचा अधिकार.

७. वर जे विधि सांगितले आहेत ते द्विजांचे म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांचे आहते. गुणकर्मविभागाप्रमाणें ह्या तीन वर्णांची सेवा करणारा नोकर वर्ग म्हणजे शूद्र यांचे साठीं हेच विधि पण ते निराळ्या प्रकारानें सांगितले आहेत. प्राचीनकाळीं शूद्र हे

आर्य जातीच्या बाहेरचे असल्यामुळें ते असंस्कृत होते व वेदांचा अर्थ त्यांस समजत नसे. यासाठीं त्यांस वेदाधिकार नव्हता. अर्थात् वेद समजण्याची त्यांस शक्ति नव्हती. वेद म्हणण्याचा अगर ऐकण्याचा त्यांस हक्क नव्हता अशी प्राचीन काळची समजूत नव्हती. ज्यांनीं मेहेनत करून वेद समजण्याची शक्ति संपादन केली त्यांस ब्राह्मणत्व प्राप्त झाल्याबद्दल, व ऋषींनीं त्यांस आपल्यांत घेतल्याबद्दल उपनिषदांत सत्यकामजाबालादिकांच्या कथा आहेत. परंतु पाठीमागून जातिभेदाचे पडदे जाड झाले व ज्या अर्थीं वेद समजण्याची शक्ति आर्येतरांस सामान्यतः नव्हती त्याअर्थीं त्याज पैकीं कोणासच वेद शिकण्याचा अगर ऐकण्याचा हक्क नाहीं अशी भ्रांतिमूलक कल्पना उत्पन्न झाली व स्मृतिपुराणांच्या कालीं तीं रूढ झाली. ज्ञान सत्राचे दरवाजे प्रस्तुत कालीं सर्वांस सारखे मोकळे आहेत, कालेजांत जाऊन सर्वांस वेदाध्यन करतां येतें. अशा समयीं वेदाधिकाराबदलची ही समजूत सुशिक्षित लोकांस पटत नाहीं यांत नवल तें काय? असो!

शूद्रांचे आह्निकविधि.

८ ह्या रुढीस अनुसरून शूद्रांस वेदाधिकार नाहीं ह्मणून शास्त्रकारांनीं त्यांचे साठीं सर्व प्रकारच्या धर्मकृत्यांत भेद केला आहे. कमलाकरभट्टानें शूद्रधर्मतत्वप्रकाश नांवचा ग्रंथ रचिला आहे. त्यांत शूद्रांच्या कर्माविषयीं शास्त्र व प्रयोग सांगितले आहेत. हा कमलाकरभट्ट ह्मटला ह्मणजे हिंदुपदपातशाहीची स्थापना करणारे जे शिवाजी महाराज त्यांस ज्यानें शास्त्रोक्त रीतीनें राज्याभिषेक केला त्या प्रसिद्ध काशीकर गागाभट्टांच्याच घराण्यांतला होय. त्यानें हा ग्रंथ विक्रम सं. १६७९ च्या सुमारास रचला; तो शूद्रकमलाकर या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या ग्रंथांत शूद्रांसाठीं वैदिकमंत्रांच्या ऐवजीं पौराणिक मंत्र दिले आहेत व वेद, ब्राह्मणें, आरण्यकें इत्यादींच्या अध्ययनाचे ऐवजीं त्या त्या ग्रंथाचें नांव घेऊन त्यांस नमस्कार करावा असें लिहिलें आहे. हा भेद खेरीज करून शूद्रांनींही वरील सर्व आह्निकविधि दररोज करावे असें सांगितलें आहे.

हल्लींची परिस्थिति.

९. आपल्या आह्निक विधींची ही मालिका अशी लांबलचक आहे व हल्लींच्या विकट जीवनार्थकलहाच्या काळीं ती बरीच दुस्साध्य वाटेल. प्राचीनकाळीं सर्वांस हीं कृत्यें दररोज आचरणें प्राप्त होतें व त्याप्रमाणें त्या सुखीं व स्वल्पायासाच्या कालांत ते आचरीतहि असत. दक्षस्मृतींत सांगितलें आहे कीं, दिवसाचे (१२ तासांचे) आठ भाग करून पहिल्या भागांत पूजाविधिपर्यंतचा सर्व विधि आटपून घ्यावा; व दुसऱ्या भागांत वेदाभ्यास,

व तिसऱ्या भागांत धनसंपादन करावें; अर्थात् हल्लीं ज्या कामासाठीं प्रायः प्रत्येक इसमास तासांचे तास खपावें लागतें त्या कामासाठीं, ह्मणजे धनसंपादना साठीं, प्राचीन आह्निक कृत्यमालिकेंत अवघा दीड तास ठेविला आहे. हल्लीं एवढ्या वेळांत धनसंपादन करणें अशक्यच आहे असें सामान्यतः ह्मणण्यास हरकत नाहीं. हिंदुस्तानांत प्राचीनकाळीं जीवनार्थकलह हल्लींच्या सारखा तीव्र नव्हता ही गोष्ट आतां सर्वमान्य आहे. युरोप, अमेरिका इत्यादि देशांतील पाश्चात्य राष्ट्रांशीं आमचा निकट संबंध जडून आल्यामुळें जे आमचे कांहीं फायदे झाले त्यांच्या बरोबर जीवनार्थ जास्त परिश्रम करावे लागणें ही गोष्टही साहजिकच प्राप्त झाली आहे. त्यामुळें सदरहु आह्निककर्मांची लांबलचक यादी दुष्कर वाटणें स्वाभाविक आहे. मुंबई सारख्या मोठ्या शहराच्या आजूबाजूच्या गांवीं राहून रेल्वे मार्गें आपल्या धंद्यासाठीं शहरांत दररोज जाऊन येणाऱ्या माणसांस तर हीं कृत्यमालिका ह्मणजे अशक्य गोष्टींची एक कहाणीच आहे असें वाटल्यास नवल नाहीं. यासाठीं प्रस्तुतकाळीं ह्या लांबचलांब यादींत योग्य प्रकारें छाटणी करून तिला हल्लींच्या काळास अनुरूप असें संक्षिप्त पण व्यवहार्य स्वरूप देणें अवश्य आहे. शरीराच्या आरोग्यासाठीं व अंतःकरणाच्या शुद्धीसाठीं ज्या गोष्टी अवश्य आहेत त्या कायम ठेवून बाकीच्या आनुषंगिक गोष्टींस फांटा दिल्यास वावगें होणार नाहीं. व्यवहारांत जो तो मनुष्य आपआपल्या सवडी प्रमाणें आपद्धर्म ह्मणून साधारणतः अशा प्रकारची छाटणी करीतच असतो. परंतु दुःखाची गोष्ट हीं कीं, हा सर्व नित्यकर्मांचा क्रम सरसहा अशक्य गोष्टींच्या सदरांत ढकलून पुष्कळ लोक मोकळे होतात. त्यामुळें योग्यायोग्यतेचें विवेचन न होतां धर्माची अवनति होत आहे. लोकांच्या पुढाऱ्यांनीं व विशेषेंकरून धर्माचार्यांनीं या विषयाकडे लक्ष देणें अवश्य आहे. ह्या प्रश्नाचा विचार करण्या करतां प्राचीन काळापासून आजपावेतों आह्निक कृत्यांचें कसकसें स्थित्यंतर होत आलें आहे तें पाहूं.

आह्निककृत्यांची ऐतिहासिक वृद्धि.

१० वैदिककालीं ह्मणजे इसवीसना पूर्वीं सुमारे ४००० वर्षांमागे आपले पूर्वज आर्यावर्तांत ह्मणजे हिंदुस्थानच्या वायव्य प्रदेशांत रहात असतां ते ईश्वराच्या निरनिराळ्या विभूति, अर्थात् सूर्य इंद्र, प्रजापति, अग्नि, वरुण इत्यादिकांच्या स्तुति करीत असत, व त्यांचीं स्तोत्रें तींच वेद होत. पुढें यज्ञयागादिक कृत्यें हळू हळू प्रचलित झालीं. वेदानंतर ब्राह्मणें व आरण्यकें अस्तित्वांत आलीं व धार्मिक विधींस मूर्तस्वरूप आलें. त्यावेळीं ह्मणजे इसवीसनापूर्वीं सुमारें एकहजार वर्षांमागें विद्वान आचार्यांनीं धर्मकृत्यें सूत्रबद्ध केलीं. ऋग्वेदी

यासाठीं आश्वलायनाचार्यांनीं जीं सूत्रें रचिलीं त्यांत श्रौतसूत्र व गृह्यसूत्र असे दोन भाग आहेत. प्रसंगविशेषीं त्रेताग्नीवर जे यज्ञयागादिक करण्यांत येत असत त्यांचें वर्णन श्रौतसूत्रांत केलेलें आहे, आणि गृह्यसूत्रांत गृह्याग्नीवर जीं कृत्यें करण्यांत येत असत त्यांचें वर्णन आहे. गृह्यसूत्रांत आन्हिककृत्यांपैकीं संध्योपासन, प्रातर्होम, पंचमहायज्ञ व सायंहोम एवढ्याच कृत्यांचा विधि सांगितला आहे. पहांटेस सूर्योदय होण्यापूर्वीं उठावें व अर्ध्या नक्षत्रांचा अस्त झाला ह्मणजे तेव्हां पासून सूर्यमण्डल दिसूं लागे पर्यंत गायत्रीमंत्राचा जप करावा, तसेंच सायंकाळीं सूर्यमंडल अर्धें अस्तास गेल्यापासून नक्षत्रें दिसूं लागे पर्यंत गायत्री मंत्राचा जप करावा असें सांगितलें आहे. (आ. गृ. सू. अ. ३. खंड ७) गृह्याग्नीवर जो प्रातर्होम करावयाचा त्याविषयीं ह्मटलें आहे कीं, सकाळीं सूर्य, प्रजापति, सोम, इंद्र वगैरे देवतांस आहुती द्याव्या व सायंकाळीं सूर्याचे ऐवजीं अग्नीस पहिली आहुति देऊन बाकीच्या आहुती सकाळच्या प्रमाणेंच द्याव्या. नंतर देवतांस, राक्षसांस, व पितरांस बलि अर्पण करावे. (पहा आ. गृ. सू. अ. १ खंड २). सूत्रांत देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, ब्रह्मयज्ञ व मनुष्ययज्ञ असे पांच यज्ञ सांगितलें आहेत. अग्नींत आहुती देणें तो देवयज्ञ, सर्व भूतांस बलि अर्पण करणें तो भूतयज्ञ, पितरांचें तर्पण करणें तो पितृयज्ञ, वेदाध्ययन करणें तो ब्रह्मयज्ञ आणि अतिथीस ह्मणजे आलेल्या पाहुण्यास भोजनादि देणें तो मनुष्ययज्ञ. अशीं लक्षणें सांगून हे पांचहि यज्ञ दररोज करावे असा विधि आश्वलायनाचार्यांनीं सांगितला आहे. अध्ययनांत चार वेद, त्यांचीं ब्राह्मणें व सूत्रें, तसेंच भारतादि इतिहास व पुराणें यांचें अध्ययन करण्याविषयीं सांगितलें आहे. देवतांचें तर्पण करावयाचें त्यांत फक्त वेदकालीन देवतांचा उल्लेख आहे; राम, कृष्ण, चण्डी, गणपति इत्यादि अर्वाचीन पुराणान्तर्गत देवतांचा उल्लेख नाहीं. देवतांचें तर्पण झाल्यावर विश्वामित्र, वामदेव, अत्रि, वसिष्ठ इत्यादि ऋषींचें तर्पण करावें व त्यानंतर आचार्यांचें तर्पण करावें असें म्हटलें आहे. आचार्यमालेंत सुमंतु, जैमिनि, वैशंपायन इत्यादि पुरुषांचा, तसेंच गार्गीवाचकनवी, वडवाप्रातीथेयी, सुलभामैत्रेयी इत्यादि स्त्रियांचाही नामनिर्देश केला आहे. (पहा आ. गृ. सू. अ. ३ खंड १–२–३–४). हें ऐतिहासिक स्थित्यंतर एकदम लक्ष्यांत येण्यासाठीं निरनिराळ्या काळच्या आह्निक कृत्यांची यादी परिशिष्टांत दिली आहे.

११. वरील हकीकती वरून प्राचीनकाळीं आह्निककर्म किती संक्षिप्त व साधें होतें तें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. वेदकालानंतर सूत्रें व स्मृति झाल्या व सूत्रकालानंतर अर्वाचीन स्मृ-

पुराणांचा परिणाम.

तींची, व विशेषें करून पुराणांचीं संख्या फार वाढलीं, व बारिक सारिक गोष्टींची विधींत भर पडली. कित्येक पुराणांमुळें तर धर्माच्या बाबतींत बराच बाष्कळपणा घुसला. धर्मकृत्यांवरील हल्लींचे निबंध निरनिराळ्या कालांच्या स्मृति व पुराणें यांच्या आधारावरूनं रचिलें असल्यामुळें पूर्वींच्या पेक्षां धर्मकृत्यांत फार वाढ झाली आहे. विवाह, उपनयन, श्राद्ध वगैरे कृत्यांतील अवांतर गोष्टींचीं ज्याप्रमाणें पुराणामुळें अतिशय वाढ झालीं त्यांचप्रमाणें आह्निकं कर्मांचीही झाली आहे. आजच्या सारखीं सर्व आह्निक कृत्यें करणें झाल्यास किती वेळ लागेल त्याची कल्पना परिशिष्टा वरून येईल.

प्रस्तुतकाळीं आपलें कर्तव्य.

१२. आज आह्निकविधींचा कार्यक्रम जो प्रचलित आहे त्याचा उगम वेदांत आहे. वेदांच्या उच्च भूमींतून निघालेला हा शुद्ध झरा पौराणिक कल्पनातरंगांच्या दलदलींत सांपडून गढूळ झाला आहे, त्याचें शोधन करून त्यास पूर्वींचे निर्मल स्वरुप प्राप्त करून देणें हें आतां आपलें कर्तव्य आहे. पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार इकडे होऊं लागतांच जुन्या चालींची निंदा करणारे नवे विद्वान् आणि त्या चालींची प्रसंशा करणारे जुने पंडित, यांच्या मध्यें झगडा सुरु झाला. परंतु एकापक्षीं आत्मनिंदा व दुसऱ्यापक्षीं आत्मस्तुति अशा प्रकारच्या भांडणाचा काल आतां राहिला नाहीं. जुन्यानव्याची प्रेमपूर्वक भेट होऊन आत्मपरीक्षणाच्या कालास प्रारंभ झाला आहे.

पुराणमित्येव न साधुसर्वं न चापि किंचित् नवमित्य बद्यम् ।
संतः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥

हें तत्व आतां अनुसरलें जात आहे. अशावेळीं वर्तमान परिस्थितीचा विचार करून शास्त्र व आचार यांचा समेट करणें जरूर आहे. ‘ तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ ’ असें गीता सांगते. पण शास्त्र ज्या त्या वेळच्या परिस्थितीस अनुरूप असे असलें पाहिजे. प्राचीनकाळीं परिस्थितीस अनुरूप अशा रूढि लोकांत स्वाभाविक रीत्या पडत, व शास्त्रकार शहाणपणानें त्यांचा अंतर्भाव शास्त्रांत करून घेत. अशा रीतीनें समयास उचित असे फेरफार शास्त्रांत होत व तसे फेरफार होत गेलेही पाहिजेत; नाहीं पेक्षां शास्त्र मृतप्राय होतें. शास्त्राचे आचार व व्यवहार असे दोन मोठे विभाग आहेत; त्यांज पैकीं व्यवहार शास्त्र ( Law ) मध्यें कायद्यानें व हायकोर्टाच्या निवाड्यांनीं वेळोवेळीं समयास योग्य असा फेरबदल

होत चालला आहे. आमच्या आचार शास्त्रास मात्र हल्लीं कैक वर्षेपर्यंत बिलकुल चालन मिळालें नाहीं. दोनशें वर्षांपूर्वीचें आमचे आचारशास्त्र तेंच आमचें आजचें आचारशास्त्र. व्यवहारशास्त्राप्रमाणें त्यांत जीवंतपणा नाहीं. समाजशास्त्राची असली मृतप्राय स्थिति कुठवर चालेल? शास्त्राचे जुने नियम नव्या परिस्थितीशीं विसंगत व गैरसोईचें असल्यामुळें समाजाचे घटकावयव आपपल्या सोई प्रमाणें व मर्जी प्रमाणें वागत आहेत. यासाठीं आचार शास्त्रांत तूर्तच्या परिस्थितीस अनुलक्षून फेरबदल करणें अवश्य आहे. धर्माचार्यांनीं या विषयीं योग्य ती तरतूद करून प्रस्तुत परिस्थितीस उचित अशी एकादि नवीन स्मृति तयार केल्यास बरें होईल, आणि धर्माचार्य जर आपण होऊन हें कार्य करीत नसले तर लोकांनीं त्यांना विनवून त्यांजकडून तें करवून घेतलें पाहिजे. तात्पर्य आपण आपल्या कामासाठीं परिश्रम केले पाहिजेत; त्यावांचून आपल्या धर्माची उन्नति होणें अशक्य आहे.

आधुनिक परिस्थितीस अनुरूप अशी एकादी नवीन स्मृति केव्हां तयार होईल तेव्हां होवो, परंतु हल्लीं निदान आह्निक कृत्यांपैकीं आपापल्या विचारा प्रमाणें उपयुक्त तो भाग दररोज करीत जाणें अवश्य आहे. उदाहरणार्थ, देहाच्या आरोग्यासाठीं स्नानादिक विधि, प्राणायाम व नमस्कार; चित्ताच्या शुद्धीसाठीं अघमर्षण व देवाची प्रार्थना; कर्तव्यजागृतीसाठीं पंचमहायज्ञांतील तत्वांचें आचरण ह्या गोष्टी महत्वाच्या व उपयुक्त आहेत.

इतर धर्मांतील आन्हिक कृत्यें.

१३. मुसलमानी धर्मांत मूर्तिपूजा बिलकुल नाहीं; खुदाची (परमेश्वराची) प्रार्थना करण्याविषयीं आज्ञा आहे. यास ते 'नमाज' असें म्हणतात. पहांटेस सूर्योदयापूर्वी, दुपारीं, दुपारानंतर, संध्याकाळीं व रात्रीं याप्रमाणें दिवसांतून पांच वेळ नमाज पढावयाची असते. खुदा एकच आहे व त्यानें महंमद पैगंबर ह्यास धर्मशिक्षणासाठीं पृथ्वीवर पाठविलें, खुदानें सगळी सृष्टी निर्माण केली, तो सर्वशक्तिमान व सर्वव्यापक आहे, त्याचें स्मरण करून त्यासच बंदगी (नमस्कार) करावी व नीतीनें वागावें अशा अर्थाची ही प्रार्थना असते. नमाज पढण्यापूर्वीं 'वुजू' (स्वच्छता) करण्याविषयीं आज्ञा आहे. 'वुजू' करणें म्हणजे हात, पाय, व तोंड धुणें, चूळ भरून टाकणें, पाण्यानें नाक साफ करणें, आणि पाण्यानें हात भिजवून ते डोक्यावरून, कानावरून व मानेवरून फिरविणें. ज्याच्या त्याच्या या स्वतंत्र प्रार्थने शिवाय दरशुक्रवारी दुपारी जामे मसजीद मध्यें सार्वजनिक प्रार्थना होत असते, तेव्हां पुष्कळ मुसलमान लोक तेथें जमतात.

ख्रिस्ती धर्मांत दररोज दोनदां ईश्वराची प्रार्थना करावयाची असते; सकाळीं उठल्यावर, व रात्रीं झोंपीं जाण्यापूर्वी. या शिवाय दर रविवारीं देवळांत जमून सर्व लोक व पाद्री सार्वजनिक प्रार्थना करतात. रोमन क्याथलिक पंथांत कित्येक कर्मठ लोक दररोज सार्वजनिक प्रार्थनेस जातात. प्रार्थना करण्यापूर्वीं स्नान, हात पाय धुणें, वगैरे अमुकच विधि केला पाहिजे असा निर्बंध ख्रिस्ती धर्मांत नाहीं. ईश्वर सर्वशक्तिमान व दयाळु आहे, येशूख्रिस्त हा ईश्वराचा मुलगा असून तो या जगास तारणारा आहे, ईश्वर आमच्या पापांची क्षमा करो, आमच्या मनांत सन्मार्गाची प्रेरणा करो, आणि सर्वांस सौख्य व आनंद देवो, अशा भावार्थाच्या ह्या प्रार्थना असतात.

पारसी धर्मांत मुसलमानी धर्माप्रमाणेंच दिवसांतून पांच वेळां प्रार्थना करण्याविषयीं आज्ञा आहे. त्यावेळीं कंबरे भोंवतालची ' कस्ती ' सोडतात, व झंद–अवेस्तामधील मंत्र म्हणून पुन्हां बांधतात. प्रार्थनेपूर्वीं हातपाय व तोंड धुतात. आपलीं कृत्यें चांगलीं असोत व विचार चांगले असोत असा ह्या प्रार्थनांचा भावार्थ आहे. सर्व धर्मांत आह्निक कृत्यांचा उद्देश देहाचें आरोग्य व चित्ताची शुद्धि हाच आहे.*

शेवटीं, लोककल्याणासाठीं अशा पुस्तकांचा प्रसार करून जनसमूहाच्या धार्मिक विचारांस योग्य वळण लावण्याचे **श्रीमंत सरकार सयाजीराव महाराज** यांचे प्रयत्न सफल होवोत अशी त्या जगन्नियंत्या परमेश्वरापाशीं प्रार्थना करून ही प्रस्तावना पूरी करतों.

**बडोदें,**
ता. १७ फेब्रुवारी १९१७.

**मंगेश कमलाकर नाडकर्णी.**



---

* इतर धर्मांत हिंदू धर्मासारखे विशेष आह्निकविधि नसल्यामुळें त्यांचें स्वतंत्र परिशिष्ट जोडलें नाहीं.

श्री.

# आन्हिककर्मप्रकाशांतील विषयांची अनुक्रमणिका.



| विषय. | पृष्ठ. |
|---|---|

| विषय. | पृष्ठ. |
| --- | --- |

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|

विषय. पृष्ठ.

**आन्हिककर्म प्रकाशांतील विषयांची अनुक्रमणिका समाप्त.**

---

श्री.

# आह्निककर्मप्रकाश.

## [ मराठी भाषांतरासहित. ]



॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीमन्मंगलमूर्तिं विघ्नघ्नंतं गजाननं वंदे । वंदनमात्राद्यस्य ब्रह्माद्याः सपदि सिद्धसाध्याः स्युः ॥ १ ॥ वेदादिवाक्यरत्नैः सूत्रैर्ग्रथितः सदास्त्वयं हारः । ईशप्रियविप्राणामाह्निककर्मप्रकाशकस्तुष्ट्यै ॥ २ ॥

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीगजवदना वंदुनि, आन्हिककर्मप्रकाश समजाया । करितों स्फोटा प्राकृतभाषेनें चंद्रकांत समजाया १ ग्रंथाच्या आरंभीं अभीष्टार्थाची सिद्धि होण्याकरितां परमात्मचिंतनादिक मंगल करावें, असा सच्छास्त्रनियम आहे; आणि हेंच मंगल अनुषंगानें वाचकासही व्हावें; ह्या करितां वाचनिक मंगल करतो. श्रीमान् म्हणजे धर्मार्थादिक चतुर्विध पुरुषार्थदाता, मंगलस्वरूपी, विघ्नांचा नाश करणारा, ज्याच्या स्तवनमात्रें करून ब्रह्मदेव प्रभृतिकांचे साधनीयार्थ त्वरित सिद्ध होतात, अशा गजाननाचें अभिवादन करतों. गजाननास अशीं विशेषणें देऊन वंदन करण्यानें सुमंगल व निर्विघ्न ग्रंथाची समाप्ति आणि धर्मादिकांचा लाभ सत्वर व्हावा हा अभिप्राय १ हा ग्रंथ प्रमाणभूत आहे, आणि ब्राह्मणांनींच ग्रहण करावा हें सांगतो. नित्य कर्मविधायक वेद मनुस्मृति इत्यादिकांच्या सारभूत वाक्यांनीं आणि आश्वलायनादिकसूत्रांनीं गुंफलेला हा 'आन्हिककर्मप्रकाश' ह्मणजे सूर्योदयापासून पुनः सूर्योदय होईपर्यंत अवश्य आचारावयाच्या ( कराव्याच्या ) कर्मास प्रगट करणारा ग्रंथ ईश्वरावर प्रीति करणाऱ्या ब्राह्मणांच्या हारवत् कंठगत होऊन तद्बोधित कर्मद्वारा त्यांस आनंद देवो ॥ २ ॥

---

# अथोपोद्घातः

मनुः—आचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः । आचाराद्धनमक्षय्यमाचारोह्यंत्यलक्षणम् ॥ १ ॥ आचारः परमोधर्मो नृणां श्रेयस्करो भवेत् । इह लोके पराकीर्तिः परत्र परमं सुखम् ॥ २ ॥ आचारात्प्राप्यते श्रैष्ठ्यमाचारात्कर्म लभ्यते । कर्मणा जायते ज्ञानं ज्ञानान्मोक्षमवाप्यत इति ॥३॥

आतां उपोद्घात म्हणजे पुढें सांगावयाचा जो 'आन्हिककर्मप्रकाश' ग्रंथ त्यास उपयोगी परिभाषारूप प्रकरण सांगतो. मनु—मन्वादि ऋषिप्रणीत स्नानादि नित्यकर्मास आचार असें म्हणतात. आचारसंपन्नास आचारजन्य पुण्यानें आयुष्य, इच्छेसारखी संतति व सत्पात्रीं दानानें अविनाशी धन प्राप्त होतें; आणि कृष्णदंताद्यनुमित अरिष्टाचा नाश होतो. जरी आचारहीन मनुष्यास बहुत आयुष्य, संतति आणि धन असलें तरी ज्या संततीनें धर्मविवाहश्राद्धादिक्रियाद्वारा कुलाचा उद्धार होत नाहीं, ज्या आयुष्यांत परलोकप्राप्तिसाधन झालें नाहीं; आणि जें अन्यायोपार्जित धन असद्व्ययीं लागलेलें अथवा ज्याचा राजादिकांकडून लवकरच नाश व्हावयाचा, हीं सर्व असून व्यर्थ होत. १ स्वर्गादिलोकप्रापक यज्ञादि कर्म करण्यास आचारानेंच अधिकारी होतो. म्हणून मनुष्यास आचार हाच कल्याणकारक श्रेष्ठ धर्म—म्हणजे पुण्य संपादन करण्याचा मार्ग—होय. जेणें करून ह्या लोकांत मोठी कीर्ति आणि परलोकांत परम सुख प्राप्त होतें. २ आचारानें श्रेष्ठ—म्हणजे रजस्तमोगुणरहित सात्विक गुण—प्राप्त होतो. आचारानेंच कर्म—म्हणजे यज्ञाद्यनुष्ठानजन्य फल—प्राप्त होतें, संध्यादिनित्यकर्महीन ब्राम्हण संक्रांत्यादिनिमित्तिक दानादिकर्म करण्यास अनधिकारी होतो, अनधिकाऱ्यानें केलेलें कर्म निरर्थक होतें, किंबहुना दोष संपादनासही कारण होतें. नित्यनैमित्तिकानुष्ठानानें अंतःकरण शुद्धिद्वारा मोक्षोपयोगी ब्रम्हसाक्षात्काररूप ज्ञान होतें. अशा ज्ञानानें परमात्मसच्चिदानंदस्वरूपीं लीन होतो. पुन्हा त्यास जन्ममरणाचा फेरा रहात नाहीं. जसा जसा कर्मसंस्कार दृढ होतो, तशी तशी योग्यता वाढते. ३



चतुर्विंशतिमते—आचारहीनं न पुनंति वेदा यद्यप्यधीताः सहषड्भिरंगैः। छंदास्येनं मृत्युकाले त्यजंति नीडं शकुंता इव जातपक्षा इति ॥ ४ ॥ पराशरः—यस्त्वाचारविहीनोऽपि विद्वान्वेदपरायणः । सर्वधर्मबहिष्कार्यो यथा शूद्रस्तथैव स इति ॥ ५ ॥ काशीखंडे--वेदोदितं स्वकं कर्म नित्यं कुर्यादतंद्रितः । तद्धि कुर्वन्यथाशक्ति प्राप्नुयात्स गतिं परामिति ॥६॥

"पूर्वीच्या तीन श्लोकांनीं सर्व सुखांस आचार हेतु आहे असें सांगितलें. आतां आचारहीन द्विज सांगतो. वेदांत निष्णात जरी आहे, तरी त्यास त्यापासून पुण्य प्राप्त होत नाहीं असें सांगतो." चतुर्विंशतिमतांत—आचारहीन द्विजानें जरी शिक्षाकल्पादि षडंग वेदांचें अध्ययन केलें तरी ते वेद त्यास पापापासून मुक्त करीत नाहींत, इतकेंच नाहीं तर, त्याच्या मृत्युकाळीं म्हणजे वेदधारणशक्ति शिथिल झाली असतां, स्वविहित कर्माचा अनादर करणारा म्हणून जसें पक्ष्यांना उडण्याची शक्ति आली असतां ते खोपा टाकतात, पुन्हा त्याची ओळख ठेवीत नाहींत, तसें त्याचा त्याग करतात. म्हणून वेदांस छंदस्—म्हणजे स्वेच्छाचारी---अशी संज्ञा आहे. ४ पराशर—जो आचारहीन आहे, तो ज्ञाता व वेदासक्त जरी असला तरी त्यास याजनाध्ययनादि धर्मकार्यां पासून दूर करावें. जों पर्यंत तो ब्राम्हण्यरक्षक कर्म करीत नाहीं तों पर्यंत तो शूद्रासारखा आहे. ५ "पूर्वीच्या पांच श्लोकांनीं आचाराचें महात्म्य, आचारहीन ब्राम्हणाचे सांग वेदाध्ययनादि श्रम निरर्थक आणि त्यास श्राद्धादिधर्मकृत्यांकडे योजूं नये असें सांगितलें. आतां वेदाच्या शाखा ( भाग ) पुष्कळ आहेत, परंतु पितृपितामहादिकांनीं ( वाडवडलांनीं ) ज्या शाखेचा कर्माकडे स्वीकार केला, त्या शाखेंत सांगितलेल्या मंत्रांनींच कर्म करावें असें सांगतो" काशीखंडांत—निरंतर शक्त्यनुसार आळस न करितां वेदप्रणीत स्वकीय कर्म करावें, तें ( कर्म ) करणारा उत्तम गतीला पावेल. ६

---

१ मन्वादि चोवीस ऋषींच्या संमतीनें केलेली स्मृति.

स्मृतिसंग्रहे—समयाचारिको धर्मो जातिदेशकुलोद्भवः ।
ग्रामाचाराः परिग्राह्याः सर्वत्रैव यथोदितमिति ॥ ७ ॥ चतु-
र्विंशतिमते—पुराणं मानवो धर्मः सांगोवेदश्चिकित्सकम् ।
आज्ञासिद्धानि चत्वारि न हंतव्यानि हेतुभिरिति ॥ ८ ॥

" मन्वादि प्रणीत शास्त्रांशीं अविरुद्ध असलेल्या अन्यसमयादिप्राप्त कृत्यांचाही अवश्य अंगीकार करावा असें सांगतो. " स्मृति संग्रहांत—कालाच्या अनुरोधानें उत्पन्न झालेला धर्म, उदाहरण—ग्रीष्मऋतूंत एके दिवशीं सर्वांनीं वनभोजन करावयाचें. ज्ञातीच्या अनुरोधानें उत्पन्न झालेला धर्म, जसें ' महाराष्ट्र ब्राम्हणांत हरिताळिकेचा उपवास तीन वर्षांच्या कुमारिके कडूनही करवावयाचा '. देशधर्म—उष्ण देशांत अभ्यंगस्नानादि, कुलधर्म-बोडण, दिवटी बुधली हातांत घेऊन देवाचा नीराजनविधि करणें इत्यादि. ग्रामाचार म्हणजे ग्रामधर्म, ह्या गावकरी लोकांनीं अमुक गावाशीं किंवा देशाशीं क्रयविक्रयादि संबंध न करणें इत्यादि. अशा प्रकारच्या शास्त्राप्रतिकूल धर्मांचें आचरण सर्वांनीं करावें. ह्या श्लोकांत धर्म व आचार हे शब्द सामान्य क्रियावाचक आहेत. ७ " कोणत्याही वाक्यावर विश्वास ठेवून तद्बोधितक्रिया विशेष ज्ञानपुरस्सर करून तिचा परिणाम बरोबर समजल्याशिवाय तें खरें किंवा खोटें हें कळत नाहीं. हा साधारण नियम आहे. वेद स्वतां प्रमाण आहेत; आणि वेदांच्या उच्छिन्न झालेल्या अनेक शाखांचें मन्वादित्रिकालज्ञांनीं स्मरण करून वाक्यरचना केल्या ज्यांस ' स्मृति ' असें म्हणतात त्यांस वेदमूलकच प्रामाण्य आहे. तशींच पुराणांतील धर्मविधिबोधकवाक्यें वेदानुयायी असल्यानें तींही प्रमाण आहेत; असें सर्वतत्त्वज्ञाते सानुभविक निरभिमानी याज्ञवल्क्यादिक म्हणत आले, अशा शब्दादि प्रमाणांनीं वेदादिवाक्यावर विश्वासच ठेवणें अवश्य आहे असें सांगतो". चतुर्विंशतिमतांत—मत्स्यादिपुराण, मन्वादिप्रोक्त धर्मशास्त्र, सांगवेद आणि चिकित्सक म्हणजे अमुक औषधानें अमुक रोग शांत होतो अशा प्रकारचें रोगशमोपाय सांगणारें शास्त्र (वैद्यशास्त्र), ह्यांच्या अर्थाविषयीं सद्धेतूंच्या कल्पना होतील तितक्या कराव्या, परंतु ज्या अर्थाविषयीं कल्पना होत नाहीं, तद्बोधक वाक्य हेतुशून्यार्थाचें प्रतिपादक ह्मणून निरर्थक अथवा असद्धेतुकल्पनेनें विपरीतार्थबोधक आहे, असें न समजतां त्यांची आज्ञाच प्रमाण मानावी. सर्वज्ञत्वादिगुणसंपन्नप्रयुक्तवाक्यें अल्पजीवित्वाल्पज्ञ मनुष्यांनीं दृष्टादृष्टार्थहेतुक आहेत अशीच कल्पना करावी हें न्याय्य आहे. कोणत्याही वाक्याची साधारणैकदेशीं सत्यत्वप्रतीति झाली, ह्मणजे

तें वाक्य प्रायः सत्यच आहे असा निश्चय होतो; ह्मणून ह्या श्लोकांत शीघ्रदृष्टार्थज्ञापक चिकित्सकाचें ग्रहण केलें आहे. वेदांस स्मृत्यादिमूलक प्रामाण्य मानणें हें शाखा-चंद्रन्यायासारखें अथवा इष्टराशिक गणितांतील स्वदृष्टसत्यसंख्येनें स्वादृष्टसत्यसंखेच्या ज्ञानासारखें आहे. ८

पद्मपुराणे—योवैदिकमनादृत्य कर्म स्मार्तेतिहासकं । मोहात्समाचरेद्विप्रो न स पुण्येन लिप्यत इति ॥ ९ ॥ मनुः—श्रुतिस्मृत्युदितं सम्यङ्निबद्धं स्वेषु कर्मसु । धर्ममूलं निषेवेत सदाचारमतंद्रितः॥ १०॥ वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदां । आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव चेति ॥ ११ ॥ याज्ञवल्क्यः—देशे काल उपायेन द्रव्यं श्रद्धासमन्वितं । पात्रे प्रदीयते यत्तत्सकलं धर्मलक्षणमिति ॥ १२ ॥

पद्मपुराणांत—जो ब्राह्मण वेदप्रणीतकर्माचा अनादर करून स्मृत्युक्त किंवा भारतादि इतिहासोक्त कर्म, हेंच मुख्य आहे अशा अविवेकानें आचरील, तर तज्जन्य पुण्य त्यास प्राप्त होणार नाहीं. ९ " आतां कोणती क्रिया केली ह्मणजे धर्म उत्पन्न होतो, हें धर्माचें लक्षण सांगतो. " मनु—स्वकीय ब्रह्मयज्ञादि कर्मांत श्रुतिस्मृत्युक्त दर्भपवित्रादि आणि साधूंचा आचार ह्मणजे आसनबंधपात्रस्थापनादि हें अंगत्वेंकरून संबद्धकर्म धर्माचें साधारण कारण अनालस्यानें अवश्य आचरावें. कोणतेंही मुख्य कर्म अंगोपांगांनीं हीन झालें असतां तज्जन्य फळाचेंही वैगुण्य होईल ह्मणून अंगकर्माची उपेक्षा करूं नये. १० ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्वणवेद हे अधिकारपरत्वें धर्म ह्मणजे पुण्यप्रापक कर्माविषयीं आदि-कारण आहेत. तसेंच वेदवेत्त्या मन्वादिकांच्या स्मृत्या आणि शील ह्मणजे वेदाभ्यास करणें, देवपितरांची भक्ति, सौम्यपणा ( आकृतीनें उग्र न दिसणें ), कोणास त्रास न देणें, कोणाच्या गुणावर दोषाचा आरोप न करणें, मृदुता ( नम्रपणा ), वाईट न बोलणें, सर्वांशीं मैत्री, प्रियवक्तृत्व, दुसऱ्यानें उपकार केलेला जाणून प्रत्युपकार करणें, शरणागताचें रक्षण करणें, करुणा आणि शांति ( अपराधाची क्षमा ), याप्रमाणें हारीतानें सांगितलेलें तेरा प्रकारचें वृत्त, धार्मिकांचा आचार ह्मणजे वस्त्रधारणादि व्यवहार आणि विकल्पविहित कर्माचा एक पक्ष स्वीकारण्याविषयीं अंतःकरणाचा संतोष, हेंही धर्माचें कारण होय. ११ याज्ञवल्क्य—आर्यावर्तादि देशांत, संक्रांति

इत्यादि काळीं उपायानें म्हणजे यथाविधि न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचें सत्पात्रीं दान करणें हें आणि अशा प्रकारचें शास्त्रोक्त अन्य ( दुसरें ) ही धर्माचें कारण होय. १२

बृहस्पतिः—दया क्षमाऽनसूया च शौचानायासमंगलम् । अकार्पण्यमस्पृहत्वं सर्वसाधारणानि च ॥ १३ ॥ परे वा बंधुवर्गे वा मित्रे द्वेष्टरि वा सदा । आपन्ने रक्षितव्यं तु दयैषा परिकीर्तिता ॥१४॥ बाह्ये वाभ्यंतरे वापि दुःख उत्पादिते परैः । न कुप्यति न वा हंति क्षमा सा परिकीर्तिता ॥ १५ ॥ गुणान्न गुणिनो हंति स्तौति मंदगुणानपि । नान्यदोषेषु रमते सानसूया प्रकीर्तिता ॥ १६ ॥ अभक्ष्यपरिहारश्च संसर्गश्चाप्यनिंदितैः । स्वधर्मे च व्यवस्थानं शौचमेतत्प्रकीर्तितं ॥ १७ ॥ शरीरं पीड्यते येन सुशुभेनापि कर्मणा । अत्यंतं तन्न कुर्वीत अनायासः स उच्यते ॥ १८ ॥

बृहस्पति—सर्व वर्णांचे दया, क्षमा, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य, आणि अस्पृहत्व हे गुण पुण्यास कारण आहेत. १३ " पूर्वोक्त श्लोकांत जे दयादि गुण सांगितले त्यांचीं लक्षणें सांगतो. " कोणी अन्य ( परका ) असो, बंधुवर्गांतला असो, मित्र असो, अथवा शत्रु असो, जो विपत्तिग्रस्त झाला त्याचें रक्षण करणें ह्यास दया असें म्हणतात. १४ दुसऱ्यानें शरीरास दुःख दिलें अथवा मनोवेधक वाक्यादिकांनीं अंतःकरणास दुःख दिलें असतां जो दुःख देणारास पीडा करीत नाहीं, किंवा चित्तांत क्रोधही करीत नाहीं; ह्या त्याच्या गुणास क्षमा असें ह्मणतात. १५. जो स्वकीय गुणानें अन्य गुणवंतांचा तिरस्कार करीत नाहीं, अल्पगुणी पुरुषांचीही प्रशंसा करतो, आणि दुसऱ्याच्या दोषाकडे लक्ष देत नाहीं, ह्या त्याच्या गुणास अनसूया असें म्हणतात. १६ अभक्ष्य म्हणजे शास्त्रनिषिद्ध पदार्थ ह्यांचें भक्षण न करणें, अनिंदित वस्तूंशींच संबंध ठेवणें, आणि स्वकीय वर्णाश्रमाच्या अनुरोधानें शास्त्रबोधित धर्मावर व्यवस्थित असणें, ह्यास शौच असें म्हणतात. १७ ज्या शास्त्रांत सांगितलेल्या अशा मध्यान्हकाळीं बाहेर स्नान करणें इत्यादिकांच्या योगानें जर शरीरास रोगादि अत्यंत पीडा होईल तर तें न करितां त्यांचा मंत्रस्नानादि अनुकल्प करावा, ह्यास अनायास असें म्हणतात. १८

प्रशस्ताचरणं नित्यमप्रशस्तविवर्जनं। एतद्धि मंगलं प्रोक्त-मृषिभिस्तत्वदर्शिभिः ॥ १९ ॥ स्तोकादपि प्रदातव्यमदीने-नांतरात्मना। अहन्यहनि यत्किंचिदकार्पण्यं हि तत्स्मृतम् ॥ २० ॥ यथोत्पन्नेन संतोषः कर्तव्योऽह्यल्पवस्तुनि। परस्य चिंतयेन्नार्थं सा स्पृहा परिकीर्तितेति ॥ २१ ॥ गृह्यपरिशिष्टे—बह्वल्पं वा स्वगृह्योक्तं यस्य यावत्प्रचोदितं। तस्य तावति शास्त्रार्थे कृते सर्वः कृतोभवेत् ॥२२॥ यन्नाम्नातं स्वशाखायां पारक्यमवरोधियत् । विद्वद्भिस्तदनुष्ठेयमग्निहोत्रादिकर्मव-दिति ॥ २३ ॥

प्रशस्त म्हणजे ज्याची वेदशास्त्रवेत्ते शिष्ट प्रशंसा करतात तें कर्म, ह्याचें यावज्जीव निरंतर आचरण करणें, आणि तद्विरुद्ध कर्मांचा त्याग करणें, त्यांस तत्वद्रष्टे ऋषि मंगल असें म्हणतात. १९ नित्यशः शक्त्यनुसार आपलें दैन्य न दाखवितां अंतःकरण-पूर्वक अल्पतरी यथाविधि दान करावें, ह्यास अकार्पण्य असें म्हणतात. २० न्यायानें जें प्राप्त होईल, तें धान्य द्रव्यादि वस्तु थोडें जरी असलें तरी त्यावरच संतुष्ट असावें. दुसऱ्याचें द्रव्य याचनादिकोपायांनीं मिळविण्याची इच्छाही करूं नये. ह्यास अस्पृहा असें म्हणतात. २१ “ आतां ज्या कर्माचीं स्वसूत्रापेक्षां अन्य सूत्रांत अधिक अंगें सांगितलीं, परंतु त्यांचा स्वीकार न करतां स्वसूत्रोक्त कर्म आचरल्यानें (केल्यानें) ही तें अंगहीन होत नाहीं असें सांगतो ” गृह्यपरिशिष्टांत—ज्यास स्वगृह्यसूत्रांत विस्तारानें किंवा संक्षेपानें जितकें कर्म सांगितलें आहे, तितकें त्यानें केलें असतां तो कर्मफळ-भोक्ता होतो. २२ जें गृह्यकर्म स्वशाखेंत पठित नाहीं, जसें—ऋक्शाखेंत मंत्राचमनादि, आणि स्वशाखेशीं अविरुद्ध असें अन्य शाखेंत पठित आहे, तर विद्वानांनीं त्या कर्माचें अग्निहोत्रांतील आध्वर्यवहौत्रादि कर्मासारखें अवश्य अनुष्ठान करावें. ह्या श्लोकांतील शाखा शब्द सूत्रादिकांचाही उपलक्षक आहे. उदाहरण—आश्वलायन परिशिष्टांत ‘ आयातुवरदा ’ ह्या यजुःशाखीय मंत्रस्थानीं आगच्छ वरदे ह्या मंत्राची योजना केली आहे म्हणून ह्याचेंच ग्रहण करितात. २३

मनुः—कृष्णसारस्तु चरति मृगोयत्र स्वभावतः। स ज्ञेयो यज्ञियो देशोम्लेंच्छदेशस्त्वतः पर इति ॥ २४ ॥ धर्मसूत्रे—प्रभूतैंधोदके ग्रामे यत्रात्माधीनं प्रयमणं तत्र वासो धर्म्यो ब्राम्हणस्येति ॥ २५ ॥ पराशरः—स्नानं संध्या जपो होमो देवतानां च पूजनं। आतिथ्यं वैश्वदेवं च षट्कर्माणि दिने दिन इति ॥ २६ ॥ मार्कंडेयपुराणे—शिरःस्नातश्च कुर्वीत दैवं पित्र्यमथापिवेति ॥ २७ ॥ कात्यायनः—यत्र दिङ्नियमो-नास्ति जपहोमादिकर्मसु। तिस्रस्तत्र दिशः प्रोक्ता ऐंद्री सौ-म्यापराजिता ॥ २८ ॥ यत्रोपदिश्यते कर्म कर्तुरंगं न तूच्यते। दक्षिणस्तत्र विज्ञेयः कर्मणां पारगःकर इति ॥ २९ ॥

**मनु**—ज्या देशांत काळ्यापाठीचीं हरणें स्वच्छंदानें राहतात, तो देश स्नानसंध्यादि कर्मास योग्य होय. ज्यांत रहात नाहींत तो म्लेंच्छ देश होय. म्लेंच्छ देशांत कर्म केलें असतां देशगुणहीन होतें. २४ **धर्मसूत्रांत**—ज्या ग्रामांत उदक व समिधादि यज्ञसामग्री बहुत आहे, आणि प्रयमण म्हणजे मूत्रपुरीषादि शौचकर्माचें स्थळ स्वाधीन आहे, तेथें राहणें हें ब्राम्हणाचें धर्माचरणास हित-कारक होय. ह्या सूत्रांतील ग्राम शब्द सारण्यक वसतिस्थानीं रूढ आहे. २५ **पराशर**—स्नान, संध्या जप, होम ( औपासनादि ), देवपूजा, अतिथिसत्कार आणि वैश्वदेव हीं सहा कर्में द्विजानें नित्यशः आचरलीं ( केलीं ) पाहिजेत. जप हें संध्ये-तील मुख्य कर्म असतां पुनः संध्याजप अशी जपशब्दाची आवृत्ति केल्यानें अन्य सर्व कर्मांपेक्षां जप श्रेष्ठ आहे असें दर्शविलें. २६ **मार्कंडेयपुराणांत**—कोणतेंही देवपित्रुद्देशानें जें संध्याब्रम्हयज्ञादिकर्म करणें तें सशिरःस्नान ( डोक्यावरून स्नान ) करून करावें. २७ **कात्यायन**—ज्या जपहोमादि कर्माविषयीं अमुक दिशेकडे मुख करून करावें असा दिशेचा नियम सांगितला नाहीं, त्या कर्माविषयीं पूर्व, उत्तर आणि ऐशानी हा दिशानियम आहे; म्हणजे ह्या तीन दिशांपैकीं कोणत्याही दिशेकडे मुख करून तें कर्म करावें. २८ ज्या सूत्रादिकांत कर्म सांगितलें आहे, आणि कर्त्यानें कोणत्या अवयवानें करावें असें सांगितलें नाहीं, तें कर्म दक्षिणावयवानें करावें. त्यांतही दक्षिण ( उजवा ) कर ( हात ) च कर्म करण्यास मुख्य आहे असें समजावें. २९

वराहपुराणे—स्नानं संध्यातर्पणादि जपहोमसुरार्चनं । उपवासवता कार्यं सायंसंध्याहुतीर्विनेति ॥ ३० ॥ चतुर्विंशतिमते—इक्षूनपः फलं मूलं पयस्तांबूलमौषधं । भक्षयित्वापि कर्तव्याः स्नानादिकाः क्रिया इति ॥ ३१ ॥ मंडनः—मुख्यकाले यदावश्यं कर्म कर्तुं न शक्यते । गौणकालेपि कर्तव्यं गौणोऽप्यत्रेदृशोभवेदिति ॥ ३२ ॥ छंदोगपरिशिष्टे—आसीन ऊर्ध्वः प्रव्होवा नियमो यत्र नेदृशः । तदासीनेन कर्तव्यं न प्रव्हेन न तिष्ठतेति ॥ ३३ ॥ शाट्यायनिः—दानमाचमनं होमं भोजनं देवतार्चनम् । प्रौढपादोन कुर्वीत स्वाध्यायं पितृतर्पणम् ॥ ३४ ॥ आसनारूढपादोवा जान्वोर्वा जंघयोस्तथा । कृतावसक्थिको यस्तु प्रौढपादः स उच्यत इति ॥ ३५ ॥

**वराहपुराणांत**—सायंसंध्या आणि सायंहोम ह्यांवाचून स्नान, संध्या, ब्रम्हयज्ञ, सौरादिमंत्रांचा जप, होम, देवपूजा इत्यादि सर्व नित्यकर्में कांहीं एक भक्षण न करतां करावीं. ३० " मागल्या श्लोकांत भक्षण केल्यावाचून सर्व धर्मकृत्यें करावीं असें सांगितलें, आतां त्याचा कांहीं अंशीं अपवाद सांगतो. " **चतुर्विंशतिमतांत**—ऊस, उदक, फळें, मूळ, दूध, विडा, हीं औषधरूपानें भक्षण केलीं असतांही स्नानदानादिक क्रिया कराव्या. शरीररक्षणार्थ औषध भक्षण केल्यानें नित्यकर्म करण्याविषयीं अनाधिकारी होत नाहीं. ३१ **मंडन**—जें नित्यकर्म ज्या काळीं करावयाचें तें कर्म करण्यास त्याकाळीं सामर्थ्य नसेल तर मुख्यकाळाच्या निकटकाळीं तरी करावें. नित्यकर्माविषयीं तो गौणकाळही तत्प्रतिनिधिच होय. ३२ **छंदोगपरिशिष्टांत**—ज्या कर्माविषयीं बसून, उभ्यानें अथवा ओणव्यानें करावें असा स्थितिनियम सांगितला नाहीं, तें कर्म बसूनच करावें. ३३ **शाट्यायनि**—दान, आचमन, होम, भोजन, देवतार्चन, ब्रम्हयज्ञ, तर्पण, इत्यादि कर्में प्रौढपाद (पुढें सांगावयाच्या लक्षणाचा) होत्साता (असतां) करूं नयेत. ३४ जो दोनही पावलें भूमीवर ठेवतो (उकिडवा) तो, जो गुडघ्यांवर बसतो तो, जो पोटर्‍यांवर बसतो तो, जो अवनतसक्थि करतो म्हणजे खुडमांडी घालतो किंवा पालथी मांडी घालतो तो, ह्यांस **प्रौढपाद** असें म्हणतात. असें बसून दानादि करूं नये असें पूर्वींच्या श्लोकांत सांगितलेंच आहे. ३५

छंदोगपरिशिष्टे—सदोपवीतिना भाव्यं सदाबद्धशिखेन च । विशिखोऽप्युपवीतश्च यत्करोति न तत्कृतमिति ॥ ३६ ॥ भृगुः—ब्रम्हसूत्रे च सव्येंऽसे स्थिते यज्ञोपवीतिता । प्राचीनावीतिताऽसव्ये कंठस्थे तु निवीतितेति ॥ ३७ ॥ मनुः—ब्रम्हणः प्रणवः कुर्यादादावंते च सर्वदा । स्रवत्यनोंकृतं पूर्वं परस्ताच्च विशीर्यतीति ॥ ३८ ॥ आपस्तंबः—तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः । प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रम्हवादिनामिति ॥ ३९ ॥ मार्कंडेयः—संकल्पं च यथाकुर्यात्स्नानदानव्रतादिके । अन्यथा पुण्यकर्माणि निष्फलानि भवंति चेति ॥ ४० ॥

**छंदोगपरिशिष्टांत**--नेहमीं द्विजाचें ब्रम्हसूत्र (जानवें) उपवीत (पुढील श्लोकांत सांगावयाच्या लक्षणाचें) असावें आणि शिखा (शेंडी) बांधलेली असावी. त्यांत विशेषेंकरून विहितकर्मकाळीं तर हीं दोनही असलींच पाहिजेत. कारण, उपवीत आणि शिखाबंध असल्यावाचून जें पुण्यकारक कर्म करावें तें निष्फळ होतें. ३६ **भृगु**--ब्रह्मसूत्र ह्मणजे जानवें, हें सव्येंसे ह्मणजे डाव्या खांद्यावर असून शरिराच्या दक्षिणोर्ध्वभागास वेष्टित असलें तर त्यास यज्ञोपवीत (उपवीत-सव्य) असें म्हणतात. उजव्या खांद्यावर असून शरीराच्या डाव्या भागाच्या वरच्या भागास वेष्टित असतां प्राचीनावीत (अपसव्य) असें ह्मणतात. कंठवेष्टित अग्रभागीं माळेसारखें असल्यास निवीत असें ह्मणतात. हेंच ब्रह्मसूत्र प्रायः यज्ञोपवीत असतें ह्मणून ह्यास योगरूढीनें सामान्यतः यज्ञोपवीत असेंही ह्मणतात. ३७ **मनु**—वेदपठनाच्या पूर्वीं आणि वेदपठनानंतर ओम् असें उच्चारण करावें. "द्रव पदार्थ रीतीनें हेतु सांगतो." वेदपठनाच्या पूर्वीं (खालीं) ओंकार केला नसल्यास स्रवतें, आणि वेदपठनाच्या पश्चात् (वरतीं) ओंकार केला नसल्यास विशीर्ण होतें. जसा एखादा उदकादि द्रव (पातळ) पदार्थ त्यास पाहिजे तसें आस्तरणाच्छादन नसल्यानें तो गळतो किंवा सुकतो, वेदपठनजन्य फळही तसेंच होय. ३८ **आपस्तंब**--परब्रह्मवाचक ओंकार आहे म्हणून नेहमीं ब्राह्मणांनीं प्रणवोच्चारण करून यज्ञ, दान, तप इत्यादि शास्त्रविहित क्रियांचा आरंभ करावा. ३९ **मार्कंडेय**—ज्या फळाच्या उद्देशानें जें स्नान, दान, व्रत, इत्यादि विहितकर्म करावयाचें तें कर्म करण्यापूर्वीं त्या फळाच्या प्राप्ती-

करितां, अमुक फळाकरितां अमुक कर्म करतों असा संस्कृत भाषेनें उदकपूर्वक संकल्प करावा. संकल्प केल्याशिवाय पुण्यकर्में केलीं असतां निष्फळ होतात. ४०

माधवीये—ईश्वरोदेशकालात्मा चिंतनीयः स कर्मस्विति ॥४१॥ गर्गः—तिथिनक्षत्रवारादि साधनं पुण्यपापयोः। प्रधानगुणभावेन स्वातंत्र्येण न ते क्षमा इति ॥४२॥ मनुः—कामात्मता न प्रशस्ता न चैवेहास्त्यकामता। काम्योहि वेदाधिगमः कर्मयोगश्च वैदिक इति ॥ ४३ ॥

**माधवकृतग्रंथांत** – विहितकर्में कर्तव्य असतां शास्त्रमर्यादेनें ज्या प्राप्यदेशकालांची प्रवृत्ति असेल त्यांचें संकल्पाच्या वेळीं 'अमुक देशांत अमुक काळीं, असें संस्कृत भाषेनें उच्चारण करावें. देश व काळ हीं ईश्वराचीं स्वरूपें आहेत, म्हणून त्यांच्या चिंतनानें ईश्वराचेंच चिंतन होतें. ४१ " ज्याप्रमाणें सुंठ, मध इत्यादि अनुपानांनीं पारद, ताम्र इत्यादि रसायणांचे गुणदोष अधिकाधिक आणि चिरस्थायी होतात, आणि ज्याप्रमाणें प्र, परा इत्यादि उपसर्गांनीं श्वादिक धातूंची अर्थबोधकशक्ति विलक्षण होते; केवळ अनुपानें विशेष गुणदोषांविषयीं समर्थ होत नाहींत, व केवळ प्रपरादि निपात अर्थबोधक शक्तींविषयीं समर्थ होत नाहींत, त्याप्रमाणें ज्या पुण्यपापकर्मांविषयीं ज्यांचा महिमा शास्त्रांत वर्णित आहे अशा समस्त किंवा व्यस्त देशकाळांत जें पुण्यकर्म अथवा पापकर्म करावें, त्याचें फळ देशकालांच्या योग्यते प्रमाणें अधिकाधिक होतें असें सांगतो. " **गर्ग**—एकादशी, ग्रहणादि काल, कुरुक्षेत्र गंगातीरादि देश हे पुण्यकर्माच्या अथवा पापकर्माच्या फलाधिक्याविषयीं अंगागीभावानें साधन होत. देशकाल हे पुण्यपापकर्मांचे अवयव असल्यानें त्या कर्मांवाचून पुण्यपापाविषयीं स्वतंत्रतेनें ते समर्थ होत नाहींत. ४२ **मनु**—ह्या जगतांत निष्काम कर्में कोणीच करीत नाहीं, कारण वेदांचें अध्ययन आणि यज्ञादि वैदिक धर्मसंबंधही काम्य म्हणजे इच्छाविषयच आहे, परंतु स्वर्गादिफळांच्या अभिलाषानें अनुष्ठित केलेलीं काम्यकर्में कर्मानुरूप स्वर्गादिकांच्या उपभोगानंतर जन्मादिदुःखास निमित्त होतात, म्हणून तीं प्रशस्त नव्हत. स्वर्गादिफळांच्या अभिलाषा वाचून केलेलीं नित्य व नैमित्तिक कर्में आत्मज्ञानाच्या योगानें मोक्षाविषयीं समर्थ होतात, म्हणून तींच प्रशस्त होत. ४३

ब्राम्हे—ब्रम्हण्याधाय कर्माणि निःसंगः कामवर्जितः ।
प्रसन्नेनैव मनसा कुर्वाणो याति तत्पदमिति ॥ ४४ ॥
याज्ञवल्क्यः—आर्षं छंदश्च दैवत्यं विनियोगं तथैव च ।
वेदितव्यं प्रयत्नेन ब्राम्हणेन विशेषत इति ॥४५॥ शौनकः—
यस्य वाक्यं स ऋषिर्या तेनोच्यते सा देवता यदक्षरपरिमाणं
तच्छंद इति ॥४६॥ पाणिनीयशिक्षायाम्—माधुर्यमक्षरव्यक्तिः
पदच्छेदस्तु सुस्वरः ॥ धैर्यं लयसमर्थं च षडेते पाठका गुणा
इति ॥ ४७ ॥

**ब्रह्मपुराणांत**—निःसंग म्हणजे कोणत्याही कर्मांत अन्य कर्माचा अभिनिवेश न करतां धनपुत्रादि इच्छारहित केवळ ब्रह्मार्पण बुद्धीनें प्रसन्नांतःकरणानें विहितकर्में करणारा ब्रह्मपदास प्राप्त होतो. ४४ **याज्ञवल्क्य**—कर्मामध्यें ज्या मंत्राचा उच्चारण प्रसंग असेल त्याच्यापूर्वीं त्या मंत्राचे ऋषि, देवता, छंद आणि कोणत्या कर्माकडे त्याचा उपयोग करावयाचा ह्याचें द्विजांनीं अर्थज्ञानपूर्वक उच्चारण करावें. त्यांत ब्राह्मणानें तर अवश्य केलेंच पाहिजे. ४५ **शौनक**—ज्यास प्रथमतः ज्या मंत्राचा उपदेश झाला आहे तो त्या मंत्राचा ऋषि, ज्या मंत्रांत ज्या देवतेचें स्तवन आहे त्या मंत्राची ती देवता, आणि गायत्र्यादि छंदांचा जो अक्षरनियम आहे त्यांपैकीं ज्या छंदाच्या नियमाप्रमाणें ज्या मंत्राचा अक्षरनियम आहे त्या मंत्राचा तो छंद होय. ह्याचें प्रयोजन पूर्व श्लोकांत सांगितलें आहे. ४६ “ कर्मामध्यें मंत्रादिपठन प्रसंगीं पठन करणारानें पाठाविषयीं कोणत्या गुणांचा अवश्य स्वीकार केला पाहिजे हें सांगतो. ” **पाणिनिशिक्षेंत**—ज्या वर्णोच्चारण समकालीं कर्णेंद्रियास सुख होतें त्या वर्णगुणास माधुर्य (मधुरगुण) असें म्हणतात, हा एक गुण. एक मात्रादिकाल, व्यंजनादिसंधि, यम, ताल्वादिस्थानें इत्यादिकांच्या तारतम्यानें अक्षराचें जें उच्चारण व्हावयाचें तें होणें, आणि परस्पर अक्षरांमध्यें जो व्यवस्थित कालनियम असावयाचा तो असणें, ह्या गुणास अक्षरव्यक्ति असें म्हणतात, हा दुसरा गुण. संधि, उदात्तानुदात्त इत्यादिकांच्या विभागनियमा प्रमाणें अत्यंत सन्निकर्षरूपसंहितेच्या विकल्पविषयस्थळीं ऱ्हस्वदीर्घादिकांचा न्यूनाधिकभाव न होतां युक्तीनें उच्चारणाचा विराम करणें, ह्या गुणास पदच्छेद असें म्हणतात, हा तिसरा गुण. ऱ्हस्वदीर्घप्लुतनिष्ठ उदात्तादिकांचा ताल्वादि ऊर्ध्वाधर भागांनीं भेद दर्शविणें, त्या गुणास सुस्वर

असें म्हणतात, हा चवथा गुण. भय, शोक प्रमादोन्मादादिकेंकरून कंपादिविकार न होतां उच्चारण करणें ह्या गुणास धैर्य असें म्हणतात, हा पांचवा गुण. आणि ज्या त्रुट्यादिनियमितकालास अवलंबून मंत्रादिकांचा आरंभ केला असेल, त्याच नियमानें समाप्ति करणें, ह्या गुणास लयसमर्थ (लयासहित साम्यसमर्थ) असें म्हणतात, हा सहावा गुण. हे सहा गुण म्हणणाराच्या अंगीं असावे. ४७

मनुः—वेदोपकरणे चैव स्वाध्याये चैव नैत्यिके । नानुरोधोऽस्त्यनध्याये होममंत्रेषु चैव हीति ॥ ४८ ॥ हारीतः—अनुष्ठितं तु यद्देवैर्मुनिभिर्यदनुष्ठितम् । नानुष्ठेयं मनुष्यैस्तत्तदुक्तं कर्म आचरेदिति ॥ ४९ ॥

## इत्युपोद्घातः

---

" संध्यादि नित्य कर्मांविषयीं प्रतिपदादिनिमित्तिक अध्ययनाचा निषेध नाहीं असें सांगतो " मनु—नित्य कर्मांतील मंत्रांच्या पठनाविषयीं अनध्यायकालनिमित्तिक प्रतिबंध नाहीं. उदाहरण—उपाकर्म, ब्रह्मयज्ञ, होम ह्यांतील मंत्रांचा पाठ यथोक्तनियमाप्रमाणें करावा. ४८ " विश्वामित्र पराशरादि ऋषींनीं आणि ब्रह्मदेवप्रभृतिदेवांनीं जसें लोहपिष्टभक्षणादिनिग्रहपूर्वक तपश्चर्येनें सुकृत संपादन केलें, अथवा जशी अयाज्ययाजनादि दुष्कर्मांकडे प्रवृत्ति केली, तसें करण्यास अल्पशक्ति मनुष्य योग्य नाहीं. कारण, त्यांस पूर्वार्जित महापुण्यसंपत्तीनें दुष्कर्मजन्यप्रत्यवायापासून निवृत्त होण्याची अथवा महापुण्यौघसंपादनाकरितां अत्युत्कट तपश्चर्या करण्याची शक्ति होती. अल्पशक्ति मनुष्य जरी सुकृताच्या संचयार्थ लोहपिष्टभक्षणासारखें घोरकर्म करील तरी तें संकल्पितकर्म सिद्धीस न जातां आत्महननादिकांच्या पापास मात्र पात्र होईल. यथार्थवेदतत्वज्ञातृत्व, शक्ताशक्ततारतम्यविचार आणि सत्यवक्तृत्व हे गुण देवादिकांच्या अंगीं असल्यानें त्यांनीं उपकारबुद्धीनें सांगितलेलें वचनच प्रमाण मानावें हें युक्त आहे, ह्याविषयीं सांगतो. हारीत—देवांनीं किंवा ऋषींनीं जें कर्म आचरिलें (केलें) तें न आचरितां (करतां) त्यांनीं सांगितलेलें मात्र कर्म आचरावें (करावें). ४९

ह्याप्रमाणें उपोद्घातप्रकरण [ समाप्त झालें. ]

---

## अथ प्रबोधः

**आश्वलायनः**—अथोच्यते गृहस्थस्य नित्यकर्म यथाविधि । यत्कृत्वानृण्यमाप्नोति दैवात्पित्र्याच्च मानुषात् ॥ १ ॥ **मनुः**—ब्राम्हे मुहूर्ते बुध्येत धर्मार्थावनुचिंतयेत् । कायक्लेशांश्च तन्मूलान्वेदतत्वार्थमेव च ॥ २ ॥ **विष्णुपुराणे**—रात्रेः पश्चिमयामस्य मुहूर्तोयस्तृतीयकः । स ब्राह्म इति विज्ञेयो विहितः स प्रबोधने ॥ ३ ॥ **अंगिराः**-उत्थाय पश्चिमे यामे रात्रिवासः परित्यज्येत् । प्रक्षाल्य हस्तपादास्यमुपस्पृश्य हरिं स्मरेदिति ॥ ४ ॥

आतां प्रबोध म्हणजे जागृत होणें, आणि त्यावेळीं करावयाचें ईश्वर चिंतनादि हें प्रकरण सांगतो **आश्वलायन**—गृहस्थानें जें कर्म केलें असतां देव, पितर आणि मनुष्य ह्यांच्या ऋणापासून तो मुक्त होतो, तें वेदवाक्यानुसारि नित्य कर्म सांगतों. जसा पुत्र जन्मतःच पित्याच्या रिक्थ ऋणांचा अधिकारी होतो, तसा गृहस्थ विवाहसमकालीं देवादिऋणांचा अधिकारी होतो. म्हणून त्यानें ब्रह्मयज्ञादि नितकर्मांनें त्या ऋणापासून मुक्त झालें पाहिजे. १ **मनु**—पुढील श्लोकांत सांगावयाच्या ब्राम्हमुहूर्तकाळीं जागृत होऊन कोणत्या मार्गानें धर्म व अर्थ संपादित होतील, धमार्थ संपादित करण्यास शरीराला क्लेश किती आहेत, कारण जिकडून अल्पायासानें अनिंदित महाधर्मार्थ साधित होतील ती सरणि स्वीकारावी हा न्याय आहे, विशेषेंकरून वेदतत्वार्थ म्हणजे परमात्मा ह्यांचें चिंतन करावें. ब्राम्हमुहूर्तांत जागृतिसमकालीं बुद्धीचें स्वास्थ्य असतें म्हणून चिंतनाविषयीं हाच मुख्य काळ होय. धर्मसंपादनपूर्वक अर्थ संपादन म्हटलें म्हणजे न्यायानेंच अर्थसाधन होईल ह्याविषयीं पृथक् सांगणें नको. धर्मार्थमूलक कामप्राप्ति आणि परमात्मज्ञानानें कैवल्यप्राप्ति होईल; म्हणून चतुर्विधपुरुषार्थसाधनविधिबोधक ही स्मृति आहे २ **शिवपुराणांत**—रात्रीच्याच प्रहराच्या तिसऱ्या मुहूर्तास (प्रहराचे मुहूर्त चार असतात) ब्राह्ममुहूर्त असें म्हणतात. ह्या मुहूर्तांत जागें व्हावें. ३ **अंगिरा**—रात्रीच्या शेवटच्या प्रहरांत उठून रात्रीं नेसलेलें वस्त्र सोडून दुसरें नेसावें, आणि हात, पाय, व तोंड यांचें साधारणतः प्रक्षालन करून डोळे, नाक आणि कान ह्यांस पाणी लावून हरिस्मरण करावें. ४

आगमे— ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय चिंतयेद्रघुनंदनम्। श्रीपूर्वं-जयमध्यस्थं द्विर्जयांतं विचक्षण इति ॥ ५ ॥ ऋग्विधाने— प्रातरग्निमिति सप्तर्चं सूक्तं पठेदिति ॥ ६ ॥ कात्यायनः— श्रोत्रियं सुभगं गां च अग्निमग्निचितिं तथा। प्रातरुत्थाय यः पश्येदापद्भ्यः स प्रमुच्यते ॥ ७ ॥ रोचनां चंदनं गंधान्मृदंगं दर्पणं मणिम्। गुरुमग्निं रविं पश्येन्नमस्येत्प्रातरेवहि ॥ ८ ॥ पापिष्ठं दुर्भगं चांधं नग्नंमुत्कृत्तनासिकं। प्रातरुत्थाय यः पश्ये-त्तत्कलेरुपलक्षणम् ॥ ९ ॥

**आगमांत**—ज्ञात्यानें ब्राह्ममुहूर्तावर उठून रामाचें स्मरण करावें तें असें—श्री शब्द ज्याच्या पूर्वी आहे व जय शब्द ज्याच्या मध्यें आहे आणि पुन्हा दोनदां जय शब्दाच्या शेवटीं असा तेरा अक्षरांचा मंत्र होतो. श्रीराम जयराम जयजयराम हा मंत्र प्रयोगांत स्पष्ट लिहिला आहे. (पृष्ठ २३ पहा.) ५ **ऋग्विधानांत**—प्रातरग्नि अशी प्राथमिक आनुपूर्वी ज्यास आहे अशा सात ऋचांचे सूक्ताचा प्रातःकाळीं जप करावा ६. **कात्यायन**—जो प्रातःकाळीं उठून वेदाध्ययन करणारा (वैदिक), भाग्यवान्, गाय, अग्नि व अग्निहोत्री ह्यांस अवलोकन करील, तो आपत्तीं पासून मुक्त होईल ७. गोरोचन, चंदन, सुगंध पदार्थ, मृदंग, आरसा, हिरा मोती वगैरे रत्न, गुरु, अग्नि आणि सूर्य ह्यांस प्रातःकाळीं अवश्य अवलोकन करून नमस्कार करावा. ८ जो प्रातःकाळीं उठून, पातकी, दुर्भाग्य, आंधळा, नागवा व ज्याचें नाक कापलेलें आहे ह्यांस पाहील, तें त्यास कलहाचें मूळ होय. ९

श्रीगणेशायनमः ॥ अथ प्रातःस्मरणीयम् ॥ (व्यासः)
महर्षिर्भगवान् व्यासः कृत्वेमां संहितां पुरा। श्लोकैश्चतुर्भिर्धर्मात्मा पुत्रमध्यापयच्छुकम् ॥ १ ॥

श्रीगणेशायनमः प्रातःकाळीं स्मरण करावयाचें तें सांगतो. ( हें सर्व प्रातःस्मरण व्यासानें केलेलें आहे ) पूर्वी महाऋषि भगवान् धर्मस्वरूपी व्यासांनीं ही ( पुढें सांगण्यांत येणारी ) चतुःश्लोकी वाक्यरचना करून तिचें चिंतन आपल्या शुक नांवाच्या पुत्राकडून करविलें. १

**मातापितृसहस्राणि पुत्रदारशतानि च । संसारेष्वनुभूतानि यांति यास्यंति चापरे ॥ २ ॥ हर्षस्थानसहस्राणि भयस्थानशतानि च । दिवसे दिवसे मूढमाविशंति न पंडितं ॥ ३ ॥ ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोतु मे। धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥४॥ न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः । धर्मोनित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥ ५ ॥**

. संसारामध्यें जीव मात्र हजारों मातापितरांचा आणि शेंकडों स्त्रीपुत्रादिकांचा अनुभव घेते झाले, घेतात आणि घेतील. २ प्रत्यहीं हजारों हर्षाचीं (ऐहिक सुखांची) कारणें आणि शेंकडों भयाचीं कारणें मूढास म्हणजे मायावृत होऊन स्त्रीपुत्रादि क्षणिक सुखाविषयीं आसक्त झालेल्यास प्राप्त होतात. पंडितास म्हणजे ब्रम्हज्ञानानें संसाराविषयीं मिथ्यात्व मानणारास प्राप्त होत नाहींत. ३ सर्वांस समजण्याकरितां हात ऊंच करून मी ओरडून सांगतों कीं, धर्मापासून अर्थ, काम आणि मोक्ष प्राप्त होतात. म्हणून धर्मसंपादन कां करीत नाहीं ? हें माझें भाषण कोणीही ऐकणार नाहीं काय ! ४ केव्हांही कामाच्या स्वाधीन होऊन धर्माचा म्हणजे पुण्याचा अथवा पुण्यास कारणभूत असणाऱ्या विहितकर्माचा त्याग करूं नये. कारण, धर्मापासून संसारामध्यें पुन्हा परावर्तन होत नाहीं असा सच्चिदानंदस्वरूपीं लीनतारूप मोक्ष प्राप्त होतो. म्हणून धर्म हाच अक्षय आहे, आणि कामिक प्रवृत्तीनें सुख प्राप्त होतें किंवा न होतें हा संशय. कदाचित् प्राप्त झालें तर तें क्षणिक होय. म्हणून सांशयिक अल्प सुखाकरितां निश्चित महासुखाचा त्याग करणें हें अयोग्य आहे. कधींही धननाशादि दुःखाच्या भयानें धर्म सोडूं नये. धर्मसंरक्षणापासून पुन्हा धनादिकांची प्राप्ति झाली असतां दुःख नाहींसें होतें. म्हणून दुःखही नित्य नाहीं. कधींही धनपुत्रादि सृष्ट पदार्थ चिरकाल टिकणारे नसल्यामुळें त्यांपासून होणारें सुखही चिरकाळ रहाणारें नसतें, आणि पुत्रादिकांविषयीं स्वतंत्रास्वतंत्रतेचा संदेह असल्यानें त्यांच्या लोभानेंही धर्म टाकूं नये. जीव म्हणजे आत्मा हा उत्पत्ति व नाश यांनीं रहित असा आहे, आणि ह्याचा जीवव्यवहार (जन्मीव्यवहार) प्राप्त होण्याचा हेतु म्हणजे अज्ञाननिमित्तक पंचभूतात्मक देहोपाधि हा अनित्य (नाशवंत) आहे. देहोपाधिविशिष्टजीवाच्या रक्षणार्थ धर्माची हानि केली तरी देहाचा नाश व्हावयाचाच व आत्माच्या रक्षणास्तव धर्माची हानि

न केली तरी तो अविनाशीच आहे. ह्याकरितां जीवित्वस्थितीच्या निमित्तानेंही धर्माचा अनादर करूं नये ५.

इमां भारतसावित्रीं प्रातरुत्थाय यः पठेत् । स भारतफलं प्राप्य परं ब्रम्हाधिगच्छति ॥ ६ ॥ प्रातःस्मरामि भवभीति-महार्तिशांत्यै नारायणं गरुडवाहनमंजनाभं । ग्राहाभिभूतवर-वारणमुक्तिहेतुं चक्रायुधं तरुणवारिजपत्रनेत्रम् ॥ ७ ॥ प्रातर्नमामि मनसा वचसा च मूर्ध्ना पादारविंदयुगुलं परमस्य पुंसः । नारायणस्य नरकार्णवतारणस्य पारायणप्रवणविप्र-परायणस्य ॥ ८ ॥ प्रातर्भजामि भजतामभयंकरं त प्राक्सर्व-जन्मकृतपापभयापहत्यै । योग्राहवक्त्रपतितांघ्रिगजेंद्रघोरशोक-प्रणाशमकरोध्द्दतशंखचक्रः ॥ ९ ॥ श्लोकत्रयमिदं पुण्यं प्रातःप्रातः पठेन्नरः । लोकत्रयगुरुस्तस्मै दद्यादात्मपदं हरिः ॥ १० ॥

अरुणोदयकाळीं जागृत होऊन ह्या ( चतुःश्लोकीरूप ) भारत सावित्रीचें म्हणजे भारतांतील सवितृब्रह्मद्योतकवार्णीचें जो चिंतन करील, तो भारतज्ञानाचें जें धर्माधर्माविषयीं आदरानादरात्मक फळ त्या फळास प्राप्त होऊन मुक्त होईल. ६ प्रातःकाळीं मी पुनर्जन्माची भीति आणि प्राप्तजन्माची महापीडा ह्यांच्या नाशाकरितां गरुडवाहनाचा, श्यामवर्ण, नक्रानें पराभव केलेल्या गजेंद्राच्या मुक्तीविषयीं कारणभूत, चक्र ज्याचें आयुध आहे आणि प्रफुल्लित कमलपत्रासारखे ज्याचे डोळे आहेत अशा नारायणाचें चिंतन करतों. ७ प्रातःकाळीं मी मनानें, वाणीनें, आणि मस्तकानें परम पुरुष, नरकसमुद्रा पासून तारणारा, वेदादिकांच्या पारायणाविषयीं आसक्त असलेले विप्र हेच ज्याचें श्रेष्ठ वसतिस्थान आहे अशा नारायणाच्या चरणकमलयुगुलास वंदन करतों. ८ प्रातःकाळीं मी पूर्वीं सर्व जन्मांत केलेल्या पापांचा परिणाम दुःखरूपी होईल, ह्या भयाच्या नाशाकरितां भक्तांस अभय करणारा, जो शंखचक्रधारण-करणारा, नक्राच्या मुखांत ज्याचा पाय सापडला आहे अशा गजेंद्राच्या भयंकर शोकाचा नाश करता झाला त्या नारायणाचें भजन करतों. ९ दररोज सकाळीं जो मनुष्य पुण्यकारक असे हे तीन श्लोक श्रद्धाभक्तींनीं पठन करील त्यास त्रैलोक्यांत श्रेष्ठ असा हरि आपलें पद देईल. १०

प्रातःस्मरामि भवभीतिहरं सुरेशं गंगाधरं वृषभवाहनमं-बिकेशं। खट्वांगशूलवरदाभयहस्तमीशं संसाररोगहरमौषधम-द्वितीयं ॥ ११ ॥ प्रातर्नमामि गिरिशं गिरिजार्धदेहं सर्गस्थि-तिप्रलयकारणमादिदेवं। विश्वेश्वरं विजितविश्वमनोभिरामं संसाररोगहरमौषधमद्वितीयं ॥१२॥ प्रातर्भजामि शिवमेकमनं-तमाद्यं वेदांतवेद्यमनघं पुरुषं महांतं। नामादिभेदरहितं षडभावशून्यं संसाररोगहरमौषधमद्वितीयम् ॥ १३ ॥ प्रातः समुत्थाय शिवं विचिंत्य श्लोकत्रयं येऽनुदिनं पठंति। ते दुःखजातं बहुजन्मसंचितं हित्वा पदं यांति तदेव शंभोः ॥१४॥ प्रातःस्मरामि गणनाथमनाथबंधुं सिंदूरपूर्णपरिशोभितगं-डयुग्मं ॥ उद्दंडविघ्नपरिखंडनचंडदंडमाखंडलादिसुरनायकवृंद-वंद्यम् ॥ १५ ॥

प्रातःकाळीं, प्राप्त होणाऱ्या संसारभयाचा हरणकर्ता, देवांत श्रेष्ठ, गंगेस धारण करणारा, नंदी ज्याचें वाहन आहे असा पार्वतीचा पति, खट्वांग, त्रिशूल, वरदमूद्रा आणि अभयमुद्रा यांनीं ज्याचे हात युक्त आहेत असा संसाररूपीरोगाचा नाश कर-णारें अद्वितीय असें औषध अशा ईश्वराचें मी स्मरण करतों. ११ कैलासनाथ, अर्धांगीं ज्याच्या पार्वती आहे असा, उत्पत्ति, स्थिति व संहार यांस कारणभूत, स्वयंभू, कामास जिंकणारा, अशा विश्वेश्वरास नमस्कार करतों. १२ सत्य, व्यापक, अनादि, उपनिषदादिवेदांताभ्यासानें जाणण्यास योग्य, निष्कलंक, महापुरूष, वस्तुतः नामरूपादिविकारशून्य, ब्रह्मस्वरूपी, प्रागभावादि सहा अभावें करून रहित अशा शिवाचें भजन करतों. १३ दररोज प्रातःकाळीं उठून ह्या तीन श्लोकांचें शिवध्यानचिंतनपूर्वक जे पठन करतील, ते बहुत जन्मांत पापरूपानें संचित केलेल्या होणाऱ्या दुःखमात्रांचा त्याग त्याग करून शंभुपदास प्राप्त होतील. १४ अनाथांचा नाथ, शेंदुरानें परिपूरित म्हणून शोभणारें ज्याचें गंडस्थलयुगुल आहे असा, प्रचंड विघ्नांच्या खंडनाविषयीं ज्याचा भयंकर दंड आहे असा व इंद्रादि देवनायकांचा समु-दाय ज्याचें वंदन करतो अशा गणपतीचें प्रातःकाळीं स्मरण करतों. १५

प्रातर्नमामि चतुराननवंद्यमानमिच्छानुकूलमखिलं च वरं दधानम् ॥ तं तुंदिलं द्विरसनाधिपयज्ञसूत्रं पुत्रं विलासचतुरं शिवायोःशिवाय ॥ १६ ॥ प्रातर्भजाम्यभयदं खलु भक्तशोकदावानलं गणविभुं वरकुंजरास्यम्। अज्ञानकाननविनाशनहव्यवाहमुत्साहवर्धनमहं सुतमिश्वरस्य ॥ १७ ॥ श्लोकत्रयमिदं पुण्यं सदा साम्राज्यदायकम् ॥ प्रातरुत्थाय सततं यः पठेत्प्रयतः पुमान् ॥ १८ ॥ प्रातःस्मरामि खलु तत्सवितुर्वरेण्यं रूपं हि मंडलमृचोऽथ तनुर्यजूंषि । सामानि यस्य किरणाः प्रभवादिहेतुं ब्रह्माहरात्मकमलक्ष्यमचिंत्यरूपम् ॥ १९ ॥ प्रातर्नमामि तरणिं तनुवाङ्मनोभिर्ब्रह्मेंद्रपूर्वकसुरैर्नुतमर्चितं च । वृष्टिप्रमोचनविनिग्रहहेतुभूतं त्रैलोक्यपालनपरं त्रिगुणात्मकं च ।२०। प्रातर्भजामि सवितारमनंतशक्तिं पापौघशत्रुभयरोगहरं परं च । तं सर्वलोककलनात्मककालमूर्तिं गोकंठबंधनविमोचनमादिदेवं ॥ २१ ॥

ब्रम्हदेव ज्याची स्तुति करतो, सर्वांस अभिलषित वर देणारा, लंबोदर, नागयज्ञोपवीती, बाललीलेविषयीं चतुर अशा शिवपार्वतीच्या पुत्रास कल्याणासाठीं नमस्कार करतों. १६ अभय देणारा, भक्तांच्या शोकाचा नाश करण्याविषयीं दावाग्नि, गणपति, गजानन, अज्ञानारण्याचा नाश करण्याविषयीं अग्नि, उत्साहाची वृद्धि करणारा, अशा शिवपुत्राचें मी भजन करतों. १७ नित्य जो प्रातःकाळीं उठून शुचिर्भूत होऊन ह्या पुण्यरूप तीन श्लोकांचें पठन करील त्यास सर्वदा सार्वभौम पदवी प्राप्त होईल. १८ ऋग्वेद हेंच ज्याचें मंडल, यजुर्वेद हाच ज्याचा देह, सामवेद हा ज्याचे किरण, उत्पत्ति, स्थिति व लय ह्यांस कारण, ब्रम्हविष्णुमहेश्वरात्मक, चर्मचक्षूनें समजण्यास अशक्य आणि अंतःकरणानेंही चिंतन करण्यास अशक्य, अशा सवित्याच्या त्या श्रेष्ठ रूपाचें स्मरण करतों. १९ ब्रम्हदेवप्रभृतिदेवांनीं स्तवन केलेला व पूजिलेला, वृष्टीच्या मोक्षबंधनांचा हेतुभूत, त्रैलोक्यपालनकर्ता, परब्रम्हस्वरूप असून रजस्तमःसत्वगुणांचा आश्रय अशा सूर्यास कायावाचामनानीं नमस्कार करतों. २० जो अनंतशक्तिमान्, पापसमुदाय शत्रु व रोग ह्यांचा नाश करणारा, श्रेष्ठ, सर्व लोकांच्या आकलनाविषयीं कालरूपी ज्याची मूर्ति आहे असा, ज्याच्या यागानें गाईंच्या कंठाचें बंधन व विमोचन होतें व जो अनादि आहे अशा त्या सवित्याचें प्रातःकाळीं भजन करतों. २१

श्लोकत्रयमिदं भानोः प्रातः प्रातः पठेत्तु यः । स सर्वव्याधिनिर्मुक्तः परमं सुखमाप्नुयात् ॥ २२ ॥ प्रातर्भजामि शरदिंदुकरोज्वलाभां सद्रत्नवत्सकलकुंडलहारभूषां । दिव्यायुधोर्जितसुनीलसहस्रहस्तां रक्तोत्पलाभचरणां भवतीं परेशाम् ॥ २३ ॥ प्रातर्नमामि महिषासुरचंडमुंडशुंभासुरप्रमुखदैत्यविनाशदक्षां । ब्रह्मेंद्ररुद्रमुनिमोहनशीललोलां चंडीं समस्तसुरमूर्तिमनेकरूपाम् ॥ २४ ॥ प्रातर्भजामि भजतामभिलाषदात्रीं धात्रीं समस्तजगतां दुरितापहंत्रीं । संसारबंधनविमोचनहेतुभूतां मायां परां समधिगम्य परस्य विष्णोः ॥२५॥ श्लोकत्रयमिदं देव्याश्चंडिकायाः पठेन्नरः । सर्वान्कामानवाप्नोति विष्णुलोके महीयते ॥ २६ ॥ प्रातर्भजामि रघुनाथमुखारविंदं मंदस्मितं मधुरभाषि विशालभालं । कर्णावलंबिचलकुंडलशोभिगंडं कर्णांतदीर्घनयनं नयनाभिरामं ॥ २७ ॥

जो निरंतर प्रातःकाळीं सूर्याचे हे तीन श्लोक म्हणेल त्याचे सर्व रोग दूर होऊन त्यास परमसुख प्राप्त होईल. २२ हे देवि, शरच्चंद्रा स.रखी जिची कांति आहे, उत्तम रत्नखचित असे जिचे कुंडलहारादि सर्व अलंकार आहेत, दिव्यायुधांच्या धारणानें शक्तिमान् व नीलवर्ण असे जिचे सहस्र हात आहेत, रक्तकमळाच्या कांतिसारखी जिच्या चरणांची कांति आहे अशी जी तूं त्या तुझें चिंतन करतों. २३ महिषासुर, चंड, मुंड व शुंभासुर हे ज्यांत मुख्य आहेत अशा दैत्यांचा नाश करण्याविषयीं दक्ष असणारी, ब्रह्मदेव, इंद्र, रुद्र व मुनि ह्यांस मोहित करणारा असा चंचल जिचा स्वभाव आहे, संपूर्ण देवांच्या अंशांनीं जिची मूर्ति झाली व अनेक रूपें धारण करणारी अशा चंडीला नमस्कार करतों. २४ भक्तांना इच्छित देणारी, सर्व जगतांची उत्पादन कर्त्री, पापाचा नाश करणारी, संसारसंबंधी प्रवृत्ति व निवृत्ति यांविषयीं कारणभूत अशा परमात्मा जो विष्णु त्याच्या महामायेला शरणागत होऊन भजतों. २५ जो मनुष्य चंडिका देवीचे हे तीन श्लोक पठन करील तो इच्छित पदार्थांस मिळवून वैकुंठांत पूज्य होईल. १६ मंदहास्ययुक्त, मधुर भाषण करणारें, विस्तीर्ण ज्याचा भालप्रदेश आहे, कर्णांत असणाऱ्या चंचल कुंडलांनीं सुशोभित ज्याचे गाल आहेत, कर्णाच्या प्रांतभागापर्यंत ज्याचीं दीर्घ नयनें आहेत, अवलोकनास सुंदर, रामचंद्राच्या अशा मुखकमळाचें प्रातःकाळीं स्मरण करतों. २७

प्रातर्भजामि रघुनाथकरारविंदं रक्षोगणाय भयदं वरदं निजेभ्यः। यद्राजसंसदि विभज्य महेशचापं सीताकरग्रहणमंगलमाप सद्यः ॥२८॥ प्रातर्नमामि रघुनाथपदारविंदं वज्रांकुशादिशुभरेखिसुखावहं मे। योगींद्रमानसमधुव्रतसेव्यमानं शापापहं सपदि गौतमधर्मपत्न्याः ॥ २९ ॥ प्रातर्वदामि वचसा रघुनाथनाम वाग्दोषहारि सकलं शमलं निहंति। यत्पार्वती स्वपतिनासहभोक्तुकामा प्रीत्या सहस्रहरिनामसमं जजाप।३०। प्रातःश्रयेच्छ्रुतिनुतां रघुनाथमूर्तिं नीलांबुदोत्पलसितेतररत्ननीलां। आमुक्तमौक्तिकविशेषविभूषणाढ्यां ध्येयां समस्तमुनिभिर्जनमुक्तिहेतुम्॥ ३१ ॥ यः श्लोकपंचकमिदं प्रयतः पठेध्दि नित्यं प्रभातसमये पुरुषः प्रबुद्धः। श्रीरामकिंकरजनेषु स एव मुख्योभूत्वा प्रयाति हरिलोकमनन्यलभ्यम् ॥ ३२ ॥

जें राक्षस समुदायास भय देणारें, भक्तांना वर देणारें, जनक राजाच्या सभेंत महेश्वराच्या धनुष्याचा भंग करून तत्काळींच सीतेच्या पाणिग्रहणरूप मंगलास प्राप्त झालेलें अशा, रघुनाथाच्या करकमळाचें भजन करतों. २८ वज्र, अंकुश इत्यादिकांच्या शुभ रेषांनीं युक्त असलेलें, मला सुख देणारें, योगिश्रेष्ठांच्या अंतःकरणरूपी भ्रमरानें सेवित, अहल्येच्या शापाचें त्वरित नाश करणारें अशा रघुनाथाच्या पदकमलाचें वंदन करतों. २९ पार्वतीनें आपला पति जो शंकर त्याशीं उपभोग व्हावा म्हणून प्रीतीनें विष्णुसहस्रनामा प्रमाणें ज्याचा जप केला असें, जें वाचेच्या दोषाचें हरण करणारें, सर्व दुर्गंधाचा नाश करणारें, अशा त्या रामनामाचें वैखरीवाणीनें उच्चारण करतों. ३० वेदांनीं स्तवलेली, नीलमेघ, नीळकमल व इंद्रनीलमणि ह्यांच्या सारखी नीलवर्ण, आमुक्त म्हणजे जडित आहेत उत्तम मौक्तिकें ज्यांस, अलंकारांनीं युक्त, समस्त मुनि जिचें ध्यान करतात व लोकांच्या मुक्तीस कारणभूत अशा रघुनाथमूर्तीचा प्रातःकाळीं आश्रय करावा. ३१ जो पुरुष नित्य प्रातःकाळीं जागा होऊन नियमानें या पांच श्लोकांचा पाठ करील, तोच रामचंद्राच्या सेवकजनांमध्यें मुख्य होऊन भक्तां शिवाय दुसऱ्यास प्राप्त न होणाऱ्या अशा वैकुंठास जाईल. ३२

ब्रह्मा मुरारिस्त्रिपुरांतकारी भानुः शशी भूमिसुतोबुधश्च ।
गुरुश्च शुक्रः शनिराहुकेतवः कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥३३॥
भृगुर्वसिष्ठः क्रतुरंगिराश्च मनुः पुलस्त्यः पुलहश्च गौतमः ।
रैभ्योमरीचिश्च्यवनश्च दक्षः कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥३४॥
सनत्कुमारः सनकः सनंदनः सनातनोप्यासुरिपिंगलौ च ।
सप्त स्वराः सप्त रसातलानि कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातं ॥३५॥
सप्तार्णवाः सप्तकुलाचलाश्च सप्तर्षयोद्वीपवनानि सप्त । भूरादि
कृत्वा भुवनानि सप्त कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ ३६ ॥
पृथ्वी सगंधा सरसास्तथापः स्पर्शी च वायुर्ज्वलनं च तेजः ।
नभः सशब्दं महता सहैव कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ॥ ३७ ॥
इत्थं प्रभाते परमं पवित्रं पठेत्स्मरेद्वा शृणुयाच्च तद्वत् । दुःस्वप्न-
नाशस्त्विह सुप्रभातं भवेच्च नित्यं भगवत्प्रसादात् ॥ ३८ ॥
पुण्यश्लोको नलोराजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः। पुण्यश्लोका च
वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥ ३९ ॥

ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु आणि केतु हे माझें सुप्रभात ( शुभसूचक प्रातःकाळ ) करोत. प्रभात हें अहोरात्राचें उपलक्षण आहे. परमात्मचिंतनानें रात्रींतील दुष्ट स्वप्नादिकाच्या योगानें अनुमित अरिष्टाचा नाश होऊन कल्याणाची प्राप्ति व्हावी, हा इच्छेचा विषय होय. ३३ भृगु, वसिष्ठ इत्यादि धर्मादिनीतिप्रदर्शक बारा ऋषि माझें सुप्रभात करोत. ३४ सनत्कुमारादि सहा ब्रह्मवेत्ते ऋषि, सामादि गायनांत असणारे षड्जादि सात स्वर आणि पृथ्वींतील रजतादि धातूंचीं सात तळें माझें सुप्रभात करोत. ३५ नवनीतादि सात समुद्र, महेंद्रादि सात कुलपर्वत, कश्यपादि सात ऋषि, जंबुद्वीपादि सात द्वीपें व भूरादि सात भुवनें, हीं माझें सुप्रभात करोत. ३६ गंधगुणवती पृथ्वी, रसनेंद्रियग्राह्यरसगुणवान उदक, स्पर्शगुणवान वायु, उष्णस्पर्शवान तेज, शब्दगुणवान आकाश, आणि महत्तत्व हीं माझें सुप्रभात करोत. ३७ ह्या प्रकारच्या परमात्मगुणांचें जो पठन करील, स्मरण करील अथवा श्रवण करील, त्याचें भगवंताच्या प्रसादानें सुप्रभात होईल. येथें दुःस्वप्नसूचित अरिष्टाचा नाश होणें हाच सुप्रभात शब्दाचा अर्थ होय. ३८ पुण्यरूप ज्यांचें यश आहे अशा नळराजादिकांचें स्मरण करावें. त्यांच्या स्मरणानें ह्यांच्या सदाचरणाचें स्मरण होऊन त्याप्रमाणें वर्तन करणारा स्मरणकर्ता पुण्यवान होईल. ३९

अश्वत्थामा बलिर्व्यासो हनुमांश्च बिभीषणः । कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥ ४० ॥ सप्तैतान्संस्मरेन्नित्यं मार्कंडेयमथाष्टमं । जीवेद्वर्षशतं सोऽपि सर्वव्याधिविवर्जितः ॥ ४१ ॥ अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा । पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥ ४२ ॥ समुद्रवसने देवि पर्वतस्तनमंडले । विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥ ४३ ॥ श्रीरामजयरामजयजयराम ॥ ४४ ॥

अश्वत्थामादि सात चिरंजीव आणि मार्कंडेय ह्यांचें जो स्मरण करील तो सर्वव्याधिमुक्त होऊन शंभर वर्षें वाचेल. ४०-४१ अहल्यादि पांच पतिव्रतांचें स्मरण केलें असतां महापातकाचा नाश होईल. ४२ "पृथ्वी ही विष्णूची वशवर्तिनी आहे म्हणून स्त्रीरूपानें तिचें वर्णन करतो." समुद्र हेच जिचीं वस्त्रें आहेत, पर्वत जिचे स्तन आहेत, अशा प्रकारची हे देवि (गतिमति) हे विष्णुपत्नि तुला नमस्कार असो. माझ्या चरणांचा स्पर्श तुला होतो याची तूं क्षमा कर. ४३ देवतावाचक शद्वाचें श्रीशद्वपूर्वक उच्चारण करावें असा स्मृतिनियम आहे, अथवा श्री म्हणजे लक्ष्मी. ज्याविषयीं योगी परम सुखाकरितां रममाण होतात त्यास राम असें म्हणतात. लक्ष्मीचा सीतारूपानें आणि विष्णूचा रामरूपानें भूतलीं आविर्भाव झाला हें प्रसिद्ध आहे. म्हणूनच हे श्रीराम, म्हणजे हे सीतासहित रामा, जय म्हणजे सर्वोत्कर्षानें रहा. हे राम, जयजय म्हणजे माझ्या मायाजालाचा नाश कर. लक्ष्मीवाचक श्रीशद्व हें गौण विशेषण देण्याचें कारण, माया हें लक्ष्मीचें स्वरूप आहे, आणि लक्ष्मी तुझी स्वाधीन पत्नी आहे. ह्यास्तव मायेपासून माझी मुक्तता करण्यास तूं असमर्थ नाहींस. एक वेळां जयशद्वानें सर्वोत्कर्षानें रहा ही स्तुति आणि पुन्हा दोन वेळां जय शद्वानें मायेपासून मुक्त कर ही प्रार्थना आहे. जि धातु उत्कर्षाच्या अर्थांत अकर्मक व पराभवाच्या अर्थांत सकर्मक आहे. सकर्मकाच्या योगानें माया हें अध्याहृत कर्म आहे. कोणताही पदार्थ प्राप्त करून घ्यावयाचा असल्यास ज्यापासून तो घ्यावयाचा त्याची वारंवार संबोधनपूर्वक स्तुति करून याचनीय पदार्थाची मुद्रादिकानें किंवा वाणीनें वारंवार याचना करावी, हा लोकप्रसिद्ध न्याय आहे. ४४

प्रातरग्निमितिसप्तर्चस्य सूक्तस्य मैत्रावरुणिर्वसिष्ठऋषिः। भगो देवता आद्याया अग्नींद्रमित्रावरुणाश्विनभगपूषब्रह्मण-स्पतिसोमरुद्रा देवताः। अंत्याया उषा देवता त्रिष्टुप् छंदः आद्याया जगतीछंदः प्रातःस्मरणे विनियोगः ॥ ४५ ॥
ओं प्रातरग्निं प्रातरिंद्रं हवामहे प्रातर्मित्रावरुणा प्रातरश्विना। प्रातर्भगं पूषणं ब्रह्मणस्पतिं प्रातः सोममुत रुद्रं हुवेम॥ ४६ ॥
प्रातर्जितं भगमुग्रं हुवेम वयं पुत्रमदितेर्यो विधर्त्ता। आध्रश्चिद्यं मन्यमान स्तुरश्चिद्राजाचिद्यं भगं भक्षीत्याह ॥ ४७ ॥ भगप्र-णेतर्भगसत्यराधो भगे मांधियमुदवाददन्नः। भगप्रणोजनय गोभिरश्वैर्भगप्रनृभिर्नृवंतः स्याम ॥ ४८ ॥

प्रातरग्नि ह्या सात ऋचांच्या सूक्ताचा मित्रावरुणाचा पुत्र वसिष्ठ नांवाचा ऋषि, भग नांवाची देवता, प्रथम ऋचेची भगदेवता असून आणखी अग्नि इंद्र इत्यादि दहा देवता, आणि सातव्या ऋचेची उषा देवता, प्रथम ऋचेचा जगतीछंद व बाकीच्या सहा ऋचांचा त्रिष्टुप् छंद आणि प्रातःस्मरणाकडे उपयोग म्हणजे सांप्रत या सूक्तानें भगादि देवतांचें स्तुतिपूर्वक चिंतन करावयाचें. ४५ ओं म्हणजे ब्रह्म, प्रणवपूर्वक विहितक्रिया करावी असा उपोद्घातांत नियम लिहिला आहे. त्याची विशेष व्याख्या प्राणायाममंत्रांत लिहावयाची आहे. उषःकालीं स्तवन करणारे आह्मीं अग्निदेवास निमंत्रण करतों, आ-णखी मित्र, वरुण, देवांचे वैद्य अश्विनीकुमार, भग, पूषा, ब्रह्मणस्पति, सोम, व रुद्र ह्या देवांचें आव्हान करतों. ह्या मंत्रांत पृथक् पृथक् स्तुतिज्ञापनार्थ पुनः पुनः प्रातःशब्दाचा आणि दोनदां क्रियापदाचा प्रयोग केला आहे. ४६ जो जगताचा धारक, ज्याला इंद्रही ज्याला धनवान्ही आणि राजा देखील स्तवन करून मला धन दे असें बोलतो. त्या सर्वोत्कर्षानें रहाणाऱ्या, उद्यत, अशा अदितीच्या भग नांवाच्या पुत्रास प्रातःकाळीं आह्मीं निमंत्रण करतों. ४७ हे भगदेव, तूं महानायक आहेस, हे भग, तूं सत्यधन आहेस. हे भग, आमचे मनोरथ पूर्णकरून ही आमची स्तुति सफळ कर. हे भग, आह्मांस गाई आणि घोडे यांनीं युक्त कर. हे भग, तुझ्या प्रसादानें आह्मी उत्तम पुत्रादि जी मनुष्यसंपत्ति तिनें युक्त होऊं. ४८.

उतेदानीं भगवंतः स्यामो तप्रपित्व उतमध्येऽअह्नाम् । उतोदिता मघवन्त्सूर्यस्य वयं देवानां सुमतौ स्याम ॥ ४९ ॥ भगऽएव भगवाँऽअस्तु देवास्तेनं वयं भगवंतः स्याम । तंत्वा भगसर्वऽइज्जोहवीति सनोभगपुरएताभवेह ॥ ५० ॥ समध्व-रायोषसोनमंत दधिक्रावेव शुचये पदाय । अर्वाचीनं वसुविदं भगन्नोरथ मिवाश्वावाजिनऽआवहंतु ॥ ५१ ॥ अश्वावतीर्गो-मतीर्न उषासो वीरवतीः सदमुच्छंतु भद्राः । घृतं दुहाना विश्वतः प्रपीता यूयं पात स्वस्तिभिः सदा नः ॥ ५२ ॥ इति प्रातःस्मरणीयम् ।

## इति प्रबोधविधिः

---

आणखी आतां ( उषःकाळीं ) आणि पूर्वाण्हकाळीं व मध्यान्हकाळीं आम्ही धनवान् होऊं. हे मघवन् ( पूज्यभग ), सूर्याचा ( तुझा ) उदय झाला असतां तुझ्या प्रसादानें इंद्रादिदेवांच्या अनुग्रहबुद्धीविषयीं आम्ही पात्र होऊं ४९. अहो देवहो भगदेवच धनवान् आहे. त्याच्या योगानें आम्ही धनवान् होऊं. हे भगदेव त्या तुला सर्वच जन निमंत्रण करतो. हे भगदेव, तो तूं येथें आमच्या जवळ प्राप्त हो. ५० गमन करण्यास योग्य ज्याचा मार्ग आहे अशा स्थानास अश्व जसें त्वरितगमन करतो, तसें उषादेवता आमच्या यज्ञांत येवोत. ज्याप्रमाणें वेगवान घोडे रथास लवकर नेतात, त्याप्रमाणें उषोदेवता धन देणाऱ्या भगदेवास आमच्या समोर आणोत ६१. भक्ती-विषयीं योग्य असे उषोदेव अश्ववान्, गोधनवान, वीरवान उदक सिंचन करणारे व सर्व गुणांनीं युक्त होऊन आम्हांस निरंतर रात्रीं असलेल्या अंधकारापासून मुक्त करोत. ह्या सूक्तांत स्तुत केलेले अहो सर्व देवहो, तुह्मी आम्हांस निरंतर कल्याणां-च्या योगानें संरक्षित करा. या सूक्ताचा कोणत्याही कार्यांत प्रवेश होण्याकरितां अथवा रोगाचा नाश होण्याकरितां जप करावा असें वेदभाष्यांत लिहिलें आहे. याप्रमाणें प्रातःस्मरण सांगितलें.

## याप्रमाणें प्रबोधविधि [ सांगितला ].

---

## अथाजपाजपविधिः

सूतसंहितातायाम्—अजपानाम गायत्री योगिनां मोक्ष-दायिनी । तस्याः संकल्पमात्रेण जीवन्मुक्तो न संशयः ॥१॥ हकारोपानसंचारोदेहे देहवतां सदा । अथ च प्राणसंचारः सकारः परिकीर्तितः ॥ २ ॥ एवं वस्तु विजानाति मंत्रमाचा-र्यपूर्वकम् । सो जपन्नपि हंसाख्यं जयत्येव न संशयः ॥ ३ ॥ ईदृशीमजपां विद्यामास्तिक्याद्गुरुभक्तितः। योविजानाति पापानि बुद्धिपूर्वकृतानि च । तस्य नश्यंति सर्वाणि नात्र कार्या वि-चारणेति ॥ ४ ॥

## अथ अजपाजपविधि.

सूतसंहितेंत—अजपा म्हणजे जिचा श्रमसाध्य जप नाहीं व ह्याच नांवानें प्रसिद्ध अशी, गायत्री म्हणजे हिचें ज्ञान ज्यास आहे त्याचें रक्षण करणारी, आणि हिच्या शिवाय दुसऱ्या पदार्थाविषयीं चित्तवृत्तीचा निरोध करणाऱ्यास मोक्ष देणारी. तिच्या संकल्पमात्रानें जीवन्मुक्त म्हणजे जीवदशेंत असतांही आत्मसाक्षात्कारानें संसारिक वस्तूविषयीं चित्त परावृत होईल यांत संशय नाहीं. १ नेहमीं प्राणिमात्राच्या शरीरामध्यें अपानगतवायूच्या संचारानें ‘ ह ’ हा वर्ण, हृदयगतवायूच्या संचारानें ‘ स ’ हा वर्ण आणि ह्या उभय वायूंचा नासिकाद्वारानें प्रसरणापसरण[1]व्यापार होतो, म्हणून त्या नासिकास्थानंयोगानें उभयवर्णांमध्यें अनुस्वार मिळून ‘ हंस ’ हा मंत्रध्वनि उत्पन्न होतो. ह्या प्रकारचा मंत्र गुरूपासून जो समजून घेईल, तो अन्य मंत्राच्या जपासारखे ह्या हंसनामक मंत्राच्या जपाविषयीं श्रम केल्यावाचून सर्वोत्कृष्ट सुखास प्राप्त होईल, यांत संशय नाहीं. २-३ अशी श्रमावाचून परमपद देणारी अजपाविद्या म्हणजे केवळ ज्ञानशक्ति आहे, असें जो श्रद्धा आणि महाभक्ति यांच्या योगानें सूक्ष्मविचारदृष्टीनें जाणील त्याचीं ज्ञानपुरस्सर व अज्ञानानें घडलेलीं पातकें नाहीशीं होतील, याविषयीं संशय धरूं नये.

---

१ बाहेर निघणें व आंत जाणें ही क्रिया.

अथाजपाजपः ॥ अतिनीलघनश्यामं नलिनायतलोचनम् । स्मरामि पुंडरीकाक्षं तेन स्नातोभवाम्यहम् ॥ १ ॥ ( इति पठित्वा ) अनेन पूर्वेद्युर्यथासंकल्पिताजपागायत्रीजपाख्येन कर्मणा भगवंतो गणेशब्रह्मविष्णुमहेशजीवात्मपरमात्मगुरवः प्रीयतां न मम ॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ २ ॥ ( इति प्राक्तनाजपाजपं निवेद्य ॥ ३ ॥ ) सुमुखश्चेत्यादि देशकालौ संकीर्त्य हंसः हंसः हंसः (इतित्रिः प्राणायामः) ॥ अद्य सूर्योदय मारभ्य श्वःसूर्योदयपर्यंतमहोरात्रयोर्जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यवस्थात्रये ज्ञानतोऽज्ञानतोवा षट्शताधिकैकविंशतिसहस्रसंख्योच्छ्वास-निःश्वासाभ्यां हंसरूपाभ्यामेव षट्शतं मूलाधारचक्रस्थगणेश-

## अजपाजप.

वर्षाऋतूंतील मेघासारखा श्यामवर्ण, मुकुलित कमळाप्रमाणें ज्याचीं नयनें दीर्घ आहेत अशा विष्णूचें स्मरण करतों. त्याच्या स्मरणानें अजपासंकल्पाविषयीं मी पवित्र होईन. १ इति—असें पठन करून, अनेन–पूर्वदिवशीं जसा संकल्प केला होता त्याप्रमाणें ह्या अजपागायत्रीजपनामककर्मानें भगवंत गणेशादि सातदेव प्रीतियुक्त होवोत. नमम म्हणजे ह्या कर्माचा अन्यफळाविषयीं मी अभिनिवेश करीत नाहीं. " जपकर्ता परमार्थबुद्धीनें ह्या कर्माच्या उद्देशाचें चिंतन करतो. " प्रणववाच्य त्या आनंदस्वरूप शाश्वत ब्रह्मास अर्पण म्हणजे ज्ञानरूप साक्षात्काराविषयीं निमित्त असो. २ ह्याप्रमाणें पूर्व दिवशीं झालेल्या जपाचें समर्पण करून. ३ सुमुखश्चैक-दंतश्च इत्यादि ( पुढें देवपूजेंत लिहिल्याप्रमाणें ) विशिष्टायां तिथौ येथपर्यंत म्हणून, हंस ह्या त्रिवार मंत्रानें ( पुढें प्रातःसंध्येंत लिहिल्याप्रमाणें ) पूरक, कुंभक व रेचक ह्या क्रमानें तिनदां प्राणायाम करावा. आजच्या सूर्योदयापासून उद्याच्या सूर्योदयापर्यंत दिवसरात्रीमध्यें, जागृति अवस्था, स्वप्नावस्था ( म्हणजे जींत संसार सत्य आहे अशा बुद्धीनेंही घटपटादि कल्पित ( मिथ्या ) पदार्थांचें भान होतें ती ), आणि सुषुप्ति अवस्था ( कोणत्याही पदार्थाचें भान नाहीं अशी गाढ झोप ), ह्यां पैकीं कोणतीही अवस्था असतां, ज्ञानाज्ञानांनीं एकवीस हजार सहाशें हंसवर्णात्मक उच्छ्वास आणि निःश्वास ( श्वास सोडणें व श्वास घेणें ह्या दोघांच्या योगानें एक मंत्र म्हणजे एक संख्या होते ). यांच्या योगानेंच, आधारचक्रस्थ गणेशाच्या

प्रीत्यर्थं। षट्सहस्रं स्वाधिष्ठानचक्रस्थब्रह्मप्रीत्यर्थं। षट्सहस्रं मणिपूरचक्रस्थ विष्णुप्रीत्यर्थं । षट्सहस्रं अनाहतचक्रस्थहर-प्रीत्यर्थं। एकसहस्रं विशुद्धचक्रस्थजीवात्मशुध्यर्थं। एकसहस्रं आज्ञाचक्रस्थपरमात्मप्रीत्यर्थं । एकसहस्रं सहस्रारचक्रस्थगु-रुप्रीत्यर्थं । हंसमंत्रेणाजपागायत्रीजपमहं करिष्ये ॥ ४ ॥ अस्य श्री अजपामंत्रस्य हंसऋषिः । अव्यक्तगायत्रीछंदः। परमहंसोदेवता । हंबीजम् । सः शक्तिः। विमुक्तये जपे विनि-योगः। शिरसिहंस ऋषये नमः । मुखे अव्यक्तगायत्रीछंदसे नमः । हृदि परमहंसदेवतायै नमः । गुह्ये हंबीजाय-नमः । पादयोः सः शक्तये नमः ॥ ५ ॥ हंसः सोमात्मने अंगुष्ठाभ्यां नमः । हंसः सूर्यात्मने तर्जनीभ्यां

प्रीतीकरितां सहाशें, स्वाधिष्ठानचक्रस्थ ब्रह्मदेवाच्या प्रीतीकरितां सहा हजार, मणि-पूरचक्रस्थ विष्णूच्या प्रीतीकरितां सहा हजार, अनाहतचक्रस्थ शंकराच्या प्रीती-करितां सहा हजार, विशुद्धचक्रस्थ जीवात्म्याच्या प्रीतीकरितां एक हजार, आज्ञा-चक्रस्थ परमात्म्याच्या प्रीतीकरितां एक हजार, सहस्रारचक्रस्थ गुरूच्या प्रीतीकरितां एक हजार, हंसमंत्रानें अजपागायत्रीजप मी करतों गुदद्वारीं रक्तवर्ण चतुर्दल अव-यवसंस्थान आहे त्यास योगी आधारचक्र असें म्हणतात लिंगस्थानीं पीतवर्ण षट्दलास स्वाधिष्ठानचक्र, नाभिस्थानीं आरक्तवर्ण दशदलास मणिपूरचक्र, हृदयस्थानीं पिंगटवर्ण द्वादशदलास अनाहतचक्र, कंठस्थानीं श्यामवर्ण षोडशदलास विशुद्धचक्र, ललाटस्थानीं पीतवर्ण द्विदलास आज्ञाचक्र, आणि ब्रह्मरंध्रीं गौरवर्ण सहस्रदलास सहस्रार असें म्हणतात. ४ ह्या अजपामंत्राचा हंस ( जीव ) ऋषि, अव्यक्तगायत्री छंद, परमहंस ( ब्रह्म ) देवता हं हें बीज म्हणजे पिंडोपादानकारण, सः ही शक्ति म्हणजे कारणनिष्ठकार्योत्पादनयोग्य धर्म, मंत्रात्मकच देवता अशा शब्दार्थता-दात्म्यस्वीकारानें वर्णरूप बीजशक्तिकल्पना आहे, आणि मोक्षाकरितां जपाविषयीं उपयोग होय. " देव होऊन देवाची पूजा करावी असा स्मृतिनियमाचा अर्थ आहे, म्हणून ऋषि वगैरे हे देवतारूपमंत्राचे मस्तकादि अवयव आहेत, त्यांची जपकर्ता स्वशरीराच्या त्या त्या अवयवावर बुद्धिकल्पित स्थापना करून नमस्कार करतो." म-स्तकीं हंस ऋषीस नमस्कार असो, इत्यादि ५. "सोमाद्यात्मक हंसाची अंगुष्ठादिकांवर बौद्ध स्थापना करून देवता व अंगुष्ठादिक ह्यांच्या अभेद कल्पनेनें जपकर्ता नमस्कार

स्वाहा । हंसः निरंजनात्मने मध्यमाभ्यां वषट् । हंसः निराभासात्मने अनामिकाभ्यां हुम् । हंसः धर्मात्मने कनिष्ठिकाभ्यां वौषट् । हंसः ज्ञानात्मने करतलकरपृष्ठाभ्यां फट् ॥६॥ एवं हृदयादि ॥ अथ ध्यानम् ॥ द्यौर्मूर्धानं यस्य विप्रा वदंति खं वै नाभिं चक्षुषी चंद्रसूर्यौ । दिशः श्रोत्रे यस्य पादौ क्षितिं च ध्यातव्योऽसौ सर्वभूतांतरात्मा ॥ ७ ॥ ( इति ध्यात्वा मानसोपचारैः संपूज्य प्रणम्य पुनः पूर्ववद्धंस इतिमंत्रेण प्राणायामत्रयं कुर्यात् ) इत्यजपानिवेदनम् ॥

## इत्यजपाजपविधिः

---

करतो ". चंद्रात्मक हंस हेच अंगुष्ठ, ह्यांस नमः म्हणजे नमस्कार असो. सूर्यात्मक हंस तर्जनींना स्वाहा म्हणजे आव्हान असो. निष्कलंकात्मकहंसमध्यमा वषट् म्ह० माझ्या समीप प्राप्त असोत. शुद्धचैतन्यात्मकहंसअनामिकांची हुं म्ह० कर्म करण्यास अनुज्ञा असो. धर्मात्मकहंसकनिष्ठिकांना वौषट् म्ह० कर्म अर्पण असो. ज्ञानात्मक हंस हींच हाताचीं तळें आणि पृष्ठें ह्यांचा फट् म्ह० योग ( सायुज्यमुक्ति ) असो ६. अंगुष्ठादिकांच्या उच्चारण प्रसंगीं हृदयादिकांचें उच्चारण करावें तें असें—हृदयाय, शिरसे, शिखायै, कवचाय, नेत्रत्रयाय, अस्त्राय. अथ ध्यान–ब्राह्मण ज्याचें असें वर्णन करतात, स्वर्ग हें ज्याचें मस्तक, आकाश ज्याचा नाभिप्रदेश, चंद्रसूर्य, ज्याचीं नेत्रें, दिशा कर्ण, पृथ्वीचरण, अशा ह्या सर्व भूतांच्या अंतर्यामी परमात्म्याचें ध्यान करावें. केवळ चिदानंद स्वरूपाच्या ध्यानाविषयीं मनुष्य असमर्थ आहे, म्हणून त्याच्या विराट्स्वरूपाचें ध्यान सांगितलें आहे. ७ परमेश्वराचें असें ध्यान करून मानसिक गंधादि उपचारांनीं पूजन करून, नमस्कार करून, पुन्हा पूर्वीं सांगितल्याप्रमाणें हंस या मंत्रानें तीनदां प्राणायाम करावा, याप्रमाणें अजपाचें निवेदन करावें.

## याप्रमाणें अजपाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ शौचविधिः

पराशरः—ततः प्रातः समुत्थाय कुर्याद्विण्मूत्र एव चेति ॥ १ ॥ धर्मप्रश्ने—दूरादावसथान्मूत्रपुरीषे कुर्यादिति ॥ २ ॥ अंगिराः—कृत्वा यज्ञोपवीतं तु पृष्ठतः कंठलंबितं । विण्मूत्रं तु गृही कुर्याद्यद्वा कर्णे समाहितः ॥ ३ ॥ संध्ययोरुभयोर्जाप्ये भोजने दंतधावने । पितृकार्ये च दैवे च तथा मूत्रपुरीषयोः ॥ ॥ गुरूणां सान्निधौ दाने योगे चैव विशेषतः । एषु मौनं समातिष्ठन्स्वर्गं प्राप्नोति मानवइति ॥ ४ ॥ यमः—आहरेन्मृत्तिकां विप्रः कूलात्ससिकतां तथेति ॥ ५ ॥

## शौचविधि.

**पराशर**—प्रातःस्मरण झाल्यानंतर विलंब न करतां मूत्र व पूरीष करावें. मळमूत्रांचा उत्सर्ग केल्या शिवाय स्नानादिकर्मास अधिकार नाहीं. १ **धर्मप्रश्नांत**—घरापासून दूर मळमूत्रांचा उत्सर्ग करावा. दुर्गंधि येऊं नये म्हणून हा विधि आहे. २ **अंगिरस्**—यज्ञोपवीता ( जानव्या ) स परंपरासंबंधानेंही मळमूत्रांचा स्पर्श न व्हावा म्हणून, तें निवीतकरून पाठीवर लोंबकळतें टाकावें, अथवा उजव्या कानास गुंडाळावें. दुसऱ्या वस्त्रानें डोकें गुंडाळलें नसल्यास जानवें कानालाच गुंळालें पाहिजे. ३ संध्या, जप, भोजन, दंतधावन ( दात घासणें ), पितृकार्य, देवकार्य, मळमूत्र करणें, गुरूंच्या जवळ, दान व योग ( चित्तवृत्तीचा निरोध करणें ) हीं कर्मे करतांना विशेषेंकरून मौन धारण करणारा म्हणजे अवश्य करावयाच्या क्रियेवाचून भाषणादि दुसऱ्या क्रिया न करणारा मनुष्य तीं तीं कर्मे यथास्थित झाल्यानें स्वर्गास जाईल. संध्यादिककथन प्रासंगीक आहे. ४ “ मळमूत्र वगैरेंच्या दुर्गंधीचा नाश होण्याकरितां माती आणावयास सांगतो ”. **यम**—ब्राह्मणानें नदी, क्षेत्र वगैरेंच्या बाजूची, जिच्या घर्षणानें दुर्गंधीचें त्वरित निवारण होईल अशी खरखरीत माती आणावी. माती पवित्र असावी आणि तिच्या खाचेनें कोणास उपद्रव होऊं नये म्हणून कूला ( बाजू ) चें ग्रहण केलें. ५

भृगुः—यस्मिन्देशे तु यत्तोयं या च यत्रैव मृत्तिका ।
सैव तत्र प्रशस्ता स्यात्तया शौचं विधीयत इति ॥ ६ ॥
मनुः—विण्मूत्रोत्सर्गशुध्यर्थं मृद्वार्यादेयमर्थवत् । एका
लिंगे गुदे तिस्रस्तथैकत्र करे दश । उभयोः सप्त दातव्या मृदः
शुद्धिमभीप्सतेति ॥ ७ ॥ शातातपः—आर्द्रामलकमात्रास्तु
ग्रासा इंदुव्रते स्थिताः । तथैवाहुतयः सर्वाः शौचे देयास्तु
मृत्तिका इति ॥ ८ ॥ आश्वलायनः—लिंगशौचं पुरा कृत्वा
गुदशौचं ततः परमिति ॥९॥ देवलः-धर्मविद्दक्षिणं हस्तमधः-
शौचे न योजयेत् । तथा च वामहस्तेन नाभेरूर्ध्वं न शोधये-
दिति ॥१०॥ ऋष्यशृंगः—धाराशौचं न कर्तव्यं शौचसिद्धि-
मभीप्सुना। चुलकेनैव कर्तव्यं हस्तशुद्धिविधानत इति ॥११॥

" शौचास फेस बुडबुडे नसलेलें आणि स्वच्छ असें पाणी असावें असा नियम आहे आणि आतां सांगितल्याप्रमाणें माती असावी, परंतु समयविशेषीं तसें नसल्यास त्याविषयीं " भृगु—ज्या देशांत जसें पाणी असेल आणि जेथें जशी माती असेल, तींच तेथें प्रशस्त आहेत असें समजून त्यांच्या योगानें शुद्धि करावी. ६ **मनु**—मळमूत्रांच्या उत्सर्गानें बाह्यत्वचा अशुद्ध होते, तिच्या शुद्धीकरितां माती व पाणी हीं कामापुरतीं घ्यावीं. लिंगास एकदां, गुदास तीनदां, डाव्या हातास दहादां, आणि दोन्ही हातांस सातवेळां माती लावावी. प्रत्येकवेळीं माती लावल्यानंतर पाण्यानें धुवावें हें अर्थावरून सिद्ध आहे. असें केल्यानें यथाशास्त्र शुद्धि होईल. ७ **शातातप**—चांद्रायण व्रतांतले घास, आहुति आणि शौचाविषयीं माती हीं प्रत्येकीं ओल्या-आवळ्या एवढ्या प्रमाणाचीं असावीं. ८ **आश्वलायन**—पूर्वीं लिंगाचें प्रक्षालन करून मग गुदाचें प्रक्षालन करावें. ९ **देवल**—धर्म जाणणाऱ्या पुरुषानें बेंबीच्या खालचीं इंद्रियें व बेंबी ह्यांचें प्रक्षालन डाव्या हातानें करावें, आणि बेंबीच्या वरचीं इंद्रियें उजव्या हातानें धुवावीं. ह्याहून विपरीत करूं नये. १० **ऋष्यशृंग**—ज्या इंद्रियाची शुद्धि करावयाची त्यावर पाण्याची धार न धरतां चुळक्यांत पाणी घेऊन त्यानें शुद्धि करावी. घाण जाईपर्यंत इंद्रियाचें चुळक्यांतील पाण्यानें प्रक्षालन केल्यानंतर हात धुवून पुन्हा इंद्रिय धुवावें. धारेचा इंद्रियास आघात होऊन त्यापासून निघालेल्या अशुद्ध बिंदूचा दुसऱ्या अवयवास स्पर्श न व्हावा म्हणून अशाच प्रकारानें वास्तविक शुद्धि होईल. ११

प्रयोगपारिजाते—शौचादृते वामपादे पूर्वं न क्षालनं भवेत्। शौचे तु वामपूर्वं स्यादन्यत्र दक्षिणं सदेति ॥ १२ ॥ वृद्धपराशरः—कृत्वाथ शौचं प्रक्षाल्य पादौ हस्तौ च मृज्जलैरिति ॥ १३ ॥ मरीचिः—तिसृभिश्चातलात्पादौ शोध्यौ गुल्फात्तथैव च। हस्तौ त्वामणिबंधाच्च लेपगंधापकर्षणाविति ॥ १४ ॥ धर्मप्रश्ने—पदा पादस्य क्षालनं वर्जयेदधिष्ठानं चेति ॥ १५ ॥ आश्वलायनः—कुर्याद्द्वादश गंडूषान्पुरीषोत्सर्जने ततः। मूत्रोत्सर्गे तु चतुरो भोजनांतेषु षोडश ॥ भक्ष्यभोज्यावसाने तु गंडूषाष्टकमाचरेति ॥ १६ ॥ देवीभागवते—अधोमुखं नरः कृत्वा यजेत्तं वामतः शनैरिति ॥१७॥ मनुः—वसा शुक्रमसृङ्मज्जामूत्रविट्कर्णविण्नखाः। श्लेष्माश्रुदूषिका स्वेदो द्वादशैते नृणां मला इति ॥ १८ ॥

**प्रयोग पारिजातांत**—नेहमीं मूत्रोत्सर्गादिकांच्या शुद्धीकरितां पाय धुवावयाचे असतां पूर्वीं डावा पाय धवून मग उजवा धुवावा. पूजादिनिमित्तानें पाय धुणें झाल्यास पूर्वीं उजवा मग डावा धुवावा. १२ **वृद्धपराशर**—लिंगगुदांची शुद्धि झाल्यानंतर माती आणि पाणी यांच्या योगानें हात व पाय धुवावे. १३ **मरीचि**—अशुचि पदार्थांची गंध ( घाण ) व लेप जाण्याकरितां तळव्यापासून घोंट्यापर्यंत पाय व मनगटापर्यंत हात तीन तीन वेळां माती लावून धुवावे. १४ **'धर्मप्रश्नांत'**—पायानें पाय ( घासून ) धुवूं नये आणि धुण्याच्यावेळीं केवळ पायावर ( उकेडवें ) बसूं नये. १५ **आश्वलायन**—मुतलें असतां चार, मळ केला असतां बारा, भोजन झाल्यावर सोळा आणि फळाहार केल्यावर आठ याप्रमाणें क्रमानें पाण्यानें चुळी ( गुळणे ) भरून टाकाव्या. १६ **देवीभागवतांत**—मनुष्यानें खालीं तोंड करून शिंतोडे न उडतील अशा रीतीनें हळूच डाव्याबाजूस गुळणा टाकावा. १७ **मनु**—वसा म्हणजे मांस किंवा मेद ( मांसगत रस ), शुक्र ( वीर्य ), रुधिर (रक्त), मज्जा ( अस्थिगत रस-चरबी ), मूत्र, विष्ठा, कानांतील मळ, नखें, श्लेष्मा म्ह० तोंड व नाक यांमधून वहाणारा पदार्थ, आसवें, डोळ्यांतील मळ ( पू ) आणि घाम हे मनुष्याचे बारा मळ आहेत. १८

बौधायनः—आददीत मृदोपश्च षट्सु पूर्वेषु शुद्धये। उत्तरेषु च षट्स्वद्भिः केवलाभि र्विशुध्यतीति ॥१९॥ परकीयमलस्पर्शे विष्णुः—नाभेरधस्तात् प्रबाहु च कायिकैर्मलैः सुराभिर्मद्यैर्वोपहतोमृत्तोयैस्तदंगप्रक्षालनाच्छुध्येदन्यत्रोपहतोमृत्तोयैस्तदंगं प्रक्षाल्य स्नानेनेति ॥ २० ॥ स्मृत्यर्थसारे—स्त्रीशूद्रादेरशक्तानां बालानां शौचकर्मणि। गंधलेपक्षयकरं शौचं स्याच्च न संख्ययेति ॥ २१ ॥ मनुः—यावन्नापैत्यमेध्यक्तो गंधोलेपश्च तत्कृतः। तावन्मृद्वारि चादेयं सर्वासु द्रव्यशुद्धिष्विति ॥२२॥ व्याघ्रपादः - शौचं तु द्विविधं प्रोक्तं बाह्यमाभ्यंतरं तथा। मृज्जलाभ्यां स्मृतं बाह्यं भावशुद्धं तथांतरमिति ।।२३॥ दक्षः- शौचे यत्नः सदा कार्यः शौचमूलयतोद्विजः। शौचाचारविहीनस्य समस्ता निष्फलाः क्रिया इति ॥ २४ ॥

**बौधायन**—वसादि सहा मळांची माती व पाणी ह्यांनीं आणि कर्णमलादि सहांची केवळ पाण्यानें प्रक्षालन करून शुद्धि करावीं. १९ "दुसऱ्याच्या मळाचा स्पर्श झाला असतां त्याविषयीं विष्णु"—दुसऱ्याच्या शरीराच्या मळाचा अथवा मद्याचा बेंबीच्या खालच्या भागास किंवा हातास स्पर्श झाला तर त्या अंगाचें माती व पाणी ह्यांनीं प्रक्षालन करावें म्हणजे शुद्ध होईल. बेंबीच्या वरच्या ( मुखादि इंद्रियां शिवायच्या ) अवयवास स्पर्श झाला तर तें अंग माती व पाणी यांच्या योगानें धुऊन स्नान करावें म्हणजे शुद्धि होईल. २० **स्मृत्यर्थसारांत**—स्त्री शूद्र वगैरे, अशक्त, आणि मुलें ह्यांनीं मळाच्या लेपाचें व घाणीचें निवारण होईपर्यंत अवयवास माती व पाणी ह्यांनीं धुवावें म्हणजे शुद्धि होते. पूर्वी सांगितलेल्या मातीच्या संख्येचें प्रयोजन नाहीं. २१ **मनु**—अशुद्ध पदार्थानें लिप्त झालेल्या पदार्थास अशुद्ध पदार्थाची घाण व लेप ( स्पर्श ) जाईपर्यंत माती व पाणी ह्यांनीं धुवावें. सर्व पदार्थांच्या शुद्धीविषयीं हा सामान नियम आहे. २२ **व्याघ्रपाद**—शुद्धि दोन प्रकारची आहे, बाह्य आणि अभ्यंतर. माती व पाणी यांनीं बाह्य शुद्धि होते, आणि निंदित पदार्थाविषयीं अंतःकरणाच्या निवृत्तीनें आभ्यंतर शुद्धि होते. २३ **दक्ष**—द्विजानें नेहमीं आळस न करतां शौच ( शुद्धि ) करावें. शौच हा द्विजत्व रक्षणास नित्य नैमित्तिक कर्माविषयीं अधिकारास हेतु आहे. कारण, शौचाचारानें रहित असलेल्याच्या संध्यादि सर्व क्रिया निष्फळ होतात २४.

**बौधायनः--देशं कालं तथात्मानं द्रव्यं द्रव्यप्रयोजनं । उप-पत्तिमवस्थां च ज्ञात्वाशौचं प्रकल्पयेदिति ॥ २५ ॥ व्यासः—अपवित्रः पवित्रोवा सर्वावस्थांगतोऽपिवा । यः स्मरेत्पुंडरी-काक्षं स बाह्याभंतरः शुचिरिति ॥ २६ ॥**

**इति शौचविधिः**

---

**बौधायन**—देश, काळ, आपली शक्ति आणि शोधनीय द्रव्य, त्या द्रव्याचें प्रयोजन, उत्पत्ति आणि अवस्था यांचा विचार करून शुद्धि करण्यास प्रवृत्त व्हावें २५. **व्यास**—यथोक्त कर्माच्या किंचित् न्यूनतेनें अपवित्र असो, अथवा यथोक्त कर्माच्या आचारणानें पवित्र असो, किंवा वृद्धत्वादि ( म्हातारपण इत्यादि ) कोणत्याही अवस्थेंत असो, जो विष्णूचें चिंतन करील तो बाहेर व आंत शुद्ध होईल २६.

याप्रमाणें शौचविधि [ सांगितला. ]

---

## अथाचमनविधिः

**मनुः—कृत्वा मूत्रं पुरीषं वा खान्याचांत उपस्पृशेत् । वेदमध्येष्यमाणश्चाप्यन्नमश्नंश्च सर्वदेति ॥ १ ॥ वायुपुराणे—क्रियां यः कुरुते मोहादनाचम्य तु नास्तिकः । भवंति च वृथा तस्य क्रियाः सर्वा न संशय इति ॥ २ ॥**

## आचमनाचा विधि.

**मनु**—" मूत्र किंवा मळकरून त्याची शुद्धि केल्यानंतर, तसेंच वेदाध्ययन करावयाचें असतां, आणि भोजनाच्या पूर्वीं व पश्चात् नेहमीं आचमन करून नाक, डोळे व कान ह्यांस पाण्यानें स्पर्श करावा. हें एक प्रकारचें अमंत्रक आचमन आहे. १ " प्रसंगानें आणखीही आचमनाचीं निमित्तें सांगतां ". **वायुपुराणांत**—अज्ञानानें अथवा आचमन हें अप्रधान कर्म आहे, म्हणून त्याविषयीं अनादर बुद्धीनें जो आच-मन केल्यावाचून विहित क्रिया करील, त्याची ती क्रिया आणि त्या क्रियेनें दुसऱ्या क्रिया करावयास अधिकारी होऊन केलेल्या क्रिया ह्या सर्व निष्फळ होतात. २

बौधायनः—भोजने हवने दाने उपहारे प्रतिग्रहे । हविर्भक्षण काले च द्विराचामेत्तु सर्वदेति॥ ३ ॥ अगस्त्यसंहितायाम्—प्राणायामैर्विना यद्यत्कृतं कर्म निरर्थकं । अतोयत्नेन कर्तव्यः प्राणायामः शुभार्थिनेति ॥ ४ ॥ देवीपुराणे—श्रुतिस्मृत्यादिकर्मादौ सगर्भः प्राणसंयमः । अगर्भो ध्यानमात्रं तु स चामंत्रः प्रकीर्तित इति॥ ५ ॥ मनुः––प्राणस्यायमनं कृत्वा आचामेत्प्रयतोऽपि सन् । आंतरं खिद्यते यस्मात्तस्मादाचमनं स्मृतमिति ॥ ६ ॥ याज्ञवल्क्यः––अंतर्जानुः शुचौ देश उपविष्ट उदङ्मुखः । प्राग्वा ब्राह्मेण तीर्थेन द्विजोनित्यमुपस्पृशेत् । अद्भिस्तु प्रकृतिस्थाभिर्हीनाभिः फेनबुद्बुदैः । हृत्कंठतालुगाभिस्तु यथासंख्यं द्विजातयः । शुध्येरन् स्त्री च शूद्रश्च सकृत्स्पृष्टाभिरंतत इति ॥ ७ ॥

**बौधायन**—भोजन, होम, दान, उपहार, प्रतिग्रह आणि पुरोडाशाचें भक्षण हीं कर्में कर्तव्य असतां दोनदां आचमन करावें. ३ **अगस्त्यसंहितेंत**—प्राणायाम केल्याशिवाय केलेलें श्रौत स्मार्त कर्म निरर्थक होतें, म्हणून आळस न करतां कर्तव्यकर्माच्या फळाची प्राप्ति होण्याकरितां पूर्वी प्राणायाम करावा ४. **देवीपुराणांत**—वेद व स्मृति ज्यांस आदि म्ह० निमित्त आहे अशा संध्यादि कर्मांपूर्वी पूरक, कुंभक व रेचक ह्यां सहित समंत्रक प्राणायाम करावा, आणि मूत्रोत्सर्गादिकाच्या निमित्तानें शरीराची शुद्धि वगैरे होण्याकरितां आचमनादि कर्मांपूर्वी अमंत्रक प्राणायाम म्ह० प्राणायाममंत्राच्या अर्थाचें ध्यानमात्र करावें. ५ **मनु**—प्राणायाम केल्यानें शरीराचे अंतरावयव खिन्न (म्लान) होतात, म्हणून प्राणायामानंतर पवित्र असतांही अवयवांच्या उद्दीपनाकरितां आचमन करावें. ६ “ प्रथम आचमनाचीं आणि त्याच्या प्रसंगानें प्राणायामाचीं निमित्तें सांगितलीं, आतां आचमनाचा प्रकार व त्यासाठीं उदकादिक कसें असावें हें सांगतो. ” **याज्ञवल्क्य**—द्विजानें नेहमीं पवित्र जागेंत पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे तोंड करून बसून दोन्ही गुडघ्यांच्या आंत हात घेऊन ब्राम्हतीर्थानें ज्यास दुसऱ्याचा गंध, रूप, रस अथवा स्पर्श नसेल आणि ज्यास फेस, व बुडबुडे नसतील अशा आणि ब्राम्हणानें हृदयास, क्षत्रियानें कंठास व वैश्यानें ताळूस पोचेल एवढ्या प्रमाणाच्या उदकाचें तीनदां आचमन

करावें. स्त्री व शूद्र यांनीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें जिभेस स्पर्श होईल एवढ्या पाण्याचें एकदांच आचमन करावें. या योगानें आचमननिमित्तक शुद्धि होईल. ब्राम्हणाच्याच हातावर ब्रम्हतीर्थ आहे अशा नियमाच्या पक्षांत क्षत्रियादिकांविषयीं ब्राम्हशब्द औपचारिक अथवा त्याचा असंबंध होय. ७

आपस्तंबः—संध्यार्थे भोजनार्थे वा स्नानार्थे पितृकर्मणि। शूद्राहृतेन नाचामेद्यागादिहवनेषु चेति ॥ ८ ॥ उशनाः—माषमज्जनमात्रा हृदयंगमा भवंतीति ॥ ९ ॥ देवलः—उभयत्र स्थितैर्दर्भैः समाचमति यो द्विजः । सोमपानफलं सोऽपि भुक्त्वा यज्ञफलं लभेदिति ॥ १० ॥ कण्वः—आयतं पूर्वतः कृत्वा गोकर्णाकृतिवत्करं। संहतांगुलिना तोयं गृहीत्वा पाणिना द्विजः। मुक्त्वांगुष्ठकनिष्ठेन शेषेणाचमनं चरेदिति ॥ ११ ॥ यमः—तावन्नोपस्पृशेद्विद्वान्यावद्वामेन न स्पृशेदिति ॥ १२ ॥ वृद्धपराशरः—तीर्थानि पंच विप्रस्य करे संति च दक्षिणे । ब्राह्मं दैवं तथा पैत्रं प्राजापत्यं च सौमिकं । ब्राह्मं पश्चिमरेखायां दैवं ह्यंगुलिमूर्धनि। अंगुष्ठस्य प्रदेशिन्या मध्ये पैत्रं प्रतिष्ठितं। प्राजापत्यं कनिष्ठादौ मध्ये सौम्यं विजानत इति ॥ १३ ॥

आपस्तंब—संध्या, भोजन, स्नान, पितृकर्म, देवपूजादि व होम या कर्मांत शूद्रानें आणलेल्या पाण्याचें ब्राम्हणानें आचमन करूं नये. ८ “ब्राम्हणानें हृदयास प्राप्त होईल इतक्या उदकाचें आचमन करावें असें सांगितलें, तें किती उदक असलें म्हणजे हृदयास प्राप्त होईल तें सांगतो” उशनस्—हातावर उडीद बुडेल इतकें उदक हृदयास प्राप्त होणारें होतें. ९ देवल—दोन्ही हातांत दर्भ धारण करून जो द्विज आचमन करील, त्यास सोमाच्या पानाचें फळ मिळून यज्ञाचेंही फळ मिळेल. १० कण्व—द्विजानें पुढें गाईच्या कानाप्रमाणें लांब हात करून व बोटें एकमेकांस जुळलेलीं आहेत अशा हातानें पाणी घेऊन मग अंगठा व कनिष्टिका ( शेवटलें बोट ) मोकळी सोडून आचमन करावें. ११ यम—ज्ञात्यानें डावा हात उजव्या हातास लावून आचमन करावें. १२ वृद्धपराशर—श्रुतिस्मृति जाणणाऱ्या ब्राम्हणाच्या उजव्या हातावर ब्रम्हतीर्थ, देवतीर्थ, पितृतीर्थ, प्रजापतितीर्थ, आणि सोमतीर्थ अशीं

पांच तीर्थें आहेत. त्यांत अंगठ्याच्या अगदीं मूळांत असलेल्या रेषेवर ब्रम्हतीर्थ, बोटांच्या अग्रभागीं देवतीर्थ, अंगठा व तर्जनी ( अंगठ्या जवळचें बोट ) यांच्या मध्यें पितृतीर्थ, कनिष्ठिकेच्या मूळांत प्रजापतितीर्थ व बोटांच्या अगदीं मूळांत सोम-तीर्थ आहे. १३

प्रचेताः--दक्षिणहस्तमध्ये ब्राह्मणस्याग्नेयं तीर्थमिति॥१४॥ हारीतबौधायनौ--उपस्पर्शनं ब्राह्मेण मार्जनार्चनबलिकर्म-भोजनानि दैवं च दैवेन पैतृकं पित्र्येण निर्वपणसंस्रवणलाजा-होमनित्यहोमाचमनतर्पणानि प्राजापत्येन कमंडलुस्पर्शनं दधि-स्पर्शनं नवान्नप्राशनं स्रुग्ग्रहणं दैविकं सौम्येनाग्नेयेन प्रतिग्रहं कुर्यादिति ॥ १५॥ व्याघ्रपात्--केशवादित्रिभिः पीत्वा चतु-र्थेन मृजेत्करं । पंचमेन च षष्ठेन द्विरोष्ठावुन्मृजेत्क्रमात् । तौ सप्तमेनापि मृजेदेकवारं तु मंत्रवित् । अष्टमेन तु मंत्रेणाप्यभि-मंत्र्य जलं शुचिः । वामं संप्रोक्षयेत्पाणिं मनुना नवमेन च ।

**प्रचेतस्**—ब्राह्मणाच्या उजव्या हाताच्या मध्यभागीं अग्नितीर्थ आहे. १४ “ सर्व तीर्थें प्रसंगानें सांगितलीं, आतां त्यांचा उपयोग सांगतो.” **बौधायन**—आच-मनाचें पाणी ब्रह्मतीर्थानें प्यावें. मार्जन, ब्राह्मणादिकांची पूजा, बलिदान ( बलि-हरणादि ), भोजन आणि देवकार्य हीं कर्में देवतीर्थानें करावीं. पितृकर्म पितृतीर्थानें करावें. तंडुलमुष्ट्यादिकाचें निर्वपण (देवादिकांच्या उद्देशानें विभाग करणें ), विश्वेदे-वासंबंधी संस्रवण, लाजाहोम, नित्यहोम, आचमन संबंधी तीनदां पाणी प्याल्यानंतर नाक वगैरेंस पाण्याचा स्पर्श करावयाचा तें कर्म, आणि देवपितरांशिवायचें तर्पण, हीं कर्में प्रजापतितीर्थानें करावीं. श्रौतादिकर्मसंबंधी कमंडलूचा स्पर्श, प्रायश्चित्ताद्यर्थक दधिस्पर्शन, नवान्न प्राशन आणि देवकार्याकरितां स्रुचेचें ग्रहण हीं कर्में सोम-तीर्थानें करावीं, आणि प्रतिग्रह अग्नितीर्थानें करावा. १५ **व्याघ्रपात्**--हस्तप्रक्षालना-दिकांनीं शुचिर्भूत होऊन मंत्रार्थ ज्ञानपूर्वक प्रत्येक मंत्रास हातानें निरनिराळें पाणी घेऊन प्रयोगांत लिहिलेल्या केशवादि मंत्रांच्या उच्चारणानंतर कर्म करावयाचें तें असें— केशव, नारायण, माधव ह्या प्रत्येक मंत्रानें प्राशन करावें ( पाणी प्यावें ). गोविंद मंत्रानें उजवा हात व विष्णुमंत्रानें डावा हात धुवावा. मधुसूदन मंत्रानें पृथक् पृथक् ओठांस व त्रिविक्रममंत्रानें पुन्हा एकदांच ओठांस पाणी लावावें. उजव्या

दक्षिणं दशमेनाङ्घ्रिं वाममेकादशेन वै । मूर्धानं द्वादशेनाथ स्पृशेदूर्ध्वोष्ठपृष्ठकम् । संकर्षणाय नम इत्यनेनांगुलिमूर्धभिः । अंगुष्ठतर्जन्यग्राभ्यां संश्लिष्टाभ्यां जलैः सह । नासारंध्रे वासुदेवप्रद्युम्नाभ्यां स्पृशेच्छुभे । अंगुष्ठानामिकाभ्यां तु संश्लिष्टाभ्यां जलैः सह । अनिरुद्धाय नम इत्यास्पृशेदक्षि दक्षिणम् । पुरुषोत्तममंत्रेण ताभ्यां वामां स्पृशेद्दृशम् । तथांगुष्ठकनिष्ठाभ्यां श्लिष्टाग्राभ्यां जलैः सह । अधोक्षजनृसिंहाभ्यां श्रोत्रे द्वे संस्पृशेत्क्रमात् । नाभिमच्युतमंत्रेण ताभ्यामेव स्पृशेद्बुधः । श्रीजनार्दनमंत्रेण तलेन हृदयं स्पृशेत् । उपेंद्रायेतिमूर्द्धानं स्पृशेत्सजलपाणिना । सर्वांगुल्यग्रभागैस्तु समाश्लिष्टैर्जलैः सह । भुजौ तु हरिकृष्णाभ्यां संस्पृशेद्दक्षिणोत्तरौ । आचामेन्नित्यमेवं योभगवन्नामभिः क्रमात् । सद्यः पूतः स विहितेषूत्तरेष्वधिकारवानिति ॥ १६ ॥

हातांत पाणी घेऊन त्याचें वामनमंत्रानें अभिमंत्रण करावें. श्रीधरमंत्रानें अभिमंत्रित केलेल्या पाण्यानें डाव्या हाताचें प्रोक्षण करावें. हृषीकेशमंत्रानें उजव्या पायाचें व पद्मनाभमंत्रानें डाव्या पायाचें प्रोक्षण करावें. दामोदरमंत्रानें मस्तकास स्पर्श करावा. संकर्षणमंत्रानें बोटांच्या अग्रांनीं वर या ओठाच्या पृष्ठभागास स्पर्श करावा एकमेकांस लागलेल्या अशा अंगठा व त्याजवळचें बोट यांनीं वासुदेवमंत्रानें नाकाच्या उजव्या छिद्रास व प्रद्युम्नमंत्रानें डाव्या छिद्रास ( नाकपुडीस ) स्पर्श करावा. एकमेकांस लागलेलीं अशीं अंगठा व करंगळीजवळचें बोट यांनीं अनिरुद्धमंत्रानें उजव्या डोळ्यास व पुरुषोत्तम मंत्रानें डाव्या डोळ्यास स्पर्श करावा. एकमेकांस लागलेल्या अंगठा व करंगळी यांनीं अधोक्षज मंत्रानें उजव्या कानास व नारसिंहमंत्रानें डाव्या कानास व अच्युतमंत्रानें बेंबीस स्पर्श करावा. जनार्दनमंत्रानें हाताच्या तळव्यानें हृदयास स्पर्श करावा. उपेंद्रमंत्रानें हातानें मस्तकास स्पर्श करावा, आणि सर्व बोटांच्या अग्रांनीं हरिमंत्रानें उजव्या बाहूस (दंडास) व कृष्णमंत्रानें डाव्या बाहूस (दंडास) स्पर्श करावा. ह्याप्रमाणें क्रमानें भगवंताच्या नाममंत्रांनीं जो नित्य आचमन करील, तो तत्काळीं पुढें करावयाच्या विहितकर्मांविषयीं पवित्र होऊन अधिकारी होईल १६.

गारुडे--प्रणवादिनमों तं च चतुर्थ्यंतं च सत्तम। देवतायाः स्वकं नाम मूलमंत्रः प्रकीर्तितः॥ १७॥ देवं गुरुं गुरुस्थानं क्षेत्रं क्षेत्राधिदेवतां। सिद्धं सिद्धाधिकारं च श्रीपूर्वं समुदीरयेदिति॥ १८॥ मार्कंडेयः—कुर्वीतालंभनं वापि दक्षिणश्रवणस्य त्विति॥ १९॥ पाराशरः--अग्निरापश्च वेदाश्च सोमः सूर्योऽनिलस्तथा। एते सर्वे च विप्राणां श्रोत्रे तिष्ठंति दक्षिण इति॥ २०॥

## इत्याचमनविधिः।

---

" केशवादिमंत्रांनीं आचमन करावें असें सांगितलें, आतां मंत्राचें लक्षण सांगतो ". **गरुडपुराणांत**—ज्या देवतेचें स्वतांचें नांव चतुर्थ्यंत असून त्याच्या पूर्वीं प्रणव आणि शेवटीं नमः शद्ब यांनीं युक्त असेल तें त्या देवतेचा मूल मंत्र होय १७. देव, गुरु, गुरूचें स्थान, क्षेत्र, क्षेत्राची देवता, सिद्ध आणि सिद्धाचा अधिकार यांचे पूर्वीं श्री शद्ब लावून यांचा उच्चार करावा १८. " आचमनाचा अनुकल्प[1] सांगतो ". **मार्कंडेय**--उजव्या कानास स्पर्श केल्यानेंही आचमन होतें १९. **पाराशर**--उजव्या कानास स्पर्श करण्याचें कारण, अग्नि, वरुण, वेद, सोम, सूर्य, व वायु ह्या सर्व देवता ब्राह्मणांच्या उजव्या कानावर रहातात २०.

## याप्रमाणें आचमनविधि [सांगितला.]

---

## अथाचमनप्रयोगः

ॐ श्रीकेशवाय नमः १

## आचमनाचा प्रयोग.

वर सांगितलेल्या आचमनाच्या विधींत जे नियम सांगितले आहेत त्यांप्रमाणें ॐ श्रीकेशवाय नमः। इत्यादि चोवीस नांवांनीं आचमन करावें. चोवीस नांवांचा अर्थ--**ॐ श्रीकेशवाय नमः**--ॐ म्हणजे मंगलस्वरूप, श्री म्ह० आणिमादि आठ प्रकारच्या सिद्धींनीं युक्त, ज्यानें केशी नावाच्या दैत्याचा नाश केला अथवा ज्याचे केशसंज्ञक किरण सूर्यादिरूपांनीं प्रकाशतात म्हणून ज्याला केशव असें म्हणतात, अशा केशवास नमः म्ह० नमस्कार असो १.

---

१ दुसरा प्रकार.

ॐ श्रीनारायणाय नमः २ ॐ श्रीमाधवाय नमः ३ ॐ श्रीगोविंदाय नमः ४ ॐ श्रीविष्णवे नमः ५ ॐ श्रीमधुसूदनाय नमः ६ ॐ श्रीत्रिविक्रमाय नमः ७ ॐ श्रीवामनाय नमः ८ ॐ श्रीश्रीधराय नमः ९ ॐ श्रीहृषीकेशाय नमः १० ॐ श्रीपद्मनाभाय नमः ११ ॐ श्रीदामोदराय नमः १२ ॐ श्रीसंकर्षणाय नमः १३ ॐ श्रीवासुदेवाय नमः १४ ॐ श्रीप्रद्युम्नाय-नमः १५ ॐ श्रीअनिरुद्धाय नमः १६ ॐ श्रीपुरुषोत्तमाय नमः १७ ॐ श्रीअधोक्षजाय नमः १८ ॐ श्रीनारसिंहाय नमः १९ श्रीअच्युताय नमः २० ॐ श्रीजनार्दनाय नमः २१ ॐ श्रीउपेंद्राय नमः २२ ॐ श्रीहरये नमः २३ ॐ श्रीकृष्णाय नमः २४

इत्याचमनविधिः

---

**नारायण**—पूर्वी जगतास कारणभूत असें पाणी निर्माण करून त्यांत वास केला म्हणून नारायण असें म्हणतात २. **माधव**—लक्ष्मीचा पति ३. **गोविंद**—पृथ्वीचा उद्धार करणारा ४. **विष्णु**—सर्वव्यापक ५. **मधुसूदन**—भक्तांच्या साचलेल्या कर्मांचा नाश करून त्यांस मुक्त करणारा ६. **त्रिविक्रम**—वामनावतारांत तिन्ही लोकांचे आक्रमण केलें म्हणून त्रिविक्रम म्हणतात ७. **वामन**—देवांच्या कार्यासाठीं बटूचें रूप धारण करणारा ८. **श्रीधर**--अत्यंत सुशोभित ९. **हृषीकेश**--सर्व इंद्रियांचा नायक. १० **पद्मनाभ**--ज्याच्या नाभी ( बेंबी ) वर कमळ आहे तो ११. **दामोदर**-ज्याच्या उदरांत सर्व लोक रहातात. १२ **संकर्षण**-ज्यास देवकीच्या गर्भांतून रोहिणीच्या गर्भांत नेला १३. **वासुदेव**--वसुदेवाचा पुत्र १४. **प्रद्युम्न**—अत्यंत बलवान् १५. **अनिरुद्ध**—ज्याचा निरोध करण्यास कोणीही समर्थ नाहीं. १६ **पुरुषोत्तम**—पुरुषश्रेष्ठ १७. **अधोक्षज**—ज्याला कधींही अधम स्थिति प्राप्त होत नाहीं तो. १८. **नारसिंह**—एका शरीरांत मनुष्य आणि सिंह ह्यांची आकृति धारण करणारा. १९ **अच्युत**—अविनाशी २०. **जनार्दन**—ज्याच्या जवळ जन अभिष्टाची याचना करतात अथवा जननदुःखाचा नाश करणारा २१. **उपेंद्र**--इंद्राचा अनुज (धाकटा भाऊ) २२. **हरि**--पापाचा नाश कर्ता २३. **कृष्ण**--श्यामवर्ण २४.

**याप्रमाणें आचमनाचा प्रयोग [सांगितला.]**

---

## अथ पवित्रधारणविधिः

प्रयोगपारिजाते—स्नाने होमे जपे दाने स्वाध्याये पितृकर्मणि । करौ सदर्भौ कुर्वीत तथा संध्याभिवादने ॥ १ ॥ कुशाः काशा यवा दूर्वा उशीराश्च सकुंदकाः । गोधूमा व्रीहयो मुंजा दश दर्भाः सबल्वजा इति ॥ २ ॥ कात्यायनः—अनंतर्गर्भिणं साग्रं कौशं हि दलमेव च । प्रादेशमात्रं विज्ञेयं पवित्रं यत्र कुत्रचिदिति ॥ ३ ॥ मार्कंडेयः—चतुर्भिर्दर्भपिंजूलैर्ब्राह्मणस्य पवित्रकमिति ॥ ४ ॥ मनुः--सर्वेषां वा भवेद्द्वाभ्यां पवित्रं ग्रंथितं नवेति ॥ ५ ॥ हेमाद्रौ—अन्यान्यपि पवित्राणि कुशदूर्वामयानि च । हेमात्मकपवित्रस्य कलां नार्हंति षोडशीमिति ॥६॥ ब्राह्मे—मंत्रं विना विधृतं यत्पवित्रं विफलं भवेत् । तस्मात्पवित्रमंत्राभ्यां धारयेदभिमंत्र्य च । पवित्रवंत इत्यादि मंत्रद्वितयमस्य तु । प्रणवस्त्वस्य मंत्रः स्यात्समस्तव्याहृतिस्तु वा । अन्यैर्धृतं न गृण्हीयात्पवित्रं तृणसंभवम् । हेमादयस्तु संग्राह्या सम्यङ्निष्ठप्य वन्हिनेति ॥ ७ ॥

## पवित्रक धारण करण्याचा विधि.

**प्रयोगपारिजातांत**—स्नान, संध्या, होम, जप, दान, ब्रह्मयज्ञ आणि तर्पण हीं कर्में करावयाचीं असतां दोन्ही हातांत दर्भ धारण करावे. कुश, काश, जव, दूर्वा, वाळा, कुंद, गहूं, व्रीहि ( भात ), मोळ आणि बल्वज ( उलज जातीचें तृण ) याप्रमाणें दहा प्रकारचे दर्भ आहेत. एकाच्या अभावीं एक याप्रमाणें उत्तरोत्तर अनुकल्पानें दर्भस्थानीं गृहीत करावे. २ **कात्यायन**—ज्याच्या गर्भांत दुसरें दल नसून ज्याला अग्र असेल व जें टीचभर लांब असेल असें कुशाचें दल ( दर्भ ) कोणत्याही कर्मांत पवित्राच्या ठिकाणीं घ्यावें. ३. **मार्कंडेय**—ब्राह्मणानें चार दर्भांचें पवित्रक धारण करावें ४. **मनु**—अथवा ब्राह्मणादि सर्व वर्णांनीं दोन दर्भांचें ग्रंथीनें ( गाठीनें ) युक्त किंवा ग्रंथी शिवाय असें पवित्रक धारण करावें. ५. " कुश, दूर्वा वगैरेंच्या पवित्रकांपेक्षां सोन्याच्या पवित्रकाचें महत्व सांगतो." **हेमाद्रींत**-कुश, दूर्वा वगैरेंचीं दुसरीं पुष्कळ पवित्रकें आहेत, परंतु तीं सगळीं सोन्याच्या पवित्रकाच्या षोडशांश फळास योग्य होत नाहींत. ६. **ब्रह्मपुराणांत**--मंत्रांवाचून पवित्रक धारण केलेलें निष्फळ होतें, म्हणून पवित्रकाच्या मंत्रांनीं त्याचें अभिमंत्रण करून

धारण करावें. पवित्रकाच्या अभिमंत्रणाचे पवित्रवंत इत्यादि दोन मंत्र आहेत. अथवा प्रणव आणि समस्त ( सगळ्या एकत्र ) व्याहृति हेही दोन मंत्र आहेत. कुशादि-तृणजातीचें पवित्रक दुसऱ्यांनीं धारण केलेलें घेऊं नये. परंतु सोनें वगैरे धातूंचीं केलेलीं पवित्रकें दुसऱ्यांनीं धारण केलीं असलीं तरी त्यास अग्नीचा ताप देऊन धारण करावीं.

अत्रिः—अनामिकामूलदेशे पवित्रं धारयेद्द्विज इति ॥ ८ ॥

अत्रि—द्विजानें अनामिकेच्या ( अंगठ्यापासून चवथें बोट त्याच्या ) मूळ भागीं पवित्रक धारण करावें ८.

---

## अथ पवित्रधारणप्रयोगः

पवित्रवंत इत्यादि मंत्रयो ब्रह्मा ऋषिः । बृहस्पतिर्देवता । जगतीछंदः पवित्र धारणे विनियोगः ॥१॥ पवित्रवंतः परि- वाचमासते पितैषां प्रत्नोऽअभिरक्षति व्रतम् । महः समुद्रं वरुण- स्तिरादधे धीराऽइच्छेकुर्धरुणेष्वारभम् ॥ २ ॥

### पवित्रक घालण्याचा प्रयोग.

पवित्रवंत इत्यादि दोन मंत्रांचा ब्रह्मदेव ऋषि, बृहस्पति देवता, जगती छंद, आणि पवित्रक धारण करण्याविषयीं उपयोग होय. पूत करणारे सोमौषधीचे रश्मि मध्यमावाचेंत प्रवेश करतात म्हणून, औषधिसोम यज्ञरूपव्रताचें रक्षण करतो, आणि रश्मींचा पुरातन ( जुना ) जनक अंतरिक्षांत असणारा सोम आपल्या तेजानें महत अंतरिक्षास व्याप्त करतो. कुशलच ऋत्विज वसतीवरीनामक जलामध्यें त्या सोमौषधीच्या निष्पीडनाविषयीं रज्जूपर्यंत ( सर्व रस निघेल इतके ) समर्थ होतात. सोमाचे ( चंद्राचे ) किरण सोम नांवाच्या औषधींत प्रवेश करतात त्या औषधीच्या रसाचें ऋत्विजांनीं यज्ञांत प्राशन केलें असतां त्यांच्या हृदयांतील मध्यमावाचेच्या सोमदेवतेस रस रूपानें पुन्हा प्राप्त होतात, म्हणून औषधिरूप सोम यज्ञव्रताचें रक्षण करतो, आणि अंतरिक्षांतील सोम आपल्या तेजानें सर्वांचें आच्छादन करतो. ऋ-त्विज त्या सोमौषधीचें यज्ञामध्यें निष्पीडन ( पिळणें ) करतात. हा ह्या ऋचेचा अभिप्राय आहे. २



पुवित्रंते वितंतं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्यैषि विश्वतः । अतंप्ततनूर्नतदामोऽअश्नुते शृतासऽइद्वहन्त स्तत्समाशत ॥ ३ ॥
प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती । पवित्रधारणे विनियोगः ॥ ४ ॥ ॐ ॥ ५ ॥ ओंभूर्भवः स्वः ॥ ६ ॥

## इति पवित्रधारणविधिः

---

हे ब्रम्हणस्पते म्ह० मंत्रस्वामि सोम, तुझें पवित्र करणारें अंग विस्तृत आहे, असा समर्थ तूं गात्रांचें रक्षण करण्यास चहूंकडे परिक्रमण करतोस. तुझ्या त्या पवित्र अंगास, पयोव्रतादिकांच्या योगानें असंतप्त आहे शरीर ज्याचें असा अपरिपक्व व्याप्त करीत नाहीं म्ह. सोमपान करण्यास योग्य होत नाहीं. परिपक्वच याग करणारे असे त्या पवित्राचें प्राशन करतात. ३ प्रणवस्य.--यांचा अर्थ प्रातःसंध्येंत लिहावयाचा आहे. ४-५-६

याप्रमाणें पवित्रक धारण करण्याचा विधि [ सांगितला ].

---

## अथ प्रातःस्नानविधिः

याज्ञवल्क्यः—अगम्यागमनात्पापात्पापेभ्यश्च प्रतिग्रहात् रहस्याचरितात्पापान्मुच्यते स्नानमाचरन्निति ॥ १ ॥ दक्षः— अत्यंतमलिनःकायो नवच्छिद्रसमन्वितः । स्रवत्येव दिवारात्रौ प्रातःस्नानं विशोधनम् ॥ २ ॥

### प्रातःस्नानाचा विधि.

याज्ञवल्क्य--गमनाविषयीं अयोग्य अशा मळमूत्रादि असणाऱ्या अपवित्र जागेंत गमन केल्यानें होणाऱ्या पापापासून, अन्यायानें द्रव्य संपादन करणारा अथवा हीन जातीचा मनुष्य त्यापासून प्रतिग्रह (दान) घेतल्यानें होणाऱ्या पापापासून आणि रहस्यांत ( एकातांत ) घडलेल्या पापापासून स्नान करणारा मुक्त होतो. १ दक्ष-- डोळे, कान, नाक, तोंड, शिस्न आणि गुद या दुर्गंधि स्रवणाऱ्या नऊ छिद्रांनीं युक्त असलेला आणि रात्रंदिवस नऊ छिद्रांच्या योगानें घाम इत्यादिकांचा स्राव करणारा

हा देह अत्यंत मलीन होतो म्हणून प्रातःकाळीं स्नान करणें हें त्याचें शुद्धिकरण होय. २

गुणा दश स्नानपरस्य साधो रूपं च तेजश्च बलं च शौचम्। आयुष्यमारोग्यमलोलुपत्वं दुःस्वप्ननाशश्च यशश्चमेधेति ॥ ३ ॥ याज्ञवल्क्यः—भूमिष्ठमुद्धतात्पुण्यं ततः प्रस्रवणोदकम्। ततोऽपि सारसं पुण्यं तस्मान्नादेयमुच्यते। तीर्थतोयं ततः पुण्यं ततोगांगं तु सर्वत इति ॥ ४ ॥ विष्णुः—स्रोतसोभिमुखं स्नायान्नदीषु प्रवहज्जले। स्थावरे च तडागे च रवेरभिमुखं सदेति ॥ ५ ॥ याज्ञवल्क्यः—तत्वायामीति मंत्रेण वारुणेन तटे स्थितः। उदुत्तममिति स्मृत्वा ह्यवतीर्य जलाशये। आवाह्य वारुणं स्नानमाचरेदिति ॥ ६ ॥ मनुः—नाभिमात्रे जले गत्वा त्रिः कुर्यान्मज्जनं ततः। गात्राणां क्षालनं कृत्वा सम्यक् स्नायात्ततः परमिति ॥ ७ ॥ जलमध्ये जलेन त्विति वक्ष्यमाणप्रकारेण तिलकं कृत्वा ॥ ८ ॥

स्नानाविषयीं तत्पर असणाऱ्या चांगल्या मनुष्यास, रूप, पराक्रम, बल, स्वच्छता, आयुष्य, आरोग्य, चपलत्व, दुष्ट स्वप्नाचा नाश, कीर्ति आणि धारणावती बुद्धि हे दहा गुण प्राप्त होतात. ३ याज्ञवल्क्य—कुव्याचें पाणी, पर्जन्यानें सांचलेलें जमिनीवरचें पाणी, पर्वतादिकांच्या झऱ्याचें पाणी, सरोवराचें पाणी, नदीचें पाणी, पुराण प्रसिद्ध गोदावरी वगैरेंचें पाणी आणि सर्वांपेक्षां गंगेचें पाणी हीं एकापेक्षां एक अधिक अशा क्रमानें स्नानाविषयीं महापवित्र आहेत. ४ विष्णु—नद्यांत वाहत्या पाण्यांत ओघाकडे तोंड करून आणि कोंडलेल्या पाण्यांत व तळ्यांत सूर्या-कडे तोंड करून नेहमीं स्नान करावें. ५ याज्ञवल्क्य—काठावर उभें राहून 'तत्वायामि' आणि 'उदुत्तम' ह्या वरुण देवतेच्या मंत्रांनीं वरुणाचें आवाहन करून मग नदी वगैरेंत उतरून स्नान करावें ६. मनु—कमरे एवढ्या पाण्यांत जाऊन तीनदां बुडी मारावी. नंतर अंग चोळून धुवून समंत्रक स्नान करावें ७. डाव्या हातावर पाणी घेऊन त्याचें गायत्रीमंत्रानें अभिमंत्रण करावें आणि गृहस्नानप्रक-रणांत सांगितलेल्या 'अतोदेवा अवंतुनो' या मंत्रापासून 'विष्णोर्यत्परमं पदम्' येथपर्यंत सहा ऋचांच्या सूक्तानें त्या पाण्याचा तिलक करून ८.

प्रयोगपारिजाते—आचम्य मार्जनं कुर्यादापोहिष्ठेतिवारुणैः । इमं मे गंग इत्यंभ आलोड्य चाघमर्षणम् । अंतर्जले मुखं कृत्वा कुर्यान्नासाग्रपीडनम् । ऋतं चेति तृचं चैव द्रुपदां च ततो जपेदिति ॥९॥ ब्रह्मवैवर्ते—नाभिमात्रे जले स्थित्वा कुर्यात्स्नानांगतर्पणम् । देवानृषीन्पितृगणान्स्वपितॄंश्चापि तर्पयेदिति ॥ १० ॥ काष्र्णाजिनिः—देवर्षि पितॄणां चैव एकद्वित्रिक्रमेण तु । जले दद्याज्जलं चात्र असंस्कृतांस्तटे तथेति ॥ ११ ॥ व्यासः—यज्ञोपवीती देवानां निवीती ऋषितर्पणे। प्राचीनावीती पित्र्ये तु स्वेन तीर्थेन भावित इति ॥ १२ ॥ उशनाः—द्वौ हस्तौ युग्मतः कृत्वा पूरयेदुदकांजलिम् । गोशृंगमात्रमुद्धृत्य जलमध्ये जलं क्षिपेदिति ॥ १३ ॥

प्रयोगपारिजातांत—आचमन करून 'आपोहिष्ठा' ह्या वरुण देवतेच्या मंत्रांनीं मार्जन करावें, आणि 'इमं मे गंगे' ह्या मंत्रानें उदक हलवून पाण्यांत तोंड घालून उजव्या हातानें नाक दाबावें, आणि 'ऋतं च सत्यं' ह्या तीन ऋचा व 'द्रुपदादिवे' ही एक ऋचा ह्यांचा जप करून नाकाच्या उजव्या रंध्रानें वायूचें विसर्जन करावें. हेंच अघमर्षण म्हणजे पापाचें दूरीकरण होय. ९ ब्रह्मवैवर्तांत—कमरे एवढ्या पाण्यांत उभें राहून स्नानांग तर्पण करावें, तें असें—ब्रह्मादिदेव, कृष्णद्वैपायनादि ऋषि, सोमादि पितर, आणि ज्याचा बाप मेला असेल त्यानें पितृपितामहादि आपले पितर ह्यांचें तर्पण करावें. १०. काष्र्णाजिनि—देव, ऋषि व पितर ह्यांच्या उद्देशानें क्रमानें एकेक, दोन दोन, व तीन तीन अंजलींनीं पाण्यांत पाणी सोडावें, आणि आपल्या कुळांत उत्पन्न झालेले मुंज न झालेल्यांच्या उद्देशानें काठावर तीन ओंजळी पाणी सोडावें. ११. व्यास—जानवें डाव्या खांद्यावर ठेवून देवतीर्थानें देवांचें, माळेसारखें गळ्यांत लोंबकळतें सोडून प्रजापतितीर्थानें ऋषींचें आणि उजव्या खांद्यावर ठेवून पितृतीर्थानें पितरांचें तर्पण करावें. यज्ञोपवीताची (जानव्याची) उपोद्घातांत (पृष्ठ १० पहा.) व तीर्थांची आचमन प्रकरणांत (पृष्ठ३७ पहा.) व्याख्या केली आहे. १२. उशनस्—दोन हात जुळून पाण्यानें ओंजळ भरून गाईच्या शिंगा इतकी ऊंच करून त्यांतील पाणी पाण्यांत सोडावें. १३.

भगवान्—स्नानांगतर्पणं कृत्वा यक्ष्मणे जलमाहरेदिति ॥ १४ ॥ शातातपः—बहिर्नद्यादिष्वाचांतः सोदकः किंचिद्-स्पृशन् । रथ्यागतोऽपि यत्नेन शुचिरेव हि मानव इति ॥१५॥

## इति प्रातःस्नानविधिः

---

**भगवान**—स्नागांगतर्पण करून यक्ष्माच्या उद्देशानें उदक द्यावें. १४. **शाता-तप**—घरापासून बाहेर नदी, जलाशय इत्यादिकांत स्नान केलेला मनुष्य पाणी घेऊन कोणासही न शिवतां व अपवित्र वस्तूवर पाय न देतां मार्गांतून चालत आला तरी नित्यकर्माविषयीं तो मनुष्य पवित्रच असतो. १५.

याप्रमाणें प्रातःस्नानाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ प्रातःस्नानप्रयोगः

ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःस्नानं करिष्ये ॥ १ ॥ तत्वायाम्युदुत्तममित्यनयो राजीगर्तिः शुनःशेपोवरुणस्त्रिष्टुप् ॥ वरुणावाहने विनियोगः ॥ २ ॥ ओंतत्वांयामि ब्रह्मणा वंदमानस्तदाशास्ते यजमानोहविर्भिः । अहेळमानो वरुणेहबोध्युरुशं समानऽआयुः प्रमोषीः ॥ ३ ॥

## प्रातःस्नानाचा प्रयोग.

माझ्या संचित पापाचा नाश होऊन त्याच पापक्षयरूप साधनानें श्रीपरमेश्वराची प्रीति व्हावी त्यासाठीं मी प्रातःस्नान करतों. १. तत्वायामि व उदुत्तमम् या दोन ऋचांचा अजीगर्ताचा पुत्र शुनःशेप नांवाचा ऋषि, वरुण देवता, त्रि प् छंद आणि वरुणाच्या आवाहनाविषयीं उपयोग. २. बहुत लोक ज्याची प्रशंसा करतात अशा हे वरुणा, आमचें आयुष्य हरण करूं नको. यज्ञ करणाराही वेदमंत्रानें स्तुति करीत असतां, हविर्भाग देऊन तें ( जें आयुष्य तूं हरण करतोस तें ) प्रार्थितो. अल्पायुषी मी तुझ्या जवळचें आयुष्य मागतों. ह्याविषयीं आनादर न करतां आमचें अपेक्षित जाण. ३.

ओंउदुत्तमं वरुणपाशमस्मदवाधमं विमध्यमं श्रथाय। अथावयमा-
दित्यव्रतेतवानागसोऽअदितये स्याम ॥ ४ ॥ ओं श्रीकेशवाय
नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ५ ॥ आपोहिष्ठेतिनवर्चस्य
सूक्तस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोगायत्री । पंचमीवर्धमाना ।
सप्तमी प्रतिष्ठा । अंत्ये द्वे अनुष्टुभौ । मार्जने विनियोगः ॥६॥
ओं आपोहिष्ठा मयोभुव स्तानऽऊर्जेदधातन । महेरणाय
चक्षसे ॥ ७ ॥ ओं योवः शिवतमोरसस्तस्यभाजयतेहनः ।
उशतीरिव मातरः ॥ ८ ॥ ओं तस्माऽअरंग मामवो यस्य क्ष-
याय जिन्वथ । आपो जनयथाचनः ॥ ९ ॥ ओं शन्नो देवी
रभिष्टयऽआपोभवंतु पीतये । शंयोरभिस्रवंतु नः ॥ १० ॥
ओं ईशाना वार्याणां क्षयंतीश्चर्षणीनाम् । अपोयाचामि भेष-
जम् ॥ ११ ॥ ओं अप्सु मे सोमोऽअब्रवीदंतर्विश्वानि भेषजा ।
अग्निं च विश्वशंभुवम् ॥ १२ ॥ ओं आपः पृणीत भेषजं वरूथं
तन्वे३मम । ज्योक्च सूर्यंदृशे ॥ १३ ॥ ओं इदमापः प्रवहत-
यत्किं च दुरितं मयि। यद्वाहमभि दुद्रोहयद्वाशेपउतानृतम्॥१४॥
ओं आपोऽअद्यान्वचारिषं रसेन समगस्महि । पयस्वानग्नऽ-
आगहि तंमासं सृजवर्चसा ॥ १५ ॥ इमं मे इत्यस्याः प्रैयमेधः
सिंधुक्षिन्नद्यो जगती । अंभ आलोडने विनियोगः ॥ १६ ॥
इमं मे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रिस्तोमं सचतापरुष्ण्या ।
असिक्न्यामरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्या सुषोमया ॥१७॥

हे वरुणा, आमच्या ऊर्ध्वभागीं, अधोभागीं आणि मध्यभागीं बांधलेला पाश सोड. हे अदितीच्या पुत्रा वरुणा, नंतर आह्मी (शुनः शेप) तुझें अखंड व्रत करण्यास समर्थ होऊं. ४. ओंश्रीकेशवाय० अर्थ मागें लिहिला आहे. (पृष्ठ ३९-४८ पहा). ९ आपोहिष्ठा० या दहा ऋचांचा अर्थ प्रातःसंध्येंत लिहावयाचा आहे. ६-७-८-९-१०-११-१२-१३-१४-१५. इमं गे गंगे ह्या ऋचेचा प्रियमेधाचा पुत्र सिंधुक्षित् नांवाचा ऋषि, नद्या देवता, जगती छंद, उदक हलविण्याकडे उपयोग. १६. हे गंगे, हे यमुने, हे सरस्वति, हे शुतुद्रि, हे परुष्णि, हे असिक्नीसहित मरुद्वृधे, हे वितस्ती आणि सोमा ह्यांसहित आर्जीकीये, तुह्मी हें माझें स्तोत्र ऐका आणि त्याचा स्वीकार करा. १७.

ऋतंचेति तृचस्यमाधुच्छंदसोऽघमर्षणोभाववृतोऽनुष्टुप् ॥ अघमर्षणे विनियोगः ॥ १८ ॥ ऋतंचसत्यं चाभीद्धात्तपसोध्यं जायत । ततोरात्र्य जायत ततः समुद्रोऽअर्णवः ॥ १९ ॥ समुद्रादर्णवा दधि संवत्सरोऽअजायत । अहोरात्राणि विदधद्विश्वस्यमिषतोवशी ॥ २० ॥ सूर्याचंद्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् । दिवं च पृथिवीं चांतरिक्षमथोस्वः ॥ २१ ॥ द्रुपदादिवमुमुचानः । स्विन्नः स्नातोमलादिव । पूतं पवित्रेणेवाज्यम् । आपः । शुद्धंतु मैनसः ॥२२॥ ब्रह्मादयोयेदेवास्तान्देवांस्तर्पयामि । भूर्देवांस्तर्पयामि । भुवर्देवांस्तर्पयामि । स्वर्देवांस्तर्पयामि । भूर्भुवः स्वर्देवांस्तर्पयामि ॥२३॥ कृष्णद्वैपायनादयोयेऋषयस्तानृषींस्तर्पयामि । भूर्ऋषींस्तर्पयामि । भुवर्ऋषींस्तर्पयामि । स्वर्ऋषींस्तर्पयामि । भुर्भूवःस्वर्ऋषींस्तर्पयामि ॥ २४ ॥ सोमः पितृमान्यमोंगिरस्वानग्निष्वात्ताःकव्यवाहनादयोयेपितरः। तान्पितृंस्तर्पयामिः । भूःपितृंस्तर्पयामि । भुवःपितृंस्तर्पयामि । स्वःपितृंस्तर्पयामि । भूर्भवःस्वःपितृंस्तर्पयामि ॥ २५ ॥ अग्निदग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाः कुले मम । भूमौ दत्तेन तोयेन तृप्ता यांतु परां गतिम् ॥ २६ ॥

ऋतंचेति. या चार ऋचांचा अर्थ प्रातःसंध्येंत लिहावयाचा आहे. १८-१९-२०-२१ अपराधी पुरुष राजाच्या खोड्यापासून मुक्त झाला म्हणजे जसा शुद्धासारखा व्यवहृत होतो, स्नान केलेला पुरुष स्नानानें मळापासून मुक्त झाला असतां जसा शुद्ध असाच व्यवहृत[1] होतो, यज्ञांत उत्पवनपवित्रकांनें आज्य जसें शुद्ध होतें, तसें हें उदक पापापासून मला शुद्ध करो. २२. ब्रह्मादि नामकदेव, कृष्णद्वैपायनादिनामक ऋषि आणि सोमादिनामक पितर ह्यांस उदकानें तृप्त करतों. २३-२४-२५. "ज्याचा बाप मेला असेल त्यानें (ब्रह्मयज्ञतर्पणांत लिहिल्याप्रमाणें) आपल्या पितरांचें तर्पण करून असंस्कृतास उदक द्यावयाचें तें सांगतो." दात येण्यापूर्वी मेलेले म्हणून ज्यांच्या शवांचें अग्नीच्या योगानें दहनही झालेलें नाहीं, आणि उपनयनापूर्वी मेलेले म्हणून ज्यांच्या शवांचें केवळ अग्नीच्या योगानें दहन झालें असेल, असे माझ्या कुळांतील लिंगदेह धारण करणारे जीव भूमीवर दिलेल्या उदकानें तृप्त होऊन उत्तम दशेस प्राप्त होवोत. २६.

१ व्यवहार करण्यास योग्य.

यन्मया दूषितं तोयं शारीरमल संभवात्। तद्दोषपरिहारार्थं यक्ष्माणं तर्पयाम्यहम् ॥ २७ ॥

इति प्रातःस्नानप्रयोगः

---

मी माझ्या शरीराच्या घाम इत्यादि मळांनीं जें उदक दूषित केलें त्या दोषाच्या परिहारासाठीं यक्ष्म्याचें ( उदक देवतेचें ) तर्पण करतों. २७.

याप्रमाणें प्रातःस्नानाचा प्रयोग [ सांगितला ].

---

## अथ गृहस्नानविधिः

यमः—आप एव सदा पूतास्तासां वन्हिर्विशोधकः । तस्मात्सर्वेषु कालेषु उष्णांभः पावनं स्मृतं ॥ १ ॥ सार्षपं-गंधतैलं च यत्तैलं पुष्पवासितं । अन्यद्द्रव्ययुतं तैलं न दुष्यति कदाचन ॥ २ ॥ पादौ प्रक्षालयेत्पूर्वं मुखं यज्ञोपवीतकम् । आपोहिष्ठेतिसूक्तेन इमं मे गंग इत्यथ । अतोदेवेतिसूक्तेन सावित्र्या च विशोधयेत्। शीतोदकं तु दर्भैस्तु पश्चादुष्णोदकं क्षिपेदिति ॥ ३ ॥

## घरीं स्नान करण्याचा विधि.

**यम**—पाणी अग्नीनें तापविलें तरी त्याच्या शरीराची शुद्धि करणाऱ्या शक्तीचा नाश होत नाहीं, म्हणून तें नेहमीं पवित्र आहे. आणि पाण्याचा अशक्तास विकार करणारा शीतगुण ( थंडपणा ) अग्नि नाहींसा करतो, म्हणून उषःकाल ( पहाट ) शीतकाल ( थंडीचे दिवस ) इत्यादिकांतही ऊन पाणी हें शरीरास विकार न करतां शुद्धि करणारें असें पवित्र आहे. १. "ऊन पाण्यानें स्नान केलें तरी शरीरास विकार होईल असें अनुमान झाल्यास ऊन तेल किंवा औषधींनीं सिद्ध केलेलें तेल अंगास लावून ऊन पाण्यानें स्नान करावें हा दुसरा उपाय सांगतो." शिरसेल तेल, सुगंधी पदार्थांनीं सिद्ध केलेलें तेल, फुलांनीं सुवासित केलेलें तेल (चमेली, मोगरेल इत्यादि) आणि दुसऱ्या औषधींनीं युक्त असें तेल प्रकृतीच्या मानानें शरीरास लावून स्नान केलें असतां हरकत नाहीं. २. प्रथम दोन पाय धुवावे नंतर तोंड व जानवें धुवावें. नंतर

'आपोहिष्ठा' हें सूक्त, 'इमं मे गंगे' ही ऋचा, 'अतो देवा' हें सूक्त व गायत्रीमंत्र यांच्या योगानें दर्भांनीं थंड पाण्याचें अभिमंत्र करून नंतर त्यांत ऊन पाणी घालावें. ३.

कात्यायनः—गृहे गृहमुखं स्नानमिति ॥४॥ बौधायनः—
गृहस्नाने न तु प्रोक्तं मार्जनं तर्पणादिकम् । नांतराचमनं प्रोक्तं
पश्चादाचम्य शुध्यतीति ॥ ५ ॥ यत्र पुंसः सचैलं स्यात्स्नानं तत्र
सुवासिनी । कुर्वीतैवाशिरःस्नानं शिरोरोगी जटी तथेति ॥६॥

इति गृहस्नानविधिः

---

**कात्यायन**—घरीं घरच्या मध्यभागाकडे मुख करून स्नान करावें. ४. **बौधायन**—घरीं स्नान करावयाचें असतां पूर्वीं प्रातःस्नान प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें स्नानाचें अंगभूत आचमन, मार्जन, जलाचें आलोडन, अघमर्षण व तर्पण हीं कर्मं न करतां स्नानानंतर आचमन करावें म्हणजे शुद्ध होतो. ५. यथाविहित नित्य कर्माच्या अधिकाराविषयीं पुरुषानें डोकीवरून स्नान करावें असें उपोद्घातांत सांगितलें, परंतु सुवासिनी स्त्रीनें मस्तकावरून स्नान करूं नये. कारण सुवासिनीचा वेणीसंस्कार मस्तकशुद्धीस कारण आहे. तसेंच मस्तकरोगी व जटाधारण करणारा ह्यांनींही शरीराच्या रक्षणासाठीं मस्तक न भिजवितां स्नान करावें. ६.

याप्रमाणें घरीं स्नान करण्याचा विधि [ सांगितला ].

---

## अथ गृहस्नानप्रयोगः

ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःस्नानमहं
करिष्ये ॥ १ ॥ आपोहिष्ठेति नवर्चस्य० मार्जने विनियोगः ।
ओमापोहिष्ठा मयोभुव० तं मासं सृजवर्चसा ॥ २ ॥

## घरीं स्नान करण्याचा प्रयोग.

माझ्या संचित पापाच्या नाशरूपद्वारानें श्रीपरमेश्वराच्या प्रीतीकरितां प्रातःकाळीं विहित स्नान मी करतों. १. जवळच्या दोन अक्षरांमध्यें असलेल्या '०' अशा बिंदूस गणांत म्हणजे गणाचा मध्यावयव दाखविणारें चिन्ह म्हणतात. जो प्रयोग एकदां लिहिला, पुन्हा त्याच्या लिहिण्याचें गौरव होऊं नये म्हणून याची (० या चिन्हाची) योजना केली आहे. ऋष्यादिकांसह हें मार्जन पूर्वीं प्रातःस्नानांत लिहिलें आहे. २.

इमं मे प्रैयमेधः सिंधुक्षिन्नद्योजगती । उदकविशोधने विनियोगः ॥ ३ ॥ ओमिमंमें गंगे० सुषोमया ॥४॥ अतोदेवेति सूक्तस्य काण्वो मेधातिथिर्विष्णुर्गायत्री । उदकविशोधने विनियोगः ॥ ५॥ ओमतो देवाऽअवंतुनो यतो विष्णु विंचक्रमे । पृथिव्याः सप्तधामभिः ॥ ६ ॥ इदं विष्णु र्विचक्रमे त्रेधानिदधे पदम् । समूढमस्यपांसुरे ॥ ७ ॥ त्रीणिपदा विचक्रमे विष्णुर्गोपाऽअदाभ्यः । अतो धर्माणि धारयन् ॥ ८ ॥ विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानि पस्पशे । इंद्रस्य युज्यः सखा ॥ ९ ॥ तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यंति सूरयः । दिवीव चक्षुराततम् ॥ १० ॥ तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिंधते । विष्णोर्यत्परमं पदम् ॥ ११ ॥

ऋषि, देवता व छंद पूर्वी स्पष्ट लिहिले आहेत. उदकाच्या स्नान योग्य शुद्धि करण्याकडे उपयोग. ३. अर्थ पूर्वी लिहिला. (पृष्ठ ४७ पहा) ४. 'अतोदेवा अवंतुनो' या सूक्ताचा कण्वाचा पुत्र मेधातिथि नांवाचा ऋषि, विष्णुदेवता, गायत्री छंद, आणि उदकाची शुद्धि करण्याकडे उपयोग. ५. विष्णूनें त्रिविक्रमावतारीं गायत्र्यादि सात छंदांच्या योगानें ज्या पृथ्वीपासून नाना प्रकारचें पादक्रमण केलें त्या पृथ्वीवर असणाऱ्या आमचें पापापासून विष्ण्वादि देव संरक्षण करोत. ६. विष्णूनें जगतांत आक्रमण करून तीन प्रकारचें पादस्थापन केलें, तेव्हां त्या विष्णूच्या धूलियुक्त पादस्थानीं सर्व जगत अंतर्भूत झालें. ७. ज्याचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं आणि सर्व जगतांचें रक्षण करणारा अशा विष्णूनें ह्या पृथिव्यादिस्थानांमध्यें अग्निहोत्रादि धर्मांचें पोषण करीत असतां तीन पदांचें आक्रमण केलें ८. हे ऋत्विजादिकांनो, विष्णूचीं पालनादि कर्में पहा. ज्या कर्मांच्या योगानें यजमानानें अग्निहोत्रादि व्रतांचें अनुष्ठान केलें, असा विष्णु इंद्राचें आनुकूल्य करणारा योग्य सखा ( मित्र ) होय. ९. विद्वान् ऋत्विजादिक विष्णूच्या त्या शास्त्रप्रसिद्ध उत्कृष्ट स्वर्गपदास शास्त्रदृष्टीनें नेहमीं पहातात. यास दृष्टांत—जसें, अवकाशांत प्रसृत पदार्थ नेत्रानें दिसतो तसें. १०. पूर्वी सांगितलेलें जें विष्णूचें परमपद आहे तें, शद्बार्थमध्यें चुका न येऊं देणारे असें जागरूक आणि विशेष स्तुति करणारे अशा विप्रांस उत्तम प्रकारानें दिसतें. ११.

गायत्र्या गाथिनो विश्वामित्रः सविता गायत्री । उदकविशोधने विनियोगः ॥१२॥ ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ॥ १३ ॥

इति गृहस्नानप्रयोगः

---

प्रातःसंध्येंत ऋष्यादिकांचा अर्थ लिहावयाचा आहे. उदकाच्या शोधनाविषयीं उपयोग. १२. प्रातःसंध्येंत अर्थ लिहावयाचा आहे.

यााप्रमाणें घरीं स्नान करण्याचा प्रयोग [ सांगितला ].

---

## अथ वस्त्रधारणविधिः

याज्ञवल्क्यः—वामकुक्षौ च नाभौ च पृष्ठे चैव यथाक्रमम् । आजानुमूलं वस्त्रं स्यात्त्रिकच्छं धारयेद्द्विजः । तन्न्यूनमधिकं चैव कर्मभ्रष्टो भवेद्द्विजः॥ १ ॥ अष्टहस्तं नवं श्वेतं सदशं नान्यधारितं। अहतं तद्विजानीयात्सर्वकर्मसु पावनमिति ॥२॥ देवलः—स्वयं धौतेन कर्तव्या क्रिया धर्म्या विपश्चिता । न तु नेजकधौतेन नाहतेन न कर्हिचित् इति ॥ ३ ॥

## वस्त्र नेसण्याचाविधि.

**याज्ञवल्क्य**—डावीकुशी, बेंबी आणि पाठ या तीन भागांत क्रमानें खोचलेलें आणि गुडध्या पर्यंत पोचणारें असें कापसाचें वस्त्र द्विजानें परिधान करावें. यापेक्षां कमी अथवा अधिक असल्यास लज्जानिवारण व संध्यादि अनुष्ठानामध्यें परिधान वस्त्रानें घोंटाळा न होणें या कर्मापासून ( संध्यादिकर्माच्या फळांपासून ) तो भ्रष्ट होतो. १. दोन बाजूंस दशा असून नेसणाराच्या हातानें आठ हात लांब, पांढरें, दुसऱ्यानें न नेसलेलें आणि नव म्ह० तीन रात्रींच्या आंत धुतलेलें व अशुचिस्पर्शरहित अशा वस्त्रास अहत असें म्हणतात. हें नित्यनैमित्तिककर्मसमयीं परिधान करण्यास पवित्र होय. २. देवल—धर्मशास्त्र जाणणारानें स्वतां धुतलेलें वस्त्र नेसून संध्यादिकर्म करावें. परिटानें धुतलेलें किंवा पूर्वींच्या श्लोकांत सांगितलेल्या लक्षणाहून भिन्न लक्षणाचें वस्त्र संध्यादिकर्मांत नेसूं नये. ३.

शातातपः—प्रागग्रमुदगग्रं वा धौतं वासः प्रसारयेत्। दक्षिणाग्रं पश्चिमाग्रं पुनः प्रक्षालनं भवेदिति ॥४॥ याज्ञवल्क्यः—अलाभे धौतवस्त्रस्य शाणक्षौमाविकानि च। कुतपं योगपट्टं च विवासास्तु न वै भवेदिति ॥५॥ विष्णुपुराणे—होमदेवार्चनाद्यासु क्रियासु स्नानभोजने। नैकवस्त्रः प्रवर्तेत द्विजोनाचमने तथेति ॥६॥ पारस्करगृह्ये—एकं चेद्वासो भवति तस्यैवोत्तरवर्गेण प्रच्छादयीतेति ॥ ७ ॥ परशुरामनिबंधे—यज्ञोपवीते द्वे धार्ये श्रौते स्मार्ते च कर्मणि। तृतीयमुत्तरीयार्थं वस्त्राभावे तदिष्यत इति ॥ ८ ॥

## इति वस्त्रधारणविधिः

---

शातातप—धुतलेलें वस्त्र पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे दशा करून वाळत घालावें. दक्षिणेकडे किंवा पश्चिमेकडे दशा करून वाळत घातलें असतां संध्यादिकर्मांत त्याचा उपयोग होत नाहीं म्हणून पुन्हा धुऊन त्याचा संध्यादिकर्मांत उपयोग करावा. ४. याज्ञवल्क्य—पूर्वीं सांगितलेल्या प्रकारचें कापसाचें वस्त्र धुतलेलें नसेल तर अशुचि स्पर्शरहित सणाचें ( तागाचें ) वस्त्र, मेंढा, छाग, ( बकरें ) किंवा मूषक यांच्या केंसांचें वस्त्र, नेपाळकंबल ( शाल ) अथवा योगपट्ट ( रेशमी, तृणाचें वल्कल इत्यादि वस्त्र ) परिधान करावें. ५. विष्णुपुराणांत—होम, देवपूजा वगैरे कृत्यें, स्नान व भोजन व आचमन हीं कर्मे द्विजानें एक वस्त्र परिधान करून करूं नयेत, म्हणून दुसरें वस्त्र ( उत्तरीय-उपरणें ) घेऊन वरील क्रिया कराव्या. ६. पारस्करगृह्यसूत्रांत—एकच वस्त्र असलें तर त्याच्या पुढच्या निऱ्यांनीं ऊर्ध्व भागाचें आच्छादन करावें. ७. परशुरामनिबंधांत—गृहस्थानें श्रौतस्मार्तकर्माविषयीं यज्ञोपवीतें ( जानवीं ) दोन घालावीं, आ[illegible] उत्तरीय वस्त्राच्या अभावीं कर्मांत वैगुण्य येऊं नये म्हणून तिसरें यज्ञोपवीत धारण करावें. ८.

### याप्रमाणें वस्त्र नेसण्याचा विधि [ सांगितला ].

---

## अथ तिलकविधिः

प्रयोगपारिजाते—ललाटे तिलकं कृत्वा संध्याकर्म समाचरेत् ॥१॥ मृद्भस्मचंदनं प्रोक्तं तोयं चैव चतुर्थकं । स्नात्वा पुंड्रं मृदा कुर्याद्धुत्वा चैष तु भस्मना । देवानभ्यर्च्य गंधेन जलमध्ये जलेन तु ॥ २ ॥ ऊर्ध्वपुंड्रं मृदा कुर्यात्तिर्यक् चैव तु भस्मना । उभयं चंदनेनैव अभ्यंगोत्सवरात्रिष्विति ॥ ३ ॥ ब्रह्मपुराणे—पर्वताग्रे नदीतीरे रामक्षेत्रे विशेषतः । सिंधुतीरे च वल्मीके तुलसीमूल आश्रिता । जान्हवीतीरसंभूता द्वारावत्युद्भवा तथा । मृद एतास्तु संपाद्या वर्जयेदन्यमृत्तिका इति ॥४॥ व्यासः—वामहस्ते जलं कृत्वा सावित्र्या चाभिमंत्रितं। तद्विष्णोरितिमंत्रेण मर्दयेन्मृत्तिकां ततः । अतोदेवेति सूक्तेन तिलकं धारयेत्सदेति ॥ ५ ॥

## तिलकाचा ( गंध लावण्याचा ) विधि.

**प्रयोगपारिजातांत**—कपाळीं तिलक करून संध्यास्नान इत्यादि नित्यकर्म करावें. १. माती, भस्म, चंदन आणि पाणी हे चार पदार्थ तिलकद्रव्य होत. स्नानविधि कर्तव्य असतां पाण्यामध्यें पाण्यानें तिलक करावा. स्नानानंतर मातीनें, नित्य होमानंतर भस्मानें आणि देवपूजा केल्यानंतर चंदनानें तिलक करावा. २ मातीनें उभा, भस्मानें आडवा आणि चंदनानें उभा अथवा आडवा तिलक करावा. विवाहादि उत्साहांत किंवा ( अशुचित्व निवृत्ति होण्याकरितां ) रात्रौं स्नान केलें तर चंदनानेंच तिलक करावा. ३. **ब्रह्मपुराणांत**—पर्वताचें शिखर, नदीचें तीर, रामक्षेत्र, म्ह० रामानें जेथें जेथें निवास केला तें दंडकारण्यादि, समुद्राचा काठ, वारूळ, तुळशीचें आळें, भागीरथीचें तीर, व द्वारका ह्या ठिकाणची माती तिलक करण्यास घ्यावी. ह्यांशिवाय दुसऱ्या ठिकाणची माती घेऊं नये. ४. **व्यास**—डाव्या हातावर पाणी घेऊन त्याचें गायत्रीमंत्रानें अभिमंत्रण करावें आणि ‘ अतोदेवा ’ या सूक्तानें तिलक करावा. तसेंच मातीचा तिलक कर्तव्य असतां ‘ तद्विष्णोः ’ या मंत्रानें डाव्या हातावर मातीचें मर्दन करून ‘ अतोदेवा ’ या सूक्तानें तिलक करावा. ५.

संग्रहे—अग्निहोत्राग्निजं भस्म औपासनसमुद्भवं । धार्यं भस्म त्रिसंध्यं तु गृहिणा जलसंयुतमिति ॥६॥ क्रियासारे—वामहस्ततले भस्म क्षिप्त्वाच्छाद्यान्यपाणिना । अग्निरित्यादिमंत्रेण स्पृशन्भस्माभिमंत्र्य चेति ॥ ७ ॥ संग्रहे—मध्यांगुलित्रयेणैव स्वदक्षिणकरस्य च । ललाटे हृदये कंठे बाव्होः पृष्ठे परे गले ॥ ८ ॥ पुलस्त्यः—शिवमंत्रेण तद्भस्म मंत्रेणाष्टाक्षरेण वा । गायत्र्या वाथ देवर्षे मंत्रेण प्रणवेन वा । करोति शिवमंत्रेण यस्त्रिपुंड्रं द्विजोत्तमः । त्र्यक्षः शूलधरः सौम्यः शिवलोके महीयते । अष्टाक्षरेण मंत्रेण यः करोति त्रिपुंड्रकम् । विष्णोः पदमवाप्नोति नान्यथा श्रुतिचोदितम् । सौरं पदमवाप्नोति गायत्र्या मुनिसत्तम । प्राप्नोति ब्रह्मणोरूपं प्रणवेन न संशय इति ॥ ९ ॥ इति तिलकविधिः

---

संग्रहांत—गृहस्थानें अग्निहोत्राग्नीचें अथवा गृह्याग्नीचें भस्म घेऊन त्याचा सकाळीं, मध्यान्हीं आणि संध्याकाळीं पाण्यानें भिजवून तिलक करावा. ह्या तिन्ही कालांत भस्माचा तिलक प्रशस्त आहे. ६. क्रियासारांत—डाव्या हातावर भस्म घेऊन त्यावर उजवा हात ठेवून ' अग्निरिति भस्म ' इत्यादि मंत्रांनीं स्पर्श करीत त्यांचें अभिमंत्रण करून. ७. संग्रहांत--आपल्या उजव्या हाताच्या मधल्या तीन बोटांनीं कपाळ, हृदय, गळ्याचा पुढला भाग, बाहु ( दंड ), पृष्ठभाग, मस्तक आणि गळ्याचा मागला भाग ह्यांस क्रमानें पुढें सांगावयाच्या मंत्रानें भस्माचा तिलक करावा. ८. पुलस्त्य—त्र्यंबकमंत्रानें, नारायणाच्या अष्टाक्षर (ॐ नमो नारायणाय) मंत्रानें गायत्रीमंत्रानें अथवा प्रणवमंत्रानें भस्माचा तिलक करावा. जो ब्राह्मण त्र्यंबकमंत्रानें भस्माचा त्रिपुंड्र करील तो त्रिनेत्र ( तीन डोळ्यांचा ), शूलायुध धारण करणारा, व शांत असा होऊन शिवलोकांत पूज्य होईल. नारायणाच्या अष्टाक्षरमंत्रानें जो त्रिपुंड्र धारण करील तो विष्णूच्या पदास प्राप्त होईल. हे मुनिश्रेष्ठा (जाबाला), हें भस्माचें महात्म्य श्रुतींत सांगितलें आहे, तें असत्य असणार नाहीं. गायत्रीनें सूर्याचें स्थान प्राप्त होतें, आणि प्रणवानें ब्रह्मस्वरूपीं व्याप्त होतो, यांत संशय नाहीं. ९

याप्रमाणें तिलकाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ तिलकः

गायत्र्या गाथिनो विश्वामित्रः सविता गायत्री । जलाभि-मंत्रणे विनियोगः ॥ १ ॥ ओं तत्संवि तु० प्रचोदयात् ॥२॥ तद्विष्णोरितिमंत्रस्य काण्वोमेधातिथिर्विष्णुर्गायत्री । मृत्तिकामर्दने विनियोगः ॥ ३ ॥ ओं तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यंति सूरयः । दिवीव चक्षुराततम् ॥ ४ ॥ अतोदेवेति सूक्तस्य० विष्णुर्गायत्री । तिलकधारणे विनियोगः ॥ ५ ॥ ओंमतो देवा० विष्णोर्यत्परमं पदम् ॥ ६ ॥ अग्निरितिमंत्रस्य पिप्पलादोरुद्रोगायत्री । भस्माभिमंत्रणे विनियोगः ॥ ७ ॥ ओमग्निरितिभस्म । वायुरिति भस्म । जलमिति भस्म । स्थल मिति भस्म । व्योमेति भस्म । सर्वꣳहवा इदं भस्म । मन एतानि चक्षूंषि भस्मानि ॥ ८ ॥ त्र्यंबकमिति वसिष्ठोरुद्रोऽनुष्टुप् । भस्मधारणे विनियोगः ॥ ९ ॥ त्र्यंबकं यजामहे सुगंधिं पुष्टि वर्धनम् । उर्वारुक मिवबंधनान्मृत्यो र्मुक्षीयमामृतात् ॥ १० ॥

गायत्र्या. ऋष्यादिकांचा अर्थ प्रातःसंध्येंत पहा. उदकाच्या अभिमंत्रणाविषयीं उपयोग. १–२. मातीचें मर्दन करण्याकडे उपयोग. इतर अर्थ गृहस्नानांत लिहिला आहे. ३–४. हें सूक्त व याचा अर्थ गृहस्नानांत लिहिला आहे. (पृष्ठ ९१ पहा) येथें तिलक धारणाविषयीं उपयोग. ५–६. अग्नि अशी आनुपूर्वी प्रथम ज्यांस अशा मंत्रांचा पिप्पलाद ऋषि, रुद्रदेवता, गायत्री छंद आणि भस्माच्या अभिमंत्रणाकडे उपयोग. ७. स्वयंप्रकाश व संसार बीजाच्या भर्त्सनास (दहनास) हेतु अशा योगरूढीनें भस्म हा ब्रह्मवाचक शब्द होय. अग्नि म्ह० तेज, वायु, जल, स्थल म्ह० पृथिवी, व्योम म्ह० आकाश हीं पंचमहाभूतें व सर्व प्रसिद्ध हें कालदिग्रूप अथवा पंचमहाभूतांचे सुवर्णादि विकार किंवा रूपादि गुण आणि मन व हीं नेत्रादि बाह्येंद्रियें हीं सर्व भस्मानें प्रकाशमान होतात. ह्या मंत्रानें संस्कृताग्निज भस्माचें अभिमंत्रण स्मृतिलिंगानें दाखविलें आहे. ८. या मंत्राचा वसिष्ठ ऋषि, रुद्रदेवता, अनुष्टुप् छंद आणि भस्म धारणाकडे उपयोग. ९. शोभन आहे शरीरगंध अथवा पुण्यगंध ज्यास अशा आणि शरीरधनादि संबंधी पुष्टीची वृद्धि करणाऱ्या त्र्यंबकाचें आराधन करतों. जसें उर्वारुक (काकडींतला भेद–चिबडें) देंठापासून स्वतां मुक्त होतें, तसें त्र्यंबकाच्या प्रसादानें मृत्यू

पासून मुक्त होईन, आणि चिरकाल जीवन आहे ज्यामध्यें अशा स्वर्गापासून मुक्त न होतां तेथें निरंतर वास करीन. १०.

ॐ नमो नारायणाय ॥ ११ ॥ गायत्र्या० गायत्री । भस्मधारणे विनियोगः । ओं तत्संवितु वरेंण्यं भर्गो । देवस्य धीमहि । धियोयोनः प्रचोदयात् ॥ १२ ॥

इति तिलकः

---

ॐ म्ह० कल्याणप्राप्तीकरितां अथवा मंगलस्वरूप अशा नारायणास नमस्कार असो. ११. प्रातःसंध्येंत अर्थ लिहावयाचा आहे. १२.

याप्रमाणें तिलक [ सांगितला ].

---

## अथ प्रातःसंध्योपासनविधिः

गृह्यपरिशिष्टे—यावदहोरात्रयोः संधी यश्च पूर्वाण्हपराण्हयोस्तत्कालभवा देवता संध्यातामुपासीतेति ॥१॥ मरीचिः—संध्या येन न विज्ञाता संध्या येनानुपासिता । जीवमानोभवेच्छूद्रोमृतः श्वा चाभिजायते इति ॥ २ ॥

## प्रातःसंध्योपासनविधिः[१]

**गृह्यपरिशिष्टांत**—दिवस आणि रात्र आणि रात्र आणि दिवस यांचे जे दोन संधि ( संध्याकाळ व सकाळ ) आणि दिवसाचा पूर्वार्ध व उत्तरार्ध यांचा संधि ( मध्यान्हकाळ ) या तीन संधींमध्यें ज्या देवतेचें अनुष्ठान करावयाचें त्या देवतेस योगरूढीनें ' संध्या ' असें म्हणतात. त्या संध्येची द्विजानें नित्य उपासना करावी १. **मरीचि**—जो द्विज संध्यामंत्रांचा अर्थ जाणत नाहीं व नित्य संध्या करीत नाहीं तो जिवंत असतां शूद्राप्रमाणें होऊन मेल्यानंतर कुत्रा होतो. २.

---

१ सकाळीं संध्या करण्याचा विधि.

८

दक्षः—संध्याहीनोऽशुचिर्नित्यमनर्हः सर्वकर्मसु । यदन्यत्कुरुते कर्म न तस्य फलभाग्भवेदिति ॥ ३ ॥ अत्रिः—संध्यात्रयं तु कर्तव्यं द्विजेनात्मविदा सदेति ॥ ४ ॥ व्यासः--गायत्रीनाम पूर्वाण्हे सावित्री मध्यमे दिने । सरस्वती च सायान्हे सैव संध्या त्रिषु स्मृता ॥ ५ ॥ गायत्री तु भवेद्रक्ता सावित्री शुक्लवर्णिका । सरस्वती तथा कृष्णा उपास्या वर्णभेदतः ॥ ६ ॥ गायत्री ब्रह्मरूपा तु सावित्री रुद्ररूपिणी । सरस्वती विष्णुरूपा उपास्या रूपभेदतः ॥ ७ ॥ प्रतिग्रहान्नदोषाच्च पातकादुपपातकात् । गायत्री प्रोच्यते यस्माद्गायंतं त्रायते ततः ॥ सवितृद्योतनात्सैव सावित्री परिकीर्तिता । जगतः प्रसवित्री वाग्रूपत्वात्सा सरस्वती ॥ ८ ॥ संध्येति सूर्यगं ब्रह्म संधानादविभागतः । ब्रह्माद्यैः सकलैर्भूतैः स्तंबांतैः सच्चिदात्मनः । तस्य दासोऽहमस्मीति सोऽहमस्मीति वा मतिः । भवेदुपासकस्येति ह्येवंबहुविदोविदुरिति ॥ ९ ॥

दक्ष—संध्या न करणारा म्हणून अपवित्र द्विज सर्व कर्में करण्यास अयोग्य होतो. तो जें दुसरें धर्मकृत्य करील त्या कृत्याचें फळ त्याला मिळणार नाहीं. ३. अत्रि—ब्रह्मसाक्षात्कार इच्छिणाऱ्या द्विजानें प्रातःसंध्येचें, मध्यान्हसंध्येचें आणि सायंसंध्येचें सर्वदा अनुष्ठान करावें. ४. व्यास—तिन्ही काळांत संध्याही अनुष्ठेय देवता एकच असून तिला प्रातःकाळीं गायत्री, मध्यान्हकाळीं सावित्री आणि सायंकाळीं सरस्वती असें म्हणतात. ५ गायत्री रक्तवर्णा, सावित्री शुक्लवर्णा व सरस्वती कृष्णवर्णा अशा वर्णभेदानें संध्येची उपासना करावी. ६. गायत्री हें ब्रह्मदेवाचें स्वरूप सावित्री हें शिवाचें स्वरूप आणि सरस्वती विष्णूचें स्वरूप अशा रूपभेदानें उपासना करावी. ७. दान घेतल्यापासून लागणारें पाप, विकृतादि अन्नाच्या भक्षणाचें पाप, गोवधादिनिमित्तक उपपातक इत्यादि प्रकारच्या पापांपासून अनुष्ठान करणाऱ्याचें संरक्षण करते म्हणून संध्येस गायत्री असें म्हणतात. ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान उत्पन्न करते म्हणून सावित्री असें म्हणतात, आणि स्थावर जंगमात्मक सृष्टीस उत्पन्न करणारी अथवा सृष्टी रूपानें भासमान होणारी व वेदवाणीमय म्हणून सरस्वती असें म्हणतात. ८. यावज्जगांतील ब्रह्मदेवप्रभृति पृथिव्यादि पंचमहाभूतें आणि त्यांचे विकार चराचर प्राणी इत्यादि सर्व सृष्ट पदार्थांनीं भासमान होणारें प्राधान्यत्वें सूर्यगत असें संध्या

हें ब्रह्म होय. त्या सच्चिदात्मक ब्रम्हाचा मी सेवक आहे, अथवा नित्य नैमित्तिक कर्मांच्या योगानें आत्मज्ञानानें द्वैतभ्रमात्मक मायाजाळ निवृत्त झालें म्हणजे मी ब्रह्मस्वरूपच आहे, अशा भावनेनें स्वस्थांतःकरणानें ध्यान, आवाहनादिविहितउपचारांनीं संध्यारूप ब्रह्माचें अनुष्ठान करावें. असेंच वेदादितत्ववेत्ते म्हणतात. ९.

**तैत्तिरीयारण्यके—उद्यंतमस्तंयतमादित्यमभिध्यायन्कुर्वन्ब्राह्मणो विद्वान्सकलं भद्रमश्नुतेऽसावादित्यो ब्रह्मेति ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति य एवं वेदेति ॥१०॥ दक्षः – रात्र्यंतयामनाडी द्वे संध्याकालोऽयमुच्यते । दर्शनाद्रविरेखायास्तदंतो मुनिभिः स्मृत इति ॥ ११ ॥ देवीभागवते—-उत्तमा तारकोपेता मध्यमा लुप्ततारका । अधमा सूर्यसहिता प्रातःसंध्या त्रिधा स्मृतेति ॥१२॥ व्यासः—गृहे त्वेकगुणा संध्या गोष्ठे दशगुणा स्मृता । शतसाहस्रिका नद्यामनंता विष्णुसन्निधाविति ॥१३॥ व्यासः—कौशेयं कंबलं चैव अजिनं पट्टमेव च । दारुजं तालपत्रं वा आसनं परिकल्पयेदिति ॥ १४ ॥**

**तैत्तिरीयारण्यकांत** ( सहवै उपनिषदांत )—सूर्य हा यथोक्त नामरूपयुक्त संध्या शब्दवाच्य ब्रह्म आहे म्हणून तो उदय व अस्त पावत असतां त्याचें ध्यान करीत ( पुढें सांगावयाचें ) प्राणायामादि अनुष्ठान करणारा विद्वान ब्राह्मण ऐहलौकिक आणि पारलौकिक सर्व कल्याणास प्राप्त होईल, प्राणायामादि ध्यानानें अंतःकरणशुद्धिद्वारा ब्रह्मसाक्षात्कारानें, पूर्वीं ब्रह्मस्वरूप असतां वास्तविक स्वरूपाच्या अज्ञानानें जीवस्वदशा प्राप्त झाली असें जाणील तो ब्रह्मस्वरूपीं लीन होईल. १०. **दक्ष**—रात्रीच्या शेवटच्या प्रहराच्या दोन घटकांपासून ( दोन घटका रात्र असतां ) सूर्यबिंब दिसेपर्यंत प्रातःसंध्येचा मुख्य काल होय. ११. **देवी भागवतांत**—पहाटेस नक्षत्रें चांगलीं दिसत असतां संध्योपासनेचा आरंभ करणें हा उत्तमकाळ, नक्षत्रें अदृश्य होत असतां आरंभ करणें हा मध्यम काळ आणि सूर्योदयानंतर आरंभ करणें हा कनिष्ठकाळ होय. १२. **व्यास**—घरीं संध्या केली तर एकपट, गायीच्या गोठ्यांत दसपट, नदीवर लक्षपट व विष्णुमूर्तीच्या जवळ संध्या केली तर अनंत फळ मिळतें. १३. **व्यास**—रेशमाचें वस्त्र, कांबळें, हरणाचें किंवा वाघाचें चामडें,

वृक्षाचें वल्कल, तृणादि निर्मित वस्त्र, लाकडाचें ( पाट ) अथवा ताडाच्या पानाचें केलेलें ह्यांपैकीं कोणतें एखादें आसन संध्यादिकर्मांत घ्यावें. १४.

**ब्रह्मा—धाराच्युतेन तोयेन संध्योपास्ति र्विगर्हिता । नद्यां तीर्थे ह्रदेवापि भाजने मृन्मये गृहे। औदुंबरे च सौवर्णे राजते दारु संभवे । कृत्वा तु वामहस्ते वा संध्योपास्तिं समाचरेदिति ॥ १५ ॥ मरीचिः—गोकर्णाकृतिवत्पात्रं ताम्रं रौप्यं च हाटकम् । जलं तत्र विनिक्षिप्य संध्योपासनमाचरेदिति ॥१६॥ गृह्यपरिशिष्टे—अथ पुनर्द्विराचम्य दर्भपवित्रपाणिः प्रथममंत्रकं पंचदशमात्रिकं प्राणायामत्रयं कृत्वा समंत्रकं सकृत्कुर्यादिति ॥ १७ ॥**

**ब्रह्मा**—धारेपासून पडत असलेल्या पाण्यानें संध्या करूं नये घर, अथवा गंगादि नदीतीर, पुष्करादि तीर्थं किंवा साधारण जलाशय ह्यांचे ठिकाणीं उजव्या हातानें पाणी घेऊन त्यांतील उदक खालीं गळत असतां संध्यांग आचमनादि करणें निंदित होय म्हणून प्रथमतः तांबें, सोनें, रुपें अशा धातूंच्या पात्रांत, लाकडाच्या पात्रांत अथवा मातीच्या पात्रांत किंवा हीं पात्रें नसतील तर डाव्या हातांत उदक घेऊन तें उजव्या हातावर घालावें आणि त्यांतील धार न गळतां आचमनादि करावें. १५. " संध्यादि करावयाचें जल अल्प ( भांड्यांत घेतलेलें ) असल्यास त्याच भांड्यानें तें उजव्या हातावर घेऊन एकवार आचमन केलें असतां अवशिष्ट जल दुसऱ्या आचमनादिकाच्या उपयोगीं पडत नाहीं. ह्यासाठीं मोठ्या भांड्यांतील पाणी अर्घ्या, पळी अशा प्रकारच्या कारणा पुरतेंच जल माईल अशा लहान पात्रांत घेऊन त्यानें यथाविधि आचमनादिक करावें असें सांगतो ". **मरीचि**—गाईच्या कानाच्या आकाराप्रमाणें बनविलेल्या सोन्याच्या, रुप्याच्या अथवा तांब्याच्या पात्रांत ( गोकर्णांत=अर्घ्यांत ) उदक घेऊन त्यानें यथाविधि संध्यादिकर्म करावें. १६. **गृह्यपरिशिष्टांत**—स्नानविधि, तिलकविधि झाल्यानंतर दर्भांचीं पवित्रकें हातांत घालून पुनः संध्येसाठीं दोनदां आचमन करून, पहिल्यानें मंत्रावाचून डाव्या नाकपुडीनें वायूचें आकर्षण करून पंधरा ऱ्हस्वाक्षरांच्या उच्चारास जितका काळ लागेल तोंपर्यंत त्यांचा निरोध करून उजव्या नाकपुडीनें सोडावा. ह्याप्रमाणें तिनदां अमंत्रक प्राणायाम करून एकदां समंत्रक प्राणायाम करावा, प्राणवायूचें नियमन करणें

( वायु कोंडणें ) हाच अमंत्रक प्राणायामशद्बाचा अर्थ होय. स्नानादि शीतल उपचारांनीं नासिकेंद्रिय अवरुद्ध असतें म्हणून समंत्रक प्राणायामांत व्यत्यास होईल यासाठीं अभ्यासाकरितां प्रथम तिनदां अमंत्रक प्राणायामाचा विधि आहे. १७.

शौनकः—पंचांगुलीभिर्नासाग्रं पीडयेत्प्रणवेन तु । सव्येन तु समाकृष्य दक्षिणेन विसर्जयेत् । प्रणवै र्व्याहृतीः सप्त गायत्रीं शिरसा सह । त्रिः पठेदायतप्राणः प्राणायामः स उच्यत इति ॥ १८ ॥ देवीभागवते—रेचकः पूरकश्चैव प्राणायामोऽथ कुंभकः । प्रोच्यते सर्वशास्त्रेषु योगिभिर्यतमानसैः ॥ १९ ॥ रेचकः सृजते वायुं पूरकः पूरयेत्तु तम् । साम्येन संस्थितिर्यत्तत्कुंभकः परिकीर्तितः ॥ २० ॥ नीलोत्पलदलश्यामं नाभिमध्ये प्रतिष्ठितं । चतुर्भुजं महात्मानं पूरके चिंतयेद्धरिम् ॥ २१ ॥ कुंभके तु हृदि स्थाने ध्यायेत्तु कमलासनम् । प्रजापतिं जगन्नाथं चतुर्वक्त्रं पितामहं ॥ २२ ॥

शौनक—प्रणवमंत्राचें उच्चारण करून पांच अंगुलींनीं नासिका धरावी आणि डाव्या नाकपुडीनें बाहेरच्या वायूचें मंदगतीनें आकर्षण करून तो हृदयांत निरुद्ध असतां प्रतिप्रणवपूर्वक सात व्याहृति, प्रणवपूर्वक गायत्री व गायत्रीचें ओमापोज्योति इत्यादि षोडशाक्षरी शिर ह्या मंत्रांचा तिनदां मनोमय जप करावा. नंतर आकर्षण करून निरुद्ध असलेला वायु उजव्या नाकपुडीनें सावकाश सोडावा ह्या कर्मास प्राणायाम असें म्हणतात. १८. देवीभागवतांत—समाधि करून इंद्रियांचा निग्रह करणाऱ्या शौनकादि ऋषींनीं इंद्रियनिग्रहाच्या सर्व साधनांमध्यें पूरक, कुंभक आणि रेचक एतत्त्रयात्मक समंत्रक प्राणायाम हेंच मुख्य साधन म्हटलें आहे, कारण प्रणवव्याहृतिप्रभृतिमहामंत्रवाक्यार्थध्यानद्वारा सांसारिक विषयांपासून मनाचें संयमन करणें हा योगरूढ प्राणायामशद्बार्थाचा आत्मा होय. १९. प्राणायामामध्यें, वायूच्या आकर्षण कर्मास पूरक; वायूच्या आकर्षणविसर्जनशून्य अचेतन पदार्थासारखें निश्चल निरोधन कर्मास कुंभक आणि वायूच्या विसर्जन कर्मास रेचक असें म्हणतात. २०. रेचककर्म करीत असतां नीलकमलदलासारखा श्यामवर्ण चतुर्भुज श्रेष्ठ हरि आपल्या नाभींत ( बेंबींत ) राहिला आहे असें चिंतन करावें. २१. कुंभक कर्माच्या आरंभीं कमलासन जगत्पति चतुर्मुख सृष्टिनिर्माण करणारा ब्रम्हदेव हृदयांत आहे असें चिंतन करावें. २२.

रेचके शंकरं ध्याये ल्ललाटस्थं महेश्वरम् । शुद्धस्फटिक संकाशं निर्मलं पापनाशनम् ॥ २३ ॥ पूरके विष्णुसायुज्यं कुंभके ब्रह्मणोगतिं । रेचकेन तृतीयं तु प्राप्नुयादीश्वरं परमिति ॥ २४ ॥ शौनकः--प्राणानायम्य विधिवद्वाग्यतः संयतेंद्रियः । अथ संध्यामुपासिष्य इति संकल्प्य मार्जयेत् ॥ २५ ॥ तिसृभिर्मार्जनं कुर्यादापोहीति कुशोदकैः । प्रतिपादं क्षिपेन्मूर्ध्नि प्रतिप्रणवसंयुतम् ॥ २६ ॥ अथाचमनमादाय सूर्यश्चेति पिबेदपः । अथ मध्यंदिने त्वापः पुनंत्विति च मंत्रत इति ॥ २७ ॥ गृह्यपरिशिष्टे—अथ पुनराचम्य मार्जयेदिति ॥ २८ ॥ शौनकः—प्रणवेन व्याहृतिभिर्गायत्र्या प्रणवाद्यया । आपोहिष्ठेतिसूक्तेन मार्जनं हि चतुर्थकमिति ॥ २९ ॥ प्रजापतिः—ऋगंते मार्जनं कुर्यात्पादांते वा समाहितः । अर्धर्चांतेऽथवा कुर्याच्छिष्टानां मतमीदृशमिति ॥ ३० ॥

रेचककर्म करीत असतां कल्याण करणारा शुद्धस्फटिकासारखा निर्मल पापाचा नाश करणारा महेश्वर ललाटांत राहिला आहे असें चिंतन करावें. २३. यथाविधि पूरक, कुंभक व रेचक केले असतां क्रमानें विष्णुसायुज्य, ब्रम्हलोकप्राप्ति आणि परमेश्वरप्राप्ति होते. २४. पूर्वोक्त विधीनें प्राणायाम करून हस्तपादादिकांचें चलनवलन न करितां विशेषेंकरून मौनव्रती होऊन संध्येची उपासना करतों, अशा अर्थाचा संस्कृत वाणीनें संकल्प करून पुढें सांगावयाच्या विधीनें मार्जन करावें. २५. आपोहिष्ठा इत्यादि तीन ऋचेंच्या प्रणवयुक्त प्रत्येक पादाचें उच्चारण करून मस्तकावर दर्भमिश्रित उदक सिंचन करीत मार्जन करावें. २६. आचमनाकरितां उदक घेऊन सूर्यश्च इत्यादि मंत्र म्हणून प्राशन करावें, असेंच मध्यान्ह संध्येमध्ये आपः पुनं तु इत्यादि मंत्रानें प्राशन करावें. २७ **गृह्यपरिशिष्टांत**—आपोहिष्ठा० ह्या तीन ऋचांनीं मार्जन केल्यानंतर पुनः आचमन करून मार्जन करावें. २८. **शौनक**—प्रणवपूर्वक समस्त व्याहृतींनीं दुसरें, प्रणवपूर्वक गायत्रीनें तिसरें आणि आपोहिष्ठा ह्या सूक्तानें चवथें मार्जन करावें. २९. **प्रजापति**—स्वस्थांतःकरण होऊन आपोहिष्ठा ह्या सूक्ताची, प्रत्येक ऋचा, ऋचांचा प्रत्येक चरण, किंवा ऋचांचें प्रत्येक अर्ध म्हणून मार्जनार्थ मस्तकावर उदक सिंचन करावें असें मन्वादि शिष्टांचें मत आहे. ३०.

गृह्यपरिशिष्टे—गायत्रीशिरसा चांभसात्मानं परिषिंचे देतन्मार्जनमिति ॥ ३१ ॥ शौनकः--उध्दृत्य दक्षिणे हस्ते जलं गोकर्णवत्कृते। निश्वास्य नासिकाग्रे तु पाप्मानं पुरुषं स्मरेदिति ॥ ३२ ॥ प्रयोगपारिजाते--ब्रह्महत्याशिरस्कं च स्वर्णस्तेयभुजद्वयम्। सुरापानहृदायुक्तं गुरुतल्पकटिद्वयम्। तत्संसर्गपदद्वंद्व मंगप्रत्यंगपातकम्। उपपातकरोमाणं रक्तश्मश्रुविलोचनम्। खड्गचर्मधरं कृष्णं वामकुक्षौ विचिंतयेदिति ॥३३॥ शौनकः--ऋतं चेति तृचं वापि द्रुपदां वा जपेदृचम्। दक्षनासापुटेनैव पाप्मानमपसारयेत् ॥ ३४ ॥ तज्जलं नावलोक्याथ वामभागे क्षितौ क्षिपेदिति ॥ ३५ ॥ गृह्यपरिशिष्टे—तं पाप्मानं वज्रहतं सहस्रधा दलितं भावयेदेष पापव्यपोहः ॥ ३६ ॥

**गृह्यपरिशिष्टांत**—ओमापो० इत्यादि षोडशाक्षरी गायत्रीशिरोमंत्रानें आपल्या सभोंवतीं उदक सिंचन करावें हें पांचव्या प्रकारचें मार्जन होय. ३१. **शौनक**—गाईच्या कानाच्या आकृतीप्रमाणें केलेल्या उजव्या हातावर उदक घेऊन नाकाजवळ न्यावें आणि त्याचें अवघ्राण करून पापपुरुषाचें स्मरण करावें. ३२. तें असें—**प्रयोगपारिजातांत**--ब्रह्महत्त्याजन्य पाप हें मस्तक, सुवर्णाची चोरी हे दोन बाहु, ब्राह्मणकृत मद्यपान हें हृदय, मातृगमन हें कटिभाग, ब्रह्महत्त्यादि–चतुर्विध-पापी पुरुषाचा आसन भोजनादिकांनीं व्यवहार ठेवणें हें पाप दोन पाय, सामान्यतः हिंसा चौर्य अभक्ष्यभक्षणादि हीं इतर उदरादि सर्व अंगें आणि गोवधादि उपपातक हे रोम असा अवयवघटित समुदाय हाच पापपुरुष, आणि ज्याचें मुख, केश व डोळे आरक्त आहेत, ढाल तरवार धारण करणारा आणि कृष्णवर्ण असा पापपुरुष डाव्या कुशीमध्यें आहे अशी कल्पना करावी. ३३. **शौनक**—नंतर 'ऋतं च सत्यं' ह्या तीन ऋचांचा अथवा 'द्रुपदादिवमुमुचानः' ह्या ऋचेचा जप करावा आणि नाकाच्या उजव्या नाकपुडीनें उच्छ्वास रूपानें तो पापपुरुष उजव्या हातावरील उदकावर काढावा. ३४. आणि तें उदक अवलोकन केल्यावाचून डाव्या बाजूकडे जमिनीवर टाकावें. ३५ **गृह्यपरिशिष्टांत**—तो पापपुरुष ह्या उदकरूपी वज्रानें हत होऊन हजारों त्याचे तुकडे झाले अशी भावना करावी. ह्या कर्मास पापदूरीकरण असें म्हणतात. ३६.

अथाचम्य दर्भपाणिः पूर्णमुदकांजलिमुध्दृत्यादित्याभिमुखः स्थित्वा प्रणवव्याहृतिपूर्वया सावित्र्या त्रिर्निवेदयेदुत्क्षिपेत्तदेवार्घ्यनिवेदनमिति ॥ ३७॥ देवीभागवते—उत्थाय तु ततः पादौ द्वौ समौ सन्निवेशयेत् । जलांजलिं गृहीत्वा तु तर्जन्यंगुष्ठवर्जितमिति ॥ ३८ ॥ संग्रहे—जलेष्वर्घ्यं प्रदातव्यं जलाभावे शुचिस्थले। संप्रोक्ष्य वारिणा सम्यक् ततोऽर्घ्यं तु प्रदापयेदिति ॥ ३९ ॥ आश्वलायनः—ततस्तिष्ठन् जलं गृह्य प्राङ्मुखोंऽजलिना स्मरेत् । स्थानादौ सुस्थितं तेजः स्फटिकज्योतिषा समम् । उत्तीर्य तच्च संप्राप्तं दक्षिणेन यथांजलिम् । व्याहृत्यादि जपेन्मंत्रं स्मृत्वैवं परितोरवेः । मंदेहान्युध्यतः क्रूरान्निक्षिपेत्तेष्वथांजलिम् । षोडशाक्षरमंत्रेण पुनराकृष्य सत्वरः । पूर्ववद्वाममार्गेण स्थानादौ स्थापयेत्स्मरन् । तेजोसीति जपेन्मंत्रं मूर्ध्नि बद्धांजलिः स्थितः । एवं त्रिवारमावृत्य दग्धान् तानसुरान्द्विजः । प्रदक्षिणं समावर्त्य जलं गृह्याचमेत्तेत इति ॥ ४० ॥

नंतर आचमन करून पुन्हा पवित्रक धारण करून उदकानें पूर्ण भरलेला अंजलि उचलून सूर्यासमोर तोंड करून प्रणव, तीन व्याहृति आणि गायत्री ह्या मंत्रांचा प्रत्येक अंजलीस एकवार जप करून सूर्याकरितां सन्मानपूर्वक समर्पण करावयास त्यांतील उदक वर उडवावें असें तीन अंजलींचें समर्पण करावें. ह्यास अर्घ्यनिवेदन असें म्हणतात. ३७. " अर्घ्य देण्यास उभें रहाण्याचा व अंजलि करण्याचा विशेष प्रकार सांगतो ". देवीभागवतांत—अघमर्षणानंतर आचमन केल्यावर अर्घ्य देण्यासाठीं उभें राहून दोन पाय सारखे जुळावे आणि दोन हातांच्या तर्जनी ( अंगठ्या जवळचें बोट ) व अंगठे वर्ज्य करून केलेला अंजलि उदकानें भरून पूर्वोक्त विधीनें अर्घ्यनिवेदन करावें. ३८. **संग्रहांत**—अर्घ्याचें उदक नदी वगैरेंच्या पाण्यांत पडेल असें उडवावें. तसें उदक नसेल तर पवित्र स्थळ पाण्यानें प्रोक्षण करून त्यावर अर्घ्य द्यावें. ३९ " अर्घ्यविधीचा आणखी विशेष सांगतो ". **आश्वलायन**—अघमर्षणानंतर आचमन झाल्यानंतर पूर्वेकडे तोंड करून उभें राहून ओंजळींत अर्घ्योदक घेऊन मस्तकामध्यें सहस्रदलचक्रांत स्फटिक ज्योतीसारखें स्वच्छ तेज आहे असें चिंतन

करावें, आणि नाकाच्या उजव्या नाकपुडीनें रज्जुसारखें अविच्छिन्न तें (तेज) अंजलीवर काढलें आहे अशी भावना करून प्रणव, तीन व्याहृति व गायत्री ह्या मंत्रसमुदायाचा एकवार जप करावा. नंतर सूर्या सभोंवतीं क्रूर मंदेह नावाचे असुर युद्ध करतात असें कल्पून त्यांच्या नाशाकरितां त्यांवर तें अंजलिस्थ सतेज अर्घ्योदक टाकावें. आणखी लागलेंच अर्घ्योदका बराबर टाकलेलें तें तेज पुढील श्लोकांत सांगावयाच्या षोडशाक्षरी मंत्रानें आकर्षण करून (नाकाच्या) डाव्या नाकपुडीनें मस्तकस्थ सहस्रदलचक्रांत पहिल्या सारखें पुन्हा स्थापित केलें असें चिंतन करून मस्तकावर नमस्कार करतांना जसे हात जोडण्यांत येतात त्याप्रमाणें जोडून उभ्यानेंच 'तेजो' ह्या मंत्राचा एकवार जप करावा. ह्याप्रमाणें तीन वेळ अर्घ्य निवेदन करून ते मंदेहासुर त्या तेजानें जळून गेले अशी भावना करावी. नंतर उदक सिंचन करीत प्रदक्षिणेप्रमाणें (आपल्या भोंवतीं) फिरून आचमन करावें. ४०.

व्यासः--षोडशाक्षरकं ब्रह्म गायत्र्यास्तु शिरःस्मृतम् ।
ओमापोज्योतिरित्येवं मंत्रोवै तैत्तिरीयक इति ॥ ४१ ॥
गृह्यपरिशिष्टे--असावादित्यो ब्रह्मेति प्रदक्षिणं परिक्रामन्परिषिच्याप उपस्पृश्य शुचौ देशे दर्भाभसोक्षिते दर्भानास्तीर्य व्याहृतिभिरुपविश्य प्राणायामत्रयं कृत्वात्मानं व्याहृतिभिरभ्युक्ष्य सावित्र्या ऋषिदैवतच्छंदास्यनुस्मृत्य षड्भिस्तदंग मंत्रै-

"सोळा अक्षरी मंत्रानें तेज आकर्षण करावें असें सांगितलें. तो मंत्र सांगतो". **व्यास**—आमापो ज्योतीरसो इत्यादि सोळा अक्षरांचा तैत्तिरीय नारायणोपनिषदांत ब्रह्मप्रतिपादकमंत्र पठित आहे, ह्यास गायत्रीचें शिर असें म्हणतात. ४१. **गृह्यपरिशिष्टांत** असा वादित्यो ब्रह्म ह्या मंत्रानें उजवें (आपल्या भोंवतीं फिरत उदकसिंचन करून आचमन करावें, आणि दर्भोदकानें प्रोक्षित केलेल्या शुद्ध भूमीवर दर्भ पसरून प्रणवपूर्वक समस्त व्याहृतिमंत्रानें त्यावर बसून तीन प्राणायाम करून सप्रणव समस्त-व्याहृतिमंत्रानें आपल्या शरीरावर प्रोक्षण करून गायत्रीमंत्राच्या ऋषीचें, देवतेचें व छंदाचें उच्चारण करून गायत्रीमंत्राच्या 'तत्सवितुः' इत्यादि सहा अवयवांच्या पृथक् पृथक् उच्चारणानें शरीराच्या संरक्षणाकरितां गायत्रीमंत्रावयव हे आपलेच (स्वतांचें) अवयव आहेत अशा बुद्धीनें त्यांचें स्थापन करून आपण गायत्रीरूपच

यथांगमात्मनि न्यस्यात्मानं तद्रूपं भावयेद्यथा। तत्सवितु र्हृद-
याय नम इति हृदये। वरेण्यं शिरसेस्वाहेति शिरसि। भर्गोदे-
वस्य शिखायै वषडिति शिखायाम्। धीमहि कवचाय हुमिति
शिरसि। धियो योन इति नेत्रत्रयाय वौषडिति नेत्रललाटेषु
विन्यस्याथ प्रचोदयादित्यस्त्राय फडिति करतलैरस्त्रं प्राच्यादि
दिक्षुन्यसेदेषोऽगन्यासः। अथ मंत्रदेवतां ध्यात्वागच्छ वरदे
देवीत्यावाह्य तिष्ठन्नर्धनक्षत्रेष्वामंडलदर्शनान्मंत्रार्थ मनुसंद-
धानः सप्रणवव्याहृतिपूर्विकां सावित्रीं जपेदिति ॥ ४२ ॥
मनुः—अकारं चाप्युकारं च मकारं च प्रजापतिः। वेदत्रया-
न्निरदुहद्भूर्भुवः स्वरितीति च ॥ ४३ ॥

आहों अशी भावना करावी. सामान्य परिभाषेनें ऋष्यादिकांचें उच्चारण प्राप्त असतां जपाविषयीं ब्राह्मणास अतिशयित आवश्यकताप्रदर्शनार्थ अथवा क्षत्रिय वैश्यांनीं अवश्य उच्चारण केलें पाहिजे, यासाठीं येथें ऋष्यादिकांचा पुन्हा विधि आहे. मंत्राव-यवाच्या व स्वकीयावयवाच्या अभेदविवक्षेनें 'यथांगं' ह्या कर्माचा समवायात्मक योग असतां 'आत्मनि' येथें शरीरवाचक आत्मन् शद्बाहून 'निमित्तात्कर्मयोगे' ह्या सूत्रानें चतुर्थी विभक्ति आहे. (यथा) अंगन्यासाचा प्रकार सांगतो. 'तत्सवि-तुर्हृदयाय नमः' ह्या मंत्रानें हृदयावर 'वरेण्यं शिरसे स्वाहा' ह्यानें मस्तकावर 'भर्गोदेवस्य शिखायै वषट्' ह्यानें शिखेवर 'धीमहि कवचाय हुं' ह्यानें उरावर आणि 'धियोयोनः नेत्रत्रयाय वौषट्' ह्यानें दोन्ही डोळ्यांवर व ललाटावर हस्तस्पर्शानें अंगन्यास करून 'प्रचोदयात् अस्त्रायफट्' ह्या मंत्रानें पूर्वादिदिशांमध्यें हस्ततलांनीं (हस्ततलें सर्व दिशांकडे दाखवून) अस्त्र स्थापन करावें. ह्यास अंगन्यास असें म्हणतात. नंतर गायत्रीमंत्रवाच्यदेवतेचें बालांबालादित्य इत्यादि मंत्रानें ध्यान करून, आगच्छ वरदे देवि इत्यादि मंत्रानें आवाहन करून, कांहीं नक्षत्रें दिसत आहेत तेव्हांपासून सूर्यमंडल दिसेपर्यंत उभ्यानें जपमंत्राच्या अर्थाकडे लक्ष ठेवून प्रणव, समस्तव्याहृति व गायत्री ह्या मंत्र समुदायाचा जप करावा. ४२. मनु—अकार, उकार व म-कार (म्) हे प्रणवमंत्राचे तीन अवयव आणि भूः, भुवः व स्वः हे तीन व्याहृतिमंत्र. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ह्या प्रत्येक वेदापासून ब्रह्मदेवानें सारभूत काढले. ४३.

त्रिभ्य एव तु वेदेभ्यः पादं पादमदूदुहत् । तदित्यृचोस्याः सावित्र्याः परमेष्ठी प्रजापतिः ॥ ४४ ॥ एतदक्षरमेतां च जपन् व्याहृतिपूर्विकां । संध्ययोर्वेदविद्विप्रो वेदपुण्येन युज्यते ॥ ४५ ॥ ऋषयोदीर्घसंध्यत्वाद्दीर्घमायुरवाप्नुयुः । प्रज्ञां यशश्च कीर्तिं च ब्रह्मवर्चसमेव चेति ॥ ४६ ॥ पारिजाते—प्रातर्नाभौ करौ धृत्वा मध्यान्हे हृदि संस्थितौ । सायं जपंस्तु नासाग्रे त्रिसंध्यजपलक्षणमिति ॥ ४७ ॥ याज्ञवल्क्य—ध्यायेत्तु मनसा मंत्रं जिह्वौष्ठौ न विचालयेत् । न कंपयेच्छिरोग्रीवां दंतान्नैव प्रकाशयेत् ॥ ४८ ॥ देवीभागवते—भिन्नपादा तु गायत्री ब्रह्महत्याप्रणाशिनीति ॥ ४९ ॥ भगवान्—सायं प्रातश्च मध्यान्हे सावित्रीं वाग्यतो जपेत् । सहस्रपरमां देवीं शतमध्यां दशावराम् ॥ ५० ॥

ब्रह्म जाणणाऱ्या ब्रह्मदेवानें तीन वेदांपासून गायत्रीऋचेचा एकेक चरण काढला. ४४. प्रणव व व्याहृति यांनीं युक्त गायत्रीमंत्र हा वेदांचें सारभूत तत्व आहे असें जाणणारा ब्राह्मण संध्यांचें अनुष्ठान करीत असतां ओंकार, समस्त व्याहृति आणि गायत्री ह्या मंत्र समुदायाचा जप करील तो वेदजपाच्या उत्तमलोकादिफलास प्राप्त होईल. ४५. संध्यांतील गायत्रीमंत्रजपाच्या अतिशयित अनुष्ठानानें ऋषीस चिरकाल आयुष्य, उत्तम बुद्धि, यश ( समक्ष प्रशंसा ), कीर्ति ( परोक्ष प्रशंसा ) आणि वेदांचें जपादिअनुष्ठानजन्यतेज प्राप्त झालें. ४६. पारिजातांत—प्रातःसंध्येंतील, माध्यान्हसंध्येंतील व सायान्हसंध्येंतील क्रमानें नाभीजवळ, हृदयाजवळ आणि नाकाच्या अग्राजवळ दोन्ही हात धरून गायत्रीमंत्राचा मुख्य जप करावा. ही त्रिकालसंध्याचा जपाची मुद्रा होय. ४७. याज्ञवल्क्य-जीभ व ओठ न हालवितां, मस्तकासह कंठ न कांपवितां, आणि ओठाबाहेर दांत न दाखवितां अर्थासहित गायत्रीमंत्राचें अंतःकरणानेंच चिंतन करावें, हा त्याचा मुख्य प्रकार आहे. ४८. देवीभागवतांत—गायत्रीमंत्राच्या प्रत्येक चरणाच्या शेवटीं विराम करून जप केला असतां महापापाचा नाश होतो. ४९. भगवान्—प्रातःकाळीं, मध्यान्हकाळीं व संध्याकाळीं सर्व विषयांपासून वाक्प्रभृति इंद्रियांचा निग्रह करून संध्येंतील गायत्रीजप करावा. तो जप एक हजार करावा, हा उत्तमपक्ष, शंभर करणें हा मध्यमपक्ष आणि समय विशेषीं दहा वेळां करणें हा कनिष्ठपक्ष होय. ५०.

मनः संतोषणं शौचं मौनं मंत्रार्थचिंतनम् । अव्यग्रत्वमनिर्वेदो जपसंपत्तिहेतव इति ॥ ५१ ॥ गृह्यपरिशिष्टे—जपं चाक्षसूत्रेणांगुलिपर्वभिर्वा गणयेदिति ॥ ५२ ॥ प्रजापतिः—अष्टोत्तरशतां कुर्याच्चतुःपंचाशिकां तथा । सप्तविंशतिकां वापि ततोनैवाधिका वरा । रक्तवर्णैरमिश्रैश्च कीटरंध्रविवर्जितैः । अक्षसूत्रं प्रकर्तव्यं गोपुच्छवलयाकृति । वक्त्रं वक्त्रेण संयोज्य पुच्छं पुच्छेन योजयेत् । मेरुरूर्ध्वमुखःकार्यः प्रत्येकं नागपाशकमिति ॥ ५३ ॥ नृसिंहपरिचर्यायां—अनामा मध्यमाक्रम्य जपं कुर्याच्च मानसम् । एकैकं मणिमंगुष्ठेनाकर्षन्प्रजपेन्मनुम् । मेरौ तु लंघिते देवि न मंत्रफलभाग्भवेदिति ॥ ५४ ॥

“ जपाच्या वेळीं अवश्य करावयाचे विशेष नियम सांगतो ”. मनाचें समाधान, स्वच्छता, दुसऱ्या विषयांपासून इंद्रियांचा निग्रह, मंत्राच्या वास्तविक अर्थाचें चिंतन, अव्याकुलता ( शरीरास पीडा नसणें ) आणि अनिर्वेद ( अनौदासिन्य ) म्ह० जपाविषयीं श्रद्धा व भक्ति असणें हे सहा प्रकार जपाच्या यथार्थ अनुष्ठानास कारणभूत आहेत. ५१. **गृह्यपरिशिष्टां**त–जप्यमंत्राच्या आवृत्तींची रुद्राक्षांच्या माळेनें किंवा बोटांच्या पर्वांनीं गणना करावी. ५२. **प्रजापति**—एकशें आठ, चोपन अथवा सत्तावीस रुद्राक्षांची माळ करावी. ह्यापेक्षां कमीज्यास्ती रुद्राक्षांची माळ केली असतां ती जपाविषयीं योग्य नाहीं. किड्यानें न पोखरलेले आरक्तवर्ण व एकसारखे असे रुद्राक्ष देंठास देंठ व बुडख्यास बुडखा लागेल अशा क्रमव्युत्क्रमानें रेशमांत ओंवून एकमेकांचें घर्षण होऊं नये यासाठीं प्रत्येक रुद्राक्षास एकेक गाठ द्यावी. नंतर दोन्ही टोंकें एकत्र करून त्यांत एक मोठा रुद्राक्ष ( मेरु ) वर देंठ होईल असा ओवून पुन्हा गांठ द्यावी. ही गोपुच्छ कुंडलाकार रुद्राक्षमाळा जपास योग्य होय. ५३. **नृसिंहपरिचर्या नांवाच्या ग्रंथांत**—अनामिका ( करंगळी जवळचें बोट ), मधलें बोट आणि अंगठा ह्या तीन बोटांनीं माळेचा एकेक मणि ओढीत प्रत्येक जपमंत्राचा मनोमय (मनांत) पाठ करावा. मण्यांची मेरुपर्यंत सीमा झाली तर पुन्हा व्युत्क्रमानें ( उलट ) मणि ओढण्यास आरंभ करावा. कारण मेरूचें उल्लंघन केलें तर मंत्रापासून मिळणारें फल प्राप्त होत नाहीं. ५४.

ब्रह्मयामले--आरभ्यानामिकामध्यं पर्वाण्युक्तान्यनुक्रमात्। तर्जनीमूलपर्यंतं जपेद्दशसु पर्वसु। मध्यमांगुलिमूले तु यत्पर्वद्वितयं भवेत्। तं वै मेरुं विजानीयाज्जपे तं नातिलंघयेदिति॥ ५५॥ वृद्धमनु--वस्त्रेणाच्छादितं करं दक्षिणं यः सदा जपेत्। तस्य स्यात्सफलं जाप्यं तद्धीनमफलं स्मृतमिति॥ ५६॥ शौनकः--सायं प्रातरुपस्थानं कुर्यान्मंत्रैर्यथाक्रमम्। जातवेदस इत्येका तच्छंयोरावृणीमहे। नमो ब्रह्मण इत्येतैरुपतिष्ठेद्दिशं प्रति। प्रातःसूर्यमुपस्थाय मित्रस्यचर्षणी धृत इति॥५७॥ गृह्यपरिशिष्टे--प्रदक्षिणं दिशः साधिपा नत्वा संध्यायै गायत्र्यै- सावित्र्यै सरस्वत्यै सर्वाभ्यो देवताभ्यश्च नमस्कृत्य तत उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखमिति संध्यां विसृज्य भद्रं नो अपि वातयमन

ब्रह्मयामलांत-अंगुलि-संकोचन-संधीस ( बोटाचा संकोच केला असतां जो सांधा दिसतो त्यास ) पर्व ( पेरें ) असें म्हणतात. अनामिकेच्या ( करंगळी जवळच्या बोटाच्या ) मधल्या पर्वापासून तर्जनीच्या ( आंगठ्या जवळच्या बोटाच्या ) मूळ पर्वापर्यंत दहा पर्वें होतात तीं अशीं-अनामिकेचें मध्यपर्व १ व मूळपर्व २, कनिष्ठिकेचें ( करंगळीचें ) मूळपर्व ३, मध्यपर्व ४ व अंत्यपर्व ५, अनामिकेचें अंत्यपर्व ६, मध्यमेचें ( मधल्या बोटाचें ) अंत्यपर्व ७ आणि तर्जनीचें ( अंगठ्या जवळच्या बोटाचें ) अंत्यपर्व ८, मध्यपर्व ९ व मूळपर्व १०. ह्या अनुक्रमानें पर्वांनीं जपाची गणना करावी. मध्यमेच्या मूळपर्वास व मध्यपर्वास मेरु असें समजून जपगणनेमध्यें त्याचें उल्लंघन न करतां पर्वांची तर्जनीच्या मूळपर्वापर्यंत सीमा झाली म्हणजे पुन्हा व्युत्क्रमानें गणना करावी. ६५. वृद्धमनु—नेहमीं उजवा हात वस्त्रानें आच्छादित करून जप करावा म्हणजे जपकर्म सफळ होतें आणि तसें न करतां जप केला तर विफळ होतें. ५६. शौनक—संध्याकाळीं व प्रातःकाळीं 'जात वेदसे' तच्छंयो, 'नमो ब्रह्मणे' ह्या मंत्रांनीं क्रमानें उपस्थान करून आणि प्रातःकाळीं 'मित्रस्य' इत्यादि चार ऋचांनीं उपस्थान करून दिशांस नमस्कार करावा ५७. गृह्यपरिशिष्टांत—प्रदक्षिणक्रमानें दिशांस व त्यांच्या स्वामींस आणि संध्यादि सर्व देवतांस नमस्कार करून 'उत्तमे शिखरे' इत्यादि मंत्रानें संध्येचें विसर्जन करून 'भद्रं नो' इत्यादि मंत्र व

इत्युक्त्वा शांतिं त्रिरुच्चार्य प्रदक्षिणं परिक्रामन् आसत्यलोका-त्पातालादालोकालोकपर्वतात् । ये संति ब्राह्मणा देवा-स्तेभ्यो नित्यं नमोनम इति नमस्कृत्य भूमिमुपसंगृह्य गुरून् वृद्धांश्चोपसंगृण्हीयादिति ॥ ५८ ॥ देवीभागवते—स्योना-पृथिवीमंत्रेण भूम्यै कुर्यात्प्रणामकं । यथाविधि च गोत्रादीनु-च्चरेद्द्विज सत्तम इति ॥ ५९ ॥

## इति प्रातःसंध्योपासनविधिः

---

तीनवेळां शांतिशब्दाचा उच्चार करून उजवें फिरत 'आसत्य' इत्यादि मंत्रानें ब्राह्मणांस व देवांस नमस्कार करून, भूमीस नमस्कार करून, मातापितरादि गुरूंस आणि दुसऱ्या स्वजातीय वृद्धांस नमस्कार करावा. ५८. देवीभागवतांत—ज्ञात्या द्विजानें 'स्योना' इत्यादि मंत्रानें भूमीस नमस्कार करून यथाशास्त्र प्रवर गोत्र नामोच्चारपूर्वक गुरूंस नमस्कार करावा. ५९.

याप्रमाणें प्रातःसंध्येचा विधि [ सांगितला ].

---

## अथ प्रातःसंध्या.

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ एवं पुनरा-चम्य ॥ १ ॥ प्रणवस्य ब्रह्मा ऋषिः ॥ अग्निर्देवता ॥ दैवी गायत्रीच्छंदः ॥ सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्र–भृगुभरद्वाज–वसिष्ठगौतमकश्यपांगिरस ऋषयः ॥ प्रजापत्याग्निवाय्वा-

## प्रातःसंध्या ( सकाळची संध्या ).

ॐ श्रीकेशव० आचमन प्रकरणांत ह्याचा अर्थ लिहिला आहे. असें दोनदां आचमन करून. १. प्रणवाचा ब्रह्माऋषि, ब्रह्मस्वरूप अग्निदेवता व गायत्रीछंद. नारायणोपनिषदांत आणि आश्वलायनगृह्यपरिशिष्टांत ह्या ऋषिछंद देवता वर्णिल्या आहेत. सात व्याहृतींचे क्रमानें विश्वामित्रेत्यादि ऋषि, प्रजापत्यादि देव, गायत्र्यादि

दित्यबृहस्पतींद्रविश्वेदेवा देवताः ॥ गायत्र्युष्णिगनुष्टु ब्बृहती-
पंक्तित्रिष्टुप्जगत्यश्छंदांसि ॥ गायत्र्या विश्वामित्र ऋषिः ॥
सविता देवता ॥ गायत्री छंदः । शिरसः प्रजापतिर्ऋषिः ॥
ब्रह्माग्निवाय्वादित्या देवताः ॥ युजुश्छंदः ॥ प्राणायामे
विनियोगः ॥ २ ॥ ओं भूः । ओं भुवः । ओं स्वः । ओंमहः
ओं जनः । ओं तपः । ओं सत्यम् । ओं तत्सवितुर्वरेण्यं भर्गो
देवस्य धीमहि॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ ओमापो ज्योती-
रसोमृतं ब्रह्मभूर्भुवः स्वरोम् ॥ ३ ॥

छंद; हें ऋषिदेवता छंदांचें वर्णन आश्वलायनगृह्यपरिशिष्टांत आहे. गायत्रीमंत्राचा विश्वामित्रऋषि, सवितादेवता, गायत्रीछंद, गायत्री शिरोमंत्राचा प्रजापतिऋषि, ब्रह्मादिदेवता, यजुछंद, ह्या सर्व मंत्रसमुदायाचा प्राणायामाकडे उपयोग. २. ओं म्हणजे भूतभविष्य वर्तमानकालांत बाधित होत नाहीं असें, सत्य, ज्ञानमय, गुरु, लघु स्थूल सूक्ष्म इत्यादि इयत्ता नाहीं असें अनंत व्यापक ब्रह्म होय. भूः म्ह० ज्यांत प्राणी उत्पन्न होतात. भुवः म्ह० जगत्स्थापक. स्वः म्ह० ज्याच्या आश्रयानें सुख प्राप्त होतें. महः म्ह० सर्वापेक्षां पूज्य. जनः म्ह० उत्पादक. तपः म्ह० दीप्तिप्रवर्तक. सत्यं म्ह० सर्वदा अबाधित. भूः इत्यादि सप्त व्याहृति-संज्ञक, पृथिव्यदि ऊर्ध्वोर्ध्वलोकवाचक योगरूढ शद्ब होत आधार, स्थापन, संतोष, श्रेष्ठत्व, उत्पादन, प्रकाशन आणि अविनाशित्व एतदात्मक ब्रह्मशक्तीनें भासमान होणारे भू इत्यादि सातलोक हे ब्रह्मस्वरूपच आहेत अशा विवक्षेनें ह्या प्रत्येक शद्बा-पूर्वी ओंकारोच्चारण आहे. ‘ यः ’ जो ‘ नः ’ आमच्या ‘ धियः ’ धर्मादिविषयक बुद्धींना ‘ प्रचोदयात् ’ प्रेरितो ( प्रयोजित करतो ). ‘ तत्—सवितुः देवस्य ’ त्या सर्व वेद प्रसिद्ध सर्वांतर्यामित्वें करून प्रेरणा करणाऱ्या जगत्स्रष्ट्या परमात्म्याचें ‘ वरेण्यं ’ सर्वांनीं उपासना करण्यास व जाणण्यास योग्य ‘ भर्गः ’ मिथ्या ज्ञान-स्वरूप माया आणि मायाजनित वासनासंस्कारानें यत्किंचित्सुखदुःखाद्युपभोक्तृभौ-तिक देह धारणरूप संसार प्रवृत्ति ह्यांचें नाशन करणाऱ्या स्वयंप्रकाश परमात्म्याचें तेजास ‘ धीमहि ’ जो परमात्मा तोच मी किंवा जो मी तोच परमात्मा अशा अद्वैत भावनेनें ध्यातों ( ध्यान करतों ). दुसरा अर्थः—‘ सवितुः देवस्य ’ सर्वैश्वर्यसंपन्न प्रकाशणाऱ्या सूर्याचें ‘ यः नः धियः प्रचोदयात् ’ जें आमच्या बुद्धींस धर्मादिकर्माकडे प्रेरणा करतें. ‘ तत् ’ त्या सर्व प्रसिद्ध दृश्यमान ‘ वरेण्यं ’ सर्वांनीं सेवा करण्यास योग्य ‘ भर्गः ’ पापाचें दहन करणाऱ्या तेजोमंडळास ‘ धीमहि ’ ध्यानानें अंतःकर-

णांत धारण करतों. तिसरा अर्थ—जो सवितादेव आमच्या बुद्धींस अनुष्ठानाविषयीं प्रेरणा करतो त्याच्या प्रसादानें ' वरेण्यं भर्गः ' उत्तम अन्नास ( सेवनीय अन्नादि फलास ) ' धीमहि ' धारण करूं ( प्राप्त होऊं ) ह्यांतील प्रथम अर्थांत ओंकारवाच्य आणि गायत्रीमंत्रवाच्य एकच ब्रह्मपदार्थ आहे म्हणून अद्वैतभावनेनें ध्यानविधि होय. आणि दुसऱ्या व तिसऱ्या अर्थांत तेजोमंडलानें प्रकाशणारा सूर्य भूर्लोकासारखा ब्रह्म-स्वरूप म्हणून त्याविषयीं सेव्यसेवकभावानें ध्यानविधि होय. ह्या उभयार्थ-प्रतिपादनविवक्षेनें प्राणायामाच्या मंत्रसमुदायांत गायत्रीमंत्रापूर्वीं ओंकार पठित केला आहे. ओमापो—' आपः ' समुद्रादिकास प्राप्त होणारें नदी वगैरेचें उदक ' ज्योतिः ' सूर्यादिगत तेज ' रसः ' मधुर, आम्ल, लवण, कडु, तुरट व तिखट या सहा प्रकारचा रस. ' अमृतं ' इंद्रादिदेव जें प्राशन करतात तें अमृत ' भूः भुवः स्वः ' पूर्वीं सांगितलेले एतत्संज्ञक लोक, हें सर्व ' ओं ब्रह्म ' प्रणवप्रतिपाद्य ब्रह्म होय. ' ओं ' ईश्वरप्रसादानें ह्यास मी प्राप्त होईन. नारायणोपनिषदांत ' सुवरोम् ' असा पाठ आहे, परंतु येथें ' स्वरोम् ' असा पाठ घेतला आहे. कारण सु उपसर्ग-पूर्वक ऋ धातूहून ' विच् ' प्रत्ययानें स्वः शब्द निष्पन्न झाला आहे. त्यांत सुअर् ह्यांच्या उवङ् घटित संधीविषयीं यजुर्वेदाची शैली आहे आणि यण्घटितसंधीविषयीं ऋग्वेदाची शैली आहे, आणखी पुढें अर्घ्यनिवेदनप्रकरणांत सांगावयाच्या आश्वला-यनस्मृतींत व व्यासस्मृतींत गायत्रीशिरोमंत्र हा सोळा अक्षरी असा तैत्तिरीयशाखेंत प्रयुक्त आहे असें सांगितलें आहे त्यावरून सुव हें एकच अक्षर आहे असें तैत्तिरी-यांनीं मानिलें पाहिजे आणि आश्वलायनसंहितेंत सर्वत्र स्वः ही व्याहृति एकाक्षरीच प्रणीत आहे म्हणून तच्छाखीयांनीं येथें अंगीकृत केलालाच पाठ ग्राह्य आहे असें सिद्ध होतें. तसेंच प्रयोगपारिजातादिनिबंधकारांनीं असाच लेख लिहिला आहे. स्वः शब्द 'न्यङ् स्वरौ स्वरितौ' ह्या सूत्रानें स्वरित आहे. ओंभूः इत्यादि सात व्याहृति, गायत्री आणि ओमापो इत्यादि शिरोमंत्र हा पृथक् मंत्रत्रयात्मक प्राणायामविधि होय. अथवा गायत्रीशिरोमंत्रांत ' भूर्भुवः स्वः ' हें रूढ समस्त ( सगळ्या ) व्याहृतींचें उच्चारण विशेष अदृष्ट फलासाठीं आहे. ३.

**( इति त्रिः ). ममोपात्त दुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःसंध्यामुपासिष्ये ॥ ४ ॥**

( असा तीनवेळां प्राणायाम करावा. ) ममोपात्त० माझ्या संचित पापाचा क्षय होऊन परमात्म्याची प्रीति व्हावी यासाठीं प्रातःसंध्येचें अनुष्ठान करतों. ४.

आपोहिष्ठेति तृचस्यांबरीषः सिंधुद्वीप आपो गायत्री ॥ मार्जने विनियोगः ॥ ५ ॥ ओमापोहिष्ठा मयोभुवः । ओं तानऽऊर्जे दधातन ॥ ओं महेरणाय चक्षसे ॥ ६ ॥ ओं योवः शिवतमोरसः ॥ ओं तस्य भाजयतेह नः ॥ ओ उशतीरिव मातरः ॥ ७ ॥ ओं तस्मा अरंगमामवः ॥ ओं यस्यक्षयाय जिन्वथ ॥ ओमापो जनयथाचनः ॥ ८ ॥ सूर्यश्चेति मंत्रस्य याज्ञवल्क्युपनिषदऋषिः ॥ सूर्यमन्यु मन्युपतयो देवताः ॥ प्रकृतिश्छंदः ॥ मंत्राचमने विनियोगः ॥ ९ ॥ ओं सूर्यश्च मामन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः ॥ पापेभ्यो रक्षंताम् ॥ यद्रात्र्या पापमकार्षम् ॥ मनसावाचा हस्ताभ्याम् ॥ पभ्द्या- मुदरेण शिस्ना ॥ रात्रिस्तदवलुंपतु ॥ यत्किंचदुरितं मयि ॥ इदमहं माममृतयोनौ ॥ सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ १० ॥

आपोहिष्ठा या तीन ऋचांचा आंबरीष पुत्र सिंधुद्वीप नांवाचा ऋषि, उदक देवता, गायत्री छंद आणि मार्जनाकडे उपयोग. ५. हे उदकदेवा, ज्याअर्थी तूं सुख देणारें आहेस, तें तूं आम्हांस अन्न आणि महत् ( मोठें ) व उत्तम ज्ञान दे. ६. हे उदका, जसें पुत्राच्या पोषणासाठीं माता त्यास उत्तम दुग्ध रस देते, तसें ह्या लोकांत अत्यंत सुख देणारा जो तुझा मधुर रस तो आम्हांस दे. ७. हे उदका आ- मच्या पापाचा क्षय होण्याकरितां तूं आम्हांवर प्रीति करतेंस ह्यास्तव आह्मी आमच्या मस्तकावर तुझें सिंचन करतों. दुसरा अर्थ—हे उदका, जें अन्न उत्पन्न होण्या- साठीं तूं औषधींचें पोषण करतेंस त्या अन्नाकरितां तुला आम्हीं अत्यंत शरणागत झालों आहों. आणखी हे उदका, आम्हांस पुत्रादिकांच्या उत्पादनाविषयीं प्रयोजित कर. ८. सूर्यश्च या मंत्राचा याज्ञवल्क्याचा पुत्र उपनिषद नांवाचा ऋषि, सूर्यादिदेवता, प्रकृति छंद, मंत्राचमनाकडे उपयोग. ह्या मंत्रानें आचमन करावयाचें म्हणून ह्या आचमनास मंत्राचमन असें अन्वर्थ नांव आहे. ९. सूर्य, क्रोधाभिमानी देव व जित- क्रोधदेव माझ्या कोपजनित पापापासून माझें संरक्षण करोत. मनानें ( परहिंसादि चिंतन ), वाचेनें ( असत्याप्रियभाषणादि ), उदरानें ( अभोज्यभोजनादि ) आणि लिंगानें ( अगम्यागमनादि ), जें पाप गेल्या रात्रींत मीं केलें असेल त्या पापाचा रात्रिदेवता नाश करो. अथवा अशी गणना कां ? जें जें माझ्या ठिकाणीं पाप निष्पन्न

झालें असेल त्या पापाचें व पाप करणाऱ्या मत्स्वरूपलिंगशरीराचें शाश्वत सूर्यात्मक ज्योतींत होमानें भस्म करून टाकतों. यासाठीं हें मंत्रित केलेलें जल ( पाणी ) माझ्या मुखरूप अग्नींत भस्म केलेलें असो. १०.

ओं श्रीकेशवाय नमः ॥० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः । ओं भुवः० भुवः स्वरोम् ॥ ११ ॥ प्रणवस्य ब्रह्माग्नि-र्दैवीगायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ मार्जने विनियोगः ॥१२॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ १३ ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ मार्जने विनियोगः ॥ १४ ॥ ओं तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्यधीमहि ॥ धियोयोनः प्रचोद-यात् ॥१५॥ आपोहिष्ठेति नवर्चस्य सूक्तस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोगायत्री ॥ पंचमी वर्धमाना ॥ सप्तमी प्रतिष्ठा ॥ अंत्ये द्वेऽ-नुष्टुभौ ॥ मार्जने विनियोगः ॥ १६ ॥ आमापोहिष्ठामयोभुव-स्तानऽऊर्जेदधातन ॥ महेरणाय चक्षसे ॥ १७ ॥ ओं योवः शिवतमोरसस्तस्य भाजयतेहनः ॥ उशतीरिवमातरः ॥ १८ ॥ ओं तस्माऽअरंग मामवो यस्यक्षयायजिन्वथ ॥ आपो जनय-थाचनः ॥ १९ ॥ ओं शंन्नो देवी रभिष्टय आपोभवंतु पीतये ॥ शंयोरभिस्रवंतुनः ॥ २० ॥

ओं श्रीकेशव, ११. प्रणवाच्या ऋष्यादिकांचा अर्थ पूर्वी लिहिला. समस्त व्याहृतींचा प्रजापति ऋषि, प्रजापतिदेवता व बृहतीछंद, मार्जनाकडे उपयोग १२. ओं भूर्भुवः स्वः—या व्याहृति अत्यंत संन्निकर्षानें स्थित असल्यास ( तीन्ही व्याहृति जवळ असल्यास ) त्यांस समस्त व्याहृति असें म्हणतात. ह्यांचा अर्थ प्राणायामांत लिहिला. १३. गायत्र्या–अर्थ लिहिला. १४–१५. आपोहिष्ठा या नऊ ऋचांच्या सूक्ताचा आंबरीषाचा पुत्र सिंधुद्वीप नांवाचा ऋषि, उदकदेवता आणि पांचव्या ऋचेचा वर्धमानगायत्री, सातव्या ऋचेचा प्रतिष्ठागायत्री, आठव्या नवव्या ऋचेचा अनुष्टुभ व बाकी सर्व ऋचांचा गायत्रीछंद मार्जनाविषयीं उपयोग. १६. तीन ऋचांचा अर्थ पूर्वी लिहिला. १७–१८–१९. उदकदेवता आमच्या पापाचें निवारण करून आम्हांस सुख देवो. उदक आमच्या अनुष्ठानामध्यें साधनभूत असो. उदक आमच्या प्राशनाकरितां प्राप्त असो. उदक आमच्या रोगांचा नाश करो. उदक आमच्या शुद्धी-करितां मस्तकावर स्राव करो. २०.

ओमीशा॑ना॒ वार्या॑णां॒ क्षयं॑तीश्चर्षणी॒नाम् । अ॒पोया॑चामि भेष॒जम् ॥ २१ ॥ ओम॒प्सुमे॒ सोमो॑ऽअब्रवीदं॒तर्वि॑श्वानि भेष॒जा । अ॒ग्निं च॑ वि॒श्वशं॑भुवम् ॥२२ ॥ ओमाप॑ः पृ॒णीत भे॑ष॒जं वरू॑थं त॒न्वे॒ ३ मम॑ ॥ जोक्च॒ सूर्यं॑ह॒शे ॥ २३ ॥ ओमि॒दमा॑पः॒ प्रव॑हत॒ यत्किंच॑ दुरि॒तं मयि॑ ॥ यद्वाह॑म॒भिदु॒द्रोह॒यद्वा॑शे॒पऽउ॒तानृ॑तम् ॥ २४ ॥ ओमापो॑ऽअ॒द्यान्व॑चारिषं॒ रसे॑न॒ सम॑गस्महि ॥ पय॑स्वा नग्नऽ आग॑हि॒तं मा॒सं सृ॒ज॒वर्च॑सा ॥ २५ ॥ शिरसः प्रजापतिर्ऋषिः ब्रह्माग्निवाय्वादित्यादेवताः यजुश्छंदः ॥ मार्जने विनियोगः ॥२६॥ ओमापो॒ ज्योती॒ रसो॒मृतं॒ ब्रम्ह॒ भूर्भुवः॒ स्व॒रोम् ॥२७॥ ऋतं चेति तृचस्याघमर्षण ऋषिः ॥ भाववृतो देवता ॥ अनुष्टुप्छंदः ॥ अघमर्षणे विनियोगः ॥ २८ ॥ ओं ऋ॒तं च॑ स॒त्यं चा॒भी॑द्धा॒त्तप॒सोध्य॑ जायत । तत्तो॒रात्र्य॑ जायत॒ ततः॑ सम॒द्रोऽ अ॑र्ण॒वः ॥ २९ ॥ ओं स॒मु॒द्राद॑र्ण॒वादधि॑संवत्स॒रो अ॑जायत ॥ अ॒हो॒रा॒त्राणि॑ वि॒द ध॒द्वि॑श्वस्य मि॒ष॒तो व॒शी ॥ ३० ॥

व्रीहियवादिकांचें अथवा श्रेष्ठ धनांचें ईश्वर व मनुष्यांची वसति ( स्थिति ) करणारें अशा उदकाजवळ मी मख ( यज्ञ कर्तृत्व ) मागतों. २१. सर्व औषधें आणि सर्व जगतास सुख देणारा ( विश्वशंभुवनामक ) अग्नि उदकांत आहे, असें सोमानें मला ( मंत्रद्रष्ट्या ऋषीला ) सांगितलें आहे. २२. हे उदका, माझ्या शरीराकरितां रोगाचा नाश करून संरक्षण करणारें औषध मला दे. म्हणजे सूर्य ब्रह्माच्या ज्ञानाविषयीं मी सत्वर शक्त होईन. २३. हे उदका, जें कांहीं अज्ञानानें अथवा जें मी कोणाची बुद्धिपूर्वक हिंसा केल्यानें किंवा जें कोणाची निर्भत्सना केल्यानें अथवा असत्य भाषणानें अनुष्ठान करणाऱ्या माझ्या ठिकाणीं पाप निष्पन्न झालें असेल तें प्रवाहद्वारा माझ्यापासून दूर ने. २४. आज अवभृथ स्नानाकरितां मी उदकांत संचार करून त्याच्या रसाशीं संयुक्त झालों आहें. हे अग्ने, जलांत रहाणारा तूं उदकयुक्त ये, आणि स्नान केलेल्या मला तेजोयुक्त कर. २५. अर्थ लिहिला. २६–२७. 'ऋतं च सत्यं' या तीन ऋचांचा अघमर्षण नांवाचा ऋषि, भाववृत नांवाची देवता, अनुष्टुभ छंद आणि पापाच्या निवारणाकडे उपयोग. २८. सर्वत्र प्रकाश पावणाऱ्या मायाधिष्ठानरूप उपादान कारणभूत परमात्म्यापासून त्यानें उत्पादनीय पदार्थ पर्या-

लोचनरूप तप आचरण केल्यानंतर ऋत म्ह० अंतःकरणनिष्ठ यथार्थ संकल्प, सत्य म्ह० यथार्थ भाषण, इत्यादि प्रकारचें धर्मसाधन उत्पन्न झालें. त्याच ईश्वरापासून रात्रि तसाच दिवस उत्पन्न झाला. त्यापासूनच जलसमुद्र उत्पन्न झाला. जलसमुद्रानंतर संवत्सर ( वर्ष ), ऋतु, मास, पक्ष इत्यादि प्रकारचा काळ उत्पन्न झाला. तोच परमात्मा अहोरात्रादि सकल सृष्टीचें उत्पादन करीत असतां, नेत्रसंबंधी निमेषोन्मेषकर्त्या जगताचा स्वामी होऊन वर्ततो. २९–३०.

**ओं सूर्याचंद्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् । दिवं च पृथिवीं चांतरिक्षम थोस्वः ॥ ३१ ॥ ॐ श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः ओं भुवः स्वरोम् ॥ ३२ ॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी गायत्री ॥ समस्त व्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ गायत्र्यागाथिनो विश्वामित्रः सविता गायत्री ॥ अर्घ्यनिवेदने विनियोगः ॥ ३३ ॥ शिरसः प्रजापति ब्रह्माग्निवाय्वादित्या यजुः ॥ तेज आकर्षणे विनियोगः ॥ ३४ ॥ ओं भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ ओं श्रीसवित्रे इदमर्घ्यं समर्पयामि ॥ ओमापो ज्योतीरसोमृतं ब्रह्मभूर्भुवः स्वरोम् ॥ ओं तेजोसि-तेजोमयिधेहि ॥ ३५ ॥**

अशा सर्व जगतास उत्पन्न करणाऱ्या ईश्वरानें सूर्य, चंद्र, देवलोक, पृथिवी आकाश आणि ज्यांत दुःखाचा अथवा भीतीचा लेश नाहीं अशा निरंतर सुखाच्या उपभोगाचें स्थान अशा प्रकारचे पदार्थ, प्रलय होण्याच्या पूर्वी सृष्टींत जसे होते तसे संकल्प मात्रानें उत्पन्न केले. ३१. ओं श्रीकेशव. ३२. प्रणवाच्या व्याहृतीचा व गायत्रीच्या ऋष्यादिकांचा अर्थ पूर्वी लिहिला. सन्मानपूर्वक पूजोदकाच्या समर्पणा· विषयीं उपयोग. ३३. शिरसः—अर्थ लिहिला. तेज—सूर्याबरावर युद्ध करणाऱ्या मंदेहासुरांच्या दहनासाठीं अर्घ्योदकासह गेलेल्या तेजाच्या आकर्षणाविषयीं उपयोग. ३४. ओंभूः––व्याहृतींचा व गायत्रीचा अर्थ लिहिला. सूर्याकरितां हें तेजोयुक्त अर्घ्योदक समर्पण करतों. ( वर उडावितों ) म्हणजे ज्याच्या योगानें सूर्याशीं युद्ध करणाऱ्या मंदेह नामक क्रूर असुरांचें दहन होवो. **आमापोज्यो**––अर्थ लिहिला. **ओं तेजोसि**––ह गायत्री शिरोमंत्रा, तूं ब्रह्मसाक्षात्कार साधनात्मक तेजोरूप आहेस,

ह्यासाठीं सूर्यब्रह्मास आरोपित अंतराय करणाऱ्या मंदेहांच्या नाशासाठीं मी प्रेरित केलेलें आधार मंडपगत तेज पुन्हां पुष्ट करून माझ्या ठिकाणीं स्थापन कर. कीं जेणेंकरून मी ब्रह्मज्ञानवान् होईन. जरी 'तेजोसि इत्यादि' मंत्र समित्प्रार्थनेचा आहे तथापि येथें स्मृतिर्लिंगानें गायत्री शिरोमंत्राच्या प्रार्थनेविषयीं प्रयुक्त केला आहे. ३५.

एवं त्रिः ॥ ३६ ॥ ओमसावादित्यो ब्रह्म ॥ ३७ ॥ ओं श्रीकेशवाय नमः । ओं श्रीकृष्णाय नमः ओं भूः० स्वरोम् ॥ ३८ ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ आसन उपवेशने विनियोगः ॥ ॐ भूर्भुवः स्वः ॥ ३९ ॥ प्रणवस्य० प्राणायामे विनियोगः ॥४०॥ ॐ भूः० स्वरोम् ॥४१॥ (इति त्रिः कृते प्राणायामः ॥ एवं त्रिवारं प्राणायामं कृत्वा) ॥ ४२ ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ आत्माभ्युक्षणे विनियोगः ॥ ४३ ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥४४॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री जपे विनियोगः ॥ ४५ ॥ तत्सवितुर्हृदयाय नमः ॥ वरेण्यं शिरसे स्वाहा ॥ भर्गोदेवस्य शिखायै वषट् ॥ धीमहि कवचाय हुम् ॥ धियो योनः नेत्रत्रयाय वौषट् ॥ प्रचोदयात् अस्त्राय फट् ॥४६॥

असें तीन वेळां अर्घ्य निवेदन करावें. ३६. आदित्य हा सर्वव्यापक ब्रह्म आहे म्हणून मी प्रदक्षिणे प्रमाणें आपल्या भोंवती फिरून त्याच्या प्रीतिकरितां आसमंत भागांत उदक सिंचन करतों. ३७. ओंश्री. ३८. आसनावर बसण्याकडे उपयोग. ३९-४०-४१. (पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तीनदां प्राणायाम करून) ४२. आत्मदेहाच्या सिंचनार्थ उपयोग. ४३-४४-४५. "शब्दार्थांच्या तादात्म्य स्वीकारानें जो मंत्र तीच तद्वाच्यदेवता अथवा जी देवता तोच तद्वाचक मंत्र अशा विवक्षेनें मंत्रात्मक देवतेच्या अवयवांचा जप करणारा अंगन्यास करतो म्हणजे जप करीत असतां जपमंत्रवाच्यदेवतेच्या यथाविधि सेवनाशिवाय दुसऱ्या व्यापाराविषयीं मानसादि अंगांचीं प्रवृत्ति आणि अन्य अशुचि स्पर्शादि, एतद्रूप विघ्नापासून अंगांच्या संरक्षणाकरितां मंत्रावयवाची स्थापना करतो. आणखी नमः, स्वाहा, इत्यादि शब्दांनीं नमस्कारादि जपफलप्राप्तीविषयीं प्रार्थना करतो." 'तत्सवितुः' हा मंत्रावयव हृदयाय म्ह० हृदयाचें (मनाचें) संरक्षण करो. आणि एतदवयवोपलक्षित मंत्रदेवतेस नमः

म्ह० नमस्कार असो. ' वरेण्यं ' हा शिराचें ( टाळूचें ) रक्षण करो. आणि स्वाहा म्ह० देवतेस आव्हान असो ' भर्गोदेवस्य ' हा शिखेचें रक्षण करो, आणि वषट् म्ह० देवता माझ्या सन्निध प्राप्त असो. ' धीमहि ' हा विघ्नांचा शरीरांत प्रवेश न व्हावा म्हणून माझ्या शरीरावर कवच ( चिलखत ) रूपानें स्थित असो, आणि हुं म्ह० अनुष्ठान करण्यास देवतेची आज्ञा असो. ' धियोयोनः ' हा भ्रुकुटि मध्यभाग व दोन्ही नेत्र ह्यांचें रक्षण करो, व वौषट् म्ह० देवतेस अनुष्ठान समर्पण असो. ' प्रचोदयात् ' हा बाह्यविघ्नांच्या निवारणासाठीं अस्त्ररूपानें माझ्या जवळ स्थित असो, व फट् म्ह० देवतेशीं माझा योग ( सायुज्य मुक्ति ) असो. जपसमयीं हृदय, शिर व नेत्रत्रय ह्या शब्दांनीं महावयवांच्या निग्रहाविषयीं आणि शिखा शब्दानें ( उपलक्षणें करून ) सामान्यतः क्रियेविषयींही अचेतन अशा लोमनखादि सर्व अवयवांच्या निग्रहाविषयीं जपकर्त्याची प्रार्थना होय. हृदयादिक शब्दांहून ' क्रियार्थोपपदस्य च कर्मणि स्थानिनः ' ह्या सूत्रानें चतुर्थी विभक्ति आहे. सु आ–उपसर्गपूर्वक व्हे धातूहून डा प्रत्ययानें स्वाहा अव्यय, वह धातूहून डषट् प्रत्ययानें वषट् अव्यय आणि वह धातूहून डौषट् प्रत्ययानें वौषट् अव्यय निष्पन्न झालें आहे. हुं, फट् हीं अव्ययें क्रमानें अनुज्ञार्थी व योगार्थी कोषामध्यें प्रसिद्ध आहेत. ४६.

**बालां बालादित्यमंडलमध्यस्थां रक्तवर्णां रक्तांबरानुलेपनस्रगाभरणां चतुर्वक्त्रामष्टनेत्रां दंडकमंडलवक्षसूत्राभयांक चतुर्भुजां हंसासनारूढां ब्रह्मदैवत्यामृग्वेदमुदाहरंतीं भूर्लोकाधिष्ठात्रीं गायत्रीं नाम देवतां ध्यायामि ॥ ४७ ॥ आगच्छवरदे देवि जपे मे सन्निधौ भव ॥ गायंतं त्रायसे यस्माद्गायत्री त्वं ततः स्मृता ॥ ४८ ॥**

बालावस्था धारण करणारी, प्रातःकाळच्या सूर्यमंडलांतर्गत, रक्तवर्णा, रक्तवस्त्र परिधान केलेली, केशरानें अनुलेपित, रक्तपुष्पांच्या माळा धारण करणारी, रक्तरत्नांच्या अलंकारांनीं युक्त, चतुर्मुखा (चार तोंडाची), अष्टनेत्रा, दंड, कमंडलु, रुद्राक्षमाळा व अभयदानाची मुद्रा यांनीं युक्त आहेत कर जिचे, हंसावर बसलेली, ब्रह्मदेवात्मक दिव्यमूर्ति, ऋग्वेदाचें पारायण करणारी आणि भूलोकांत निवास करणारी अशा गायत्री नांवाच्या देवतेचें मी ध्यान करतों. ४७. हे मनोरथ पूर्ण करणारी गायत्री देवि, मी जप करीत असतां माझ्या सन्निध असा जप करणाराचें संसारदुःखापासून रक्षण कर-

तेस म्हणून तुला गायत्री असें म्हणतात. म्हणून आपलें असें रक्षण कर्तत्व ब्रिद राखणें तुला आवश्यक आहे. ४८.

ओं भूर्भुवः स्वः॥ तत्सवितुर्वरेण्यम्॥ भर्गोदेवस्य धीमहि। धियोयोनः प्रचोदयात्॥ ४९॥ तत्सवितु हृदयाय नमः॥ वरेण्यं शिरसे स्वाहा॥ भर्गोदेवस्य शिखायै वषट्॥ धीमहि कवचायहुम्॥ धियोयोनः नेत्रत्रयाय वौषट्॥ प्रचोदयात् अस्त्राय फट्॥ ५०॥ जातवेदस इत्यस्य मारीचः कश्यपो जातवेदा अग्निस्त्रिष्टुप्॥ उपस्थाने विनियोगः॥ ५१॥ ओं जातवेदसे सुनवाम सोममरातीयतोनिर्दहातिवेदः। सनः पर्षदति दुर्गाणिविश्वानावेव सिंधुं दुरितात्यग्निः॥ ५२॥ तच्छं योरावृणीमह इत्यस्य शंयुर्विश्वेदेवाः शक्करी। उपस्थाने विनियोगः॥ ५३॥ ओं तच्छंयोरावृणीमहे गातुंयज्ञाय गातुं यज्ञपतये दैवीः स्वस्तिरस्तुनः स्वस्तिर्मानुषेभ्यः। ऊर्ध्वं जिगा तु भेषजं शन्नोअस्तु द्विपदेशं चतुष्पदे॥ ५४॥

याप्रमाणें जप करावा. हा गायत्री जप संध्यागत असल्यानें संध्येच्या संकल्पानेंच ह्याची कर्तव्यता प्राप्त आहे म्हणून ह्याविषयीं पृथक् संकल्पाचें प्रयोजन नाहीं. ४९. “ निर्विघ्नतेनें जप व्हावा यासाठीं हृदयादि इंद्रियांच्या निग्रहाविषयीं देवतेची प्रार्थना जपकर्त्यानें जपापूर्वीं केली होती तशी आतां तो निवृत्तीविषयीं पुन्हा त्याच शब्दांनीं प्रार्थना करतो ”. हृदयादि इंद्रियांचें जपविषयक निग्रहापासून मंत्रदेवता मुक्त करो. जपकर्त्यानें जपापूर्वीं ‘ नमः स्वाहा वषट् हुं वौषट् फट् ’ ह्या शब्दांनीं देवतेची जशी प्रार्थना केली होती ती प्रार्थना तिनें स्वीकृत केली अशा भावनेनें देवतेच्या कृपादृष्टीचा पुन्हा ‘ नमः ’ इत्यादि शब्दांनीं स्वीकार केला आहे. ५०. या मंत्राचा मरीचिपुत्र कश्यपऋषि, जातवेद नांवाचा अग्नि देवता, त्रिष्टुभ छंद व अग्नीच्या स्तुत्यात्मकपूजेकडे उपयोग. ५१. ज्यास प्राणिमात्र जाणतात अशा अन्वर्थ जातवेद नामक अग्नीच्या यजनाकरितां आम्ही सोमलतेचें निष्पीडन करतों. तो अग्नि आमच्या शत्रूचें धन दहन करो. आणि जसें—नावाडी नावेच्या योगानें भयंकर नदी तरवून पार नेतो तसें अग्नि आम्हांस सर्व दुःखें घालवून सुख देवो. ५२. या मंत्राचा शंयु-ऋषि, विश्वेदेवता, शक्करी छंद व उपस्थानाकडे उपयोग. ५३. याचा अर्थ ब्रह्मयज्ञांत लिहावयाचा आहे. ५४.

नमो ब्रह्मण इत्यस्य प्रजापति र्विश्वेदेवता जगती ॥ उपस्थाने विनियोगः ॥ ५५ ॥ ओं नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नये नमः पृथिव्यै नम ओषधीभ्यः । नमो वाचे नमोवाचस्पतये नमो विष्णवे महतेकरोमि ॥ ५६ ॥ मित्रस्येति चतसृणां गाथिनो विश्वामित्रो मित्रो गायत्री ॥ उपस्थाने विनियोगः॥५७॥ मित्रस्य चर्षणी धृतवो देवस्य सानसि ॥ द्युम्नं चित्रश्रवस्तमम् ॥ ५८ ॥ अभियो महिनादिवं मित्रोबभूवस प्रथाः । अभिश्रवोभिः पृथ्वीम् ॥ ५९ ॥ मित्राय पंचये मिरे जना अभिष्टिशवसे ॥ सदेवान्विश्वान्बिभर्ति ॥ ६० ॥ मित्रोदेवेष्वायुषु जनाय वृक्त बर्हिषे ॥ इषइष्टव्रताऽअकः ॥ ६१ ॥ प्राच्यै दिशे चेंद्राय नमः ॥ आग्नेय्यै दिशे चाग्नये नमः ॥ दक्षिणायै दिशे च यमाय नमः नैर्ऋत्यै दिशे च नैर्ऋताय नमः ॥ प्रतीच्यै दिशे च वरुणाय नमः ॥ वायव्यै दिशे च वायवे नमः उदीच्यै दिशे च सोमाय नमः ॥ ऐशान्यै दिशे चेशानाय नमः ॥ ऊर्ध्वा-

या मंत्राचा प्रजापतिऋषि, विश्वेदेव देवता, जगतीछंद आणि उपस्थानाकडे उपयोग. ५५. ब्रह्मणे म्ह० वेदास अथवा ब्रह्मदेवास, अग्नीस, पृथिवीस, औषधींस, सरस्वतीस व बृहस्पतीस नमस्कार असो. तसेंच महाविष्णूला नमस्कार करतों. पृथक् पृथक् स्तुति दाखविण्याकरितां पुन्हा पुन्हा ' नमः ' शब्दाचा प्रयोग आहे. ५६. मित्रस्य चर्षणी इत्यादि चार ऋचांचा गाथिपुत्र विश्वामित्र नांवाचा ऋषि, मित्रदेवता, गायत्रीछंद व सूर्याच्या उपस्थानाकडे उपयोग. ५७. मनुष्यांचें पर्जन्यद्वारा पोषण करणाऱ्या सूर्यदेवसंबंधी अन्न सर्वांनीं सेवन करण्यास योग्य आहे आणि धन अतिशयित कीर्तनीय आहे. ५८ जो सूर्य आपल्या महिम्यानें अंतरिक्ष व्याप्त करतो, त्याची स्तुति केली असतां तो वृष्टि द्वारा (पावसाच्या योगानें) उत्पन्न केलेल्या अन्नांनीं पृथिवीस परिपूर्ण करतो. ५९. शत्रूच्या समोर गमन करणाऱ्या बलवान् सूर्यास मनुष्य हविर्भाग देतात. तो सूर्य सर्व देवांस स्वस्वरूपानें प्राप्त करतो. ६०. देवांमध्यें श्रेष्ठ सूर्य, मनुष्यांमध्यें श्रेष्ठ अशा ऋत्विक् जनास कल्याणाविषयीं व व्रताविषयीं साधनभूत अशीं अन्नें देतो. ६१. प्राच्यै-पूर्वदिशेस व तत्स्वामी (तिचा स्वामी) इंद्र ह्यांस नमस्कार असो. इत्यादि संध्यायै—संध्या म्ह० तिन्ही काळांत अनुष्ठेय अशी देवता

यै दिशे च ब्रम्हणे नमः॥ अधरायै दिशे चानंताय नमः॥ संध्यायै नमः ॥ गायत्र्यै नमः ॥ सावित्र्यै नमः ॥ सरस्वत्यै नमः ॥ सर्वाभ्यो देवताभ्यो नमः ॥ ६२ ॥ उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ॥ ब्राम्हणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखम् ॥ ६३ ॥ भद्रं न इत्यस्य विमदः परमात्मा विराट् ॥ भद्रसंपादने विनियोगः ॥ ६४ ॥ ओं भद्रं नोअपिवातयमनः ॥ ६५ ॥ ओं शांतिः शांतिः शांतिः ॥ ६६ ॥ आसत्यलोकात्पातालादालोकालोकपर्वतात्। ये संति ब्राम्हणा देवास्तेभ्यो नित्यं नमोनमः ॥ ६७ ॥ स्योना पृथिवीत्यस्य काण्वो मेधातिथिर्भूमि र्गायत्री ॥ भूमिप्रणामे विनियोगः ॥ ६८ ॥ ओं स्योना पृथिवी भवानृक्षरा निवेशनी ॥ यच्छानः शर्म सप्रथः ॥ ६९ ॥

तिला नमस्कार असो. गायत्री म्ह० बालावस्थाविशिष्ट संध्या, सावित्री म्ह० तरुणावस्थाविशिष्ट संध्या व सरस्वती म्ह० वृद्धावस्थाविशिष्ट संध्या अशा कालपरत्वानें भिन्न अवस्था-धारण-करणाऱ्या संध्येस नमस्कार असो. सर्व देवांस नमस्कार असो. ६२. पृथ्वीवरील पर्वतांमध्ये श्रेष्ठ अशा मेरूच्या उत्तम शिखरावर आविर्भूत होणारे हे देवि, तुझी उपासना करणाऱ्या ब्राम्हणांस तुझ्या प्रसादानें ज्ञानवान करून सुखानें स्वस्थानीं जा. ६३. या मंत्राचा विमद ऋषि, परमात्मा देवता, विराट् छंद आणि मनास शुभयुक्त करण्याविषयीं प्रार्थनेकडे उपयोग. ६४. हे अग्नि परमात्म्या, तूं आमच्या अंतःकरणास कल्याणयुक्त कर, म्हणजे तुझें स्तवन करण्यास तें प्रवृत्त होईल. ६५. आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक पीडांचें शमन होण्याकरितां शांतीचें त्रिवार उच्चारण विहित आहे. ६६. सत्यलोक, पाताल, लोकपर्वत व आलोकपर्वत ह्या चतुःसीमां मध्यें जे ब्राम्हण व देव आहेत त्यांस सर्वदा वारंवार नमस्कार असो. ६७. या मंत्राचा कण्वाचा पुत्र मेधातिथि नांवाचा ऋषि, भूमिदेवता, गायत्रीछंद व भूमीच्या नमस्काराकडे उपयोग. ६८. हे पृथिवि, तूं सुखस्वरूपा ( सुखदात्री ), निष्कंटका व वसतीविषयीं उत्तम स्थानभूता हो, आणि आम्हांस विस्तीर्ण गृह दे. ६९.

अमुकप्रवरान्वितामुकगोत्रोत्पन्नोऽमुकशर्माहं भोगुरो त्वामभिवादयामि ॥ ७० ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ( इति द्विराचम्य ) ओं भूः० स्वरोम् ॥ अनेन प्रातःसंध्याख्येन कर्मणा भगवान् श्रीपरमेश्वरः प्रीयतां न मम ॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥

इति प्रातःसंध्या.

---

हे गुरु, अमुक प्रवरांनींयुक्त अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला अमुक नांवाचा मी, तुला अभिवादन करतों म्हणजे नमस्कार करून तुझ्यापासून आशीर्वाद घेतों. ' अमुक ' ह्या ठिकाणीं ज्याचें जसे प्रवर, गोत्र व नांव असेल तसें त्यानें उच्चारावें. ब्राह्मण व्यक्तिवाचक नांवाच्या शेवटीं शर्मपद लावावें असा शास्त्रनियम आहे. ७० **ओंश्री**–अर्थ लिहिला **अनेन**–ह्या प्रातःसंध्या नांवाच्या कर्मानें सर्वसंपन्न परमात्मा प्रीति करो, भगवत्प्रीतिवाचून दुसऱ्या फळाविषयीं ह्या कर्माचा मी अभिनिवेश करीत नाहीं. **ओं तत्स**—ओंकारवाच्य आनंदस्वरूप शाश्वत ब्रह्माच्या साक्षात्काराविषयीं हें कर्म कारणभूत असो.

याप्रमाणें प्रातःसंध्या [ सांगितली. ]

---

## अथौपासनविधिः

दक्षः—संध्या कर्मावसाने तु स्वयं होमो विधीयते । स्वयं होमे फलं यत्स्यात्तदन्येन न लभ्यत इति ॥ १ ॥ याज्ञवल्क्यः—कर्म स्मार्तं विवाहाग्नौ कुर्वीत प्रत्यहं गृहीति ॥२॥

### अथ औपासनविधि.

**दक्ष**—प्रातःसंध्या झाल्यानंतर स्वकीय होम करावा. स्वकीय होम भार्यादि प्रतिनिधिद्वारा केल्यानें आत्मतुल्य फळ प्राप्त होत नाहीं. १. **याज्ञवल्क्य**—गृहस्थानें दररोज स्मार्तकर्म गृह्याग्नीवर करावें. २

शौनकः—अरत्निमात्रं विज्ञेयमग्नेरायतनं शुभम् । नित्यहोमे तु कुंडं स्यान्मेखलात्रयसंयुतम् । भूमेरूर्ध्वं तु कुर्वीत चतुर्विंशांगुलं शुभम् । मेखला चोन्नता कार्या त्वेकैका चतुरंगुला । व्यंगुला विस्तृतैकैका खातः स्याद्द्वादशांगुलः ॥ ३ ॥ इषुमात्रं चतुर्दिक्षु गोमयेन सवारिणा । उपलिप्य समं कुंडं चतुरस्रं तु सर्वत इति ॥ ४ ॥ गृह्यपरिशिष्टे—अस्तमित आदित्ये सायमग्नेः प्रादुष्करणमुदिते प्रातः प्रदोषांतः सायं संगवांतः प्रातर्नात्र तंत्रमिष्यत इति ॥ ५ ॥ शाकलः—औपासनं ततः कुर्यात्सायमादि यथाक्रमम् । सायमौपासनं होष्ये प्राणानायम्य च स्वयम् । अपरेद्युः कृतस्नानः प्रातःसंध्यामुपास्य च । प्राणानायम्य वै प्रातर्होमं होष्य इति क्रमात् । अग्नेर्ध्यानं ततः कुर्यान्मंत्रेणाग्निं समिंधयेदिति ॥ ६ ॥

**शौनक**—जमिनीपासून चोवीस अंगुळें उंच, आणि ज्याचा आंतील अवकाश ( अग्नि रहाण्याची जागा ) कोंपरापासून कनिष्ठिकेच्या ( करंगळीच्या ) नखाग्रा एवढा लांब रुंद, बारा अंगुळें खोल व समप्रमाणकर्ण असून बाहेरच्या बाजूस चार चार अंगुळें उंच आणि दोन दोन अंगुळें रुंद अशा तीन मेखलांनीं ( पायऱ्यांनीं ) युक्त गुळगुळीत असें गृह्याग्नीचें कुंड करावें. मेखलांस आरंभ बारा अंगुळांवर करावा. ३ गृह्याग्नीचें कुंड उदकसहित गोमयानें ( शेणानें ) चार दिशांस सारखें हातभर सारवून अग्नीचें प्रकटीकरण करावें. ४. **गृह्यपरिशिष्टांत**—संध्याकाळीं सूर्यास्त झाल्यानंतर व प्रातःकाळीं सूर्योदय झाल्यानंतर गृह्याग्नीचें उद्धरण करावें. सायंकाळीं सहा घटिका रात्रीपर्यंत आणि प्रातःकाळीं सहा घटिका दिवस येईपर्यंत होमकाल आहे. आपत्कालींही संध्याकाळीं व सकाळीं पृथक् पृथक् होम केला पाहिजे. ५. **शाकल**—विवाहानंतर गृहस्थानें सायंकाळीं संध्या झाल्यावर दोनवेळा आचमन करून व प्राणायाम करून ‘ सायंहोम करतों ’ अशा अर्थाचा आणि दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्नान-संध्या झाल्यावर पूर्वीप्रमाणें आचमन प्राणायाम करून ‘ प्रातर्होम ’ करतों अशा अर्थाचा संस्कृत भाषेनें संकल्प करून क्रमानें प्रत्यहीं द्विवार गृह्याग्निहोम करावा. गृह्याग्निहोमाचा सायंकालापासून आरंभ होय. संकल्पानंतर ‘ चत्वारिशृंगा ’ ह्या मंत्रानें अग्नीचें ध्यान करून त्यास प्रज्वलित करावें. ६

विष्णुः—बहुशुष्केंधने चाग्नौ सुसमिद्धे हुताशने । विधूमे लेलिहानेच होतव्यं कर्मसिद्धय इति ॥ ७॥ संग्रहे—धमनीमंतरा कृत्वा तृणं वा काष्ठमेव च । मुखेनाग्निं समिंधीत मुखादग्निरजायतेति ॥ ८ ॥ शाकलः—परिषिंचेत्तु तोयैस्त्रिर्विशुद्धैर्मेखलोपरि । दर्भैरगर्भैर्मध्यस्थमेखलायां परिस्तरेत् । उत्तानपाणितलतः पर्युक्षेत्त्रिस्ततः परम् । पयःप्रभृतिषु त्वेकं संस्कुर्यादग्निहोत्रवदिति ॥ ९ ॥ गृह्यपरिशिष्टे—हौम्यमपक्वमुल्मुकेनावज्वाल्य प्रोक्ष्य तेनैव त्रिःपरिहृत्योल्मुकं निरस्येषत्पक्वमुदगंगारेष्वधिश्रित्य प्रोक्ष्योदगुद्वास्य तानंगारानतिसृजेदेष हौम्यसंस्कारः पयोदधिसर्पिर्यवागूरोदनस्तंडुलाः सोमस्तैलमापोव्रीहयो यवास्तिला इति हौम्यानीति ॥ १० ॥

**विष्णु**—पुष्कळ वाळलेल्या इंधनांनीं अत्यंत प्रज्वलित निर्धूम हविर्भागाचें निःशेष दहन करणाऱ्या संस्कृत अग्नीवर होम करावा म्हणजे कर्मजन्य फळ प्राप्त होतें. ७. **संग्रहांत**—फुंकणीचा, ती नसेल तर तृणाचा अथवा काष्ठाचा मुखसंबंधी तुषार अग्नीवर न जावे यासाठीं अंतराय करून मुखानें फुंकून अग्नीचें प्रदीपन करावें. कारण, ईश्वराच्या मुखापासून अग्नि उत्पन्न झाला. ८. **शाकल**—कुंडाच्या वरच्या मेखलेवर निरनिराळ्या शुद्धोदकानें बोटांचीं अग्रें अधोभागीं ( खालीं ) करून पूर्वेपासून ऐशानीपर्यंत प्रदक्षिण क्रमानें त्रिवार परिषिंचन करावें; आणि ज्यांच्या गर्भांत दुसरा दर्भ नसेल अशा एकेरी दर्भांनीं पूर्वेकडील व पश्चिमेकडील दर्भांची अग्रें उत्तरेकडे होतील व दक्षिणेकडील व उत्तरेकडील दर्भांचीं अग्रें पूर्वेकडे होतील असें मधल्या मेखलेवर परिस्तरण करावें; आणि हाताचें तळ उताणें करून खालच्या ( जमिनीजवळच्या तिसऱ्या ) मेखलेवर त्रिवार पर्युक्षण करावें. नंतर पयःप्रभृति हविर्द्रव्यांतील एका द्रव्याचा अग्निहोत्रासारखा संस्कार करावा. ९ **गृह्यपरिशिष्टांत**—असंस्कृत हविर्द्रव्य ज्वालित कोलितानें प्रकाशित करून उदकानें प्रोक्षून तेंच कोलित सभोंवतीं फिरविल्यानें केशकीटादि दोषापासून निवृत्त करून, कोलित टाकून, कुंडाच्या उत्तरेस निखाऱ्यावर थोडें उष्ण होईल असें तापवून पुन्हा प्रोक्षून, कुंडाच्या उत्तरेस ठेवून, कुंडाच्या उत्तरेस पृथक् झालेले निखारे पुन्हा अग्नींत मिळवावे; ह्या कर्मास हविःसंस्कार असें म्हणतात. दूध, दहीं, तूप, खीर, भात, तांदूळ, सोमवल्ली, तेल, पाणी, भात, जव आणि तीळ हीं हविर्द्रव्यें होत. १०

शातातपः—आर्द्रामलकमात्रास्तु ग्रासा इंदुव्रते स्थिताः । तथैवाहुतयः सर्वा इति ॥ ११ ॥ अगस्त्यसंहितायाम्— द्रवद्रव्यस्य मानं स्याद्धारा गोकर्णदीर्घिकेति ॥ १२ ॥ शाकलः—प्रागादीशानपर्यंतं समंतादग्निमर्चयेत् । विश्वानीत्यष्टभिः पादैः संस्तुत्यांत्यऋचा त्वथेति ॥ १३ ॥ आश्वलायनसूत्रम्—जान्वाच्य समिधमादध्यात्प्रदीप्तां व्द्यंगुलमात्रेभि जुहुयादिति ॥ १४ ॥ शौनकः—पालाशः खादिरोश्वत्थ शम्युदुंबरजा समित् । अपामार्गार्कदूर्वाश्च कुशाश्चेत्यपरे विदुः ॥ सत्वचः समिधः कार्या ऋजुश्लक्ष्णाः समास्तथा । शस्ता दशांगुलास्ताः स्युर्द्वादशांगुलिकास्तथेति ॥ १५ ॥ शाकलः— अद्भिः संशोधितान् शुभ्रांस्तंडुलानग्निसंस्कृतान् । जुहुयादग्नये स्वाहा सूर्याय प्रातरेव च । ध्यात्वा शब्दं चतुर्थ्यंतं प्रजापतय इत्यथ । स्वाहाकारेण वै हुत्वा कुर्यात्परिसमूहनम् । परिषिच्य ततस्तिष्ठन्सूर्योपस्थान माचरेदिति ॥ १६ ॥

शातातप—चांद्रायणव्रतांतील ग्रास ( घास ) आणि सर्व आहुति ओल्या आवळ्या एवढ्या असाव्या. ११. अगस्त्यसंहितेंत—होम करावयाचें द्रव्य द्रवरूप ( पातळ ) असल्यास गायीच्या कानाएवढी लांब अविच्छिन्न ( सारखी ) धारा पडेल इतकें प्रत्येक आहुतीस घ्यावें १२. शाकल—' विश्वानिनो ' इत्यादि आठ चरणांनीं पूर्वेपासून ऐशानीपर्यंत आसमंतभागीं गंधाक्षत पुष्पादिकांनीं अग्नीची पूजा करून ' यस्मै त्वं ' या ऋचेनें स्तुति करावी. १३. आश्वलायनसूत्रांत— उदराच्या व उजव्या गुडघ्याच्या मध्यें हात करून अमंत्रक समिध द्यावी आणि ती प्रज्वलित झाल्यावर तिच्या उत्तरेस दोन अंगुलांवर आहुतीचा होम करावा. १४. शौनक—पळस, खैर, अश्वथ ( पिंपळ ), शमी, उंबर, आघाडा, रुई, दूर्वा आणि कुश ह्या वृक्षांची एकेकाच्या अभावीं समिध घ्यावी. त्वचेनें ( सालीनें ) युक्त, सरळ, मृदु व सारख्या असून दहा अंगुलें अथवा बारा अंगुलें लांब अशा समिधा उत्तम होत. १५. शाकल—उदकानें धुतलेल्या स्वच्छ तांदुळांचीं ( हविर्द्रव्याची ) सायंकाळीं ' अग्नये स्वाहा ' ह्या मंत्रानें व प्रातःकाळीं ' सूर्याय स्वाहा ' ह्या मंत्रानें आहुति द्यावी, आणि चतुर्थ्यंत प्रजापति शब्दाचें ' प्रजापतये ' असें मनोमय पठन

करून गंभीर ध्वनीनें ( उपांशु ) ' स्वाहा ' असें उच्चारण करून दुसरी आहुति द्यावी. आणखी पूर्ववत् उदकानें परिषिंचन व पर्युक्षण करून उभ्यानें सूर्याचें उपस्थान करावें. १६

संग्रहे—द्रवं हविः स्रुवेणैव पाणिना काठिनं हविः । अंगुल्युत्तरपार्श्वेण होतव्यमिति तु स्मृतिरिति ॥ १७॥ शौनकः—उत्तानेन तु हस्तेन त्वंगुष्ठाग्रेण पीडितम् । संहतांगुलिपाणिस्तु वाग्यतो जुहुयाद्धविरिति ॥ १८॥ विष्णुः—मंत्रेणोंकारपूर्वेण स्वाहांतेन विचक्षणः । स्वाहावसाने जुहुयाद्वामहस्तं हृदिन्यसन्निति ॥ १९ ॥ शौनकः—यत्किंचिज्जुहुयादग्नौ तत्सर्वं त्यागपूर्वकमिति ॥ २० ॥ आश्वलायनसूत्रम्—उत्तरां तूष्णीं भूयसीमसंसृष्टां प्रागुदगुत्तरतोवा प्रजापतिं मनसा ध्यायेत्तूष्णीं होमेषु सर्वत्रेति ॥ २१ ॥

" आहुति दानाचे विशेष धर्म सांगतो ". **संग्रहांत**—द्रव हविष्याचा स्रुवेनें आणि कठिण हविष्याचा उजव्या हाताच्या अंगुलींच्या उत्तर भागानें होम करावा असा शास्त्रनियम आहे. १७. **शौनक**—बोटें एकमेकांशीं सलग्न करून उताण्या हातावर अंगठ्यानें हविष्य धरून त्याचा मौनव्रतानें होम करावा. १८. **विष्णु**—ज्ञात्यानें हृदयावर डावा हात स्थापन करून प्रणवादिस्वाहा-शब्दांत-मंत्रानें स्वाहाशब्दोच्चारणाच्या अंतीं आहुतिदान करावें. १९. **शौनक**—कोणत्याही हविष्याचा मंत्रानें अग्नींत प्रक्षेप केल्यावर त्याची ' नमम ' ह्या शब्दानें सत्तानिवृत्ति करावी. २०. **आश्वलायनसूत्रांत**—दुसरी आहुति सामान्यतः ( अवदान नियमावाचून ) पहिली पेक्षां अधिक घेऊन पहिली आहुति दिली असेल तिच्या ईशान्य दिशेस किंवा उत्तरेस तिच्याशीं सलग्न न होतां चतुर्थ्यंत प्रजापति शब्दांचें अंतःकरणांत ध्यान करून स्वाहा शब्द उपांशु ( गंभीर ध्वनीनें ) उच्चारून आहुति द्यावी. ही सर्व होमाची परिभाषा होय. २१

शौनकः--अग्नेः सूक्तैश्च सौरैश्च प्राजापत्यैश्च नित्यशः। अग्निं प्रजापतिं सायं प्रातः सूर्यं प्रजापतिम् ॥ अग्नआयूंषि तिसृभि र्द्वाभ्यामग्ने त्वमित्यथ। सूर्योन इतिमंत्रेण ह्युदुत्यं च द्वितीयया। तृतीयया चित्रमिति नमो मित्रस्य चान्यया। प्रजापतेन त्वदृचा तंतुं तन्वन्द्वितीयया। हिरण्यगर्भः समिति ह्युपतिष्ठेध्द्हुताशनमिति ॥ २२ ॥ शाकलः--मध्यांगुलित्रयेणैव धारयेद्धोमभस्म च। ललाटे हृदये बाव्होर्मस्तके मंत्रपूर्वकम्। मानस्तोकेथवा चैव बृहत्सामेत्र्यृचाथवा ॥ २३ ॥ सर्वत्रोंचम इत्यग्निमुपस्थायाभिवादयेत्। दश देव्या जपेन्मंत्रं होमसाद्गुण्यकारकम्। स्मृत्वा नत्वाथ वै विष्णुं संपूर्णं स्यादिति श्रुतिरिति ॥ २४ ॥

## इति प्रातरौपासनविधिः

---

शौनक—प्रत्यहीं सायंकाळीं अग्निसूक्तांनीं व प्रजापतिसूक्तांनीं अग्नीचें आणि प्रजापतीचें उपस्थान करावें. आणि प्रातःकाळीं सौरसूक्तांनीं व प्रजापतिसूक्तांनीं सूर्याचें आणि प्रजापतीचें उपस्थान करावें. ' अग्नआयूंषि ' इत्यादि तीन ऋचांनीं आणि ' अग्नेत्वंनो ' इत्यादि दोन ऋचांनीं अग्नीचें; सूर्योनो ' ' उदुत्यं ' ' चित्रंदेवानां ' ' नमो मित्रस्य ' ह्या ऋचांनीं सूर्याचें आणि ' प्रजापते ' ' तंतुं तन्वन् ' ' हिरण्यगर्भः ' ह्या ऋचांनीं प्रजापतीचें अग्निस्वरूपीं उपस्थान करावें. २२. शाकल—मधल्या तीन बोटांनीं होमाचें भस्म ' मानस्तोके ' ह्या मंत्रानें ललाटावर, हृदयावर, बाहूंवर व मस्तकावर धारण करावें. अथवा ' त्र्यायुषं ' ह्या ऋचेनें धारण करावें. २३. कोणताही होम झाल्यावर ' ओंचमे ' ह्या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करून नमस्कार करावा, आणि होमांतील न्यूनातिरिक्त दोषाच्या परिहारार्थ दहावेळां गायत्री जप करावा, आणि विष्णूचें स्मरण करून त्यास नमस्कार करून कर्म समाप्त करावें म्हणजे संपूर्ण फलदायक कर्म होतें असें वेदवचन आहे. २४..

## याप्रमाणें प्रातरौपासनविधि [ समाप्त झाला. ]

---

## अथ प्रातरौपासनम्

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः (इति द्विराचम्य) ओं भूः ओं भुवः० स्वरोम् ॥ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातरौपासनहोमं होष्ये॥ १ ॥ चत्वारिशृंगा गौतमोवामदेवोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ अग्निमूर्तिध्याने विनियोगः ॥ २ ॥ ओं चत्वारि शृंगा त्रयोऽअस्य पादा द्वे शीर्षे सप्तहस्तासोऽअस्य ॥ त्रिधा-बद्धो वृषभोरोरवीति महोदेवो मर्त्याऽआविवेश ॥ ३ ॥ सप्त-हस्तश्चतुश्शृंगःसप्तजिह्वो द्विशीर्षकः ॥ त्रिपात्प्रसन्नवदनः सुखासीनः शुचिस्मितः ॥ स्वाहां तु दक्षिणे पार्श्वे देवीं वामे स्वधां तथा। बिभ्रद्दक्षिणहस्तैस्तु शक्तिमन्नं स्रुचं स्रुवम् ॥ तोमरं व्यजनं वामैर्घृतपात्रं च धारयन् ॥ मेषारूढो जटाबद्धो गौरवर्णो महौजसः ॥ धूम्रध्वजो लोहिताक्षः सप्तार्चिः सर्व-कामदः ॥ आत्माभिमुखमासीन एवं रूपो हुताशनः ॥ ४ ॥ परिसमूहनम् । परिसमूहनम् । परिसमूहनम् ॥ परिस्तरणम् पर्युक्षणम् । पर्युक्षणम् । पर्युक्षणम् ॥ (होमद्रव्यसंस्कारं कृत्वा) ॥ ५ ॥

## अथ प्रातरौपासन.

द्विवार आचमन करून प्राणायाम करावा. परमात्म्याच्या प्रीतीकरितां प्रातः-कालचा गृह्याग्निहोम करतों. हु धातु परस्मैपदी प्रसिद्ध आहे परंतु शाकल स्मृतींत संकल्पाचा आकार दाखविला आहे त्यांत ह्याचा आत्मनेपदी प्रयोग केला आहे आणि तीच्च आनुपूर्वी येथें घेतली आहे १. वैश्वदेव प्रकरणांत अर्थ लिहावयाचा आहे. २-३-४. अधोमुखकरांगुलींनीं वरच्या मेखलेवर त्रिवार उदक सिंचन करावें. मधली मे-खला दर्भांनीं आच्छादित करावी. उताण्या हातानें खालच्या मेखलेवर त्रिवार उदक प्रोक्षण करावें. (होमद्रव्याचा मूळांतल्या गृह्यपरिशिष्टांत सांगितल्याप्रमाणें संस्कार करून.) ६

विश्वानिन इति तिसृणामात्रेयोत्रसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ द्वाभ्यामर्वनेंऽत्ययोपस्थाने विनियोगः ॥ ६ ॥ ओं विश्वानिनो दुर्गहा जातवेदः ॥ ओं सिंधुनन्नावादुरितातिपर्षि ॥ ओमग्नेऽअत्रिवन्नमसा गृणानः ॥ ओमस्माकं बोध्यविता तनूनाम् ॥ ७ ॥ ओं यस्त्वा हृदाकीरिणा मन्यमानः ॥ आमर्त्यं मर्त्यो जोहवीमि ॥ ओं जातवेदो यशोऽअस्मासु धेहि ॥ ओं प्रजाभिरग्नेअमृतत्वमश्याम् ॥ ८ ॥ ओं यस्मै त्वं सुकृते जातवेदऽउलोकमग्नेकृणवः स्योनम् ॥ अश्विनं स पुत्रिणं वीरवंतं गोमंतं रयिंनशते स्वस्ति ॥ ९ ॥ ( अग्नौ तूष्णीं समिधं क्षिप्त्वा ॥ हविर्गृहीत्वा ) ओं सूर्याय स्वाहा ॥ सूर्यायेदं न मम ॥ ओंप्रजापतये स्वाहा ॥ प्रजापतय इदं न मम ॥ १० ॥ ( परिस्तरणं विसृज्य ) परिसमूहनम् । परिसमूहनम् । परिसमूहनम् ॥ पर्युक्षणम् । पर्युक्षणम् । पर्युक्षणम् ॥ ११ ॥ सूर्योनो दिवस्पात्विन्यस्य सौर्यश्चक्षुःसूर्यो गायत्री ॥ सूर्योपस्थाने विनियोगः ॥ १२ ॥ ओं सूर्योनो दिवस्पातु वातोऽअंतरिक्षात् ॥ अग्निर्नः पार्थिवेभ्यः ॥ १३ ॥ उदुत्यं काण्वः प्रस्कण्वः सूर्योगायत्री ॥ सूर्योपस्थाने विनियोगः ॥ १४ ॥ ओमुदुत्यं जातवेदसं देवं वहंति केतवः ॥ दृशे विश्वाय सूर्यम् ॥ १५ ॥ चित्रं देवानामांगिरसः कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ सूर्योपस्थाने विनियोगः ॥ १६ ॥ ओं चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः ॥ आप्राद्यावा पृथिवीऽअंतरिक्षं सूर्यऽआत्माजगतस्तस्थुषश्च ॥ १७ ॥ नमोमित्रस्येति सौर्योभितपाः सूर्योजगती ॥ सूर्योपस्थाने विनियोगः ॥ १८ ॥ ओं नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महोदेवाय तदृतं सपर्यत ॥ दूरे दृशे देवजाताय केतवे दिवस्पुत्राय सूर्याय शंसत ॥ १९ ॥

वैश्वदेवांत अर्थ लिहावयाचा आहे. ६-७-८-९ (अग्नीवर अमंत्रक समिध देऊन, हविर्द्रव्य घेऊन) सूर्यास आहुति देतों. ही आहुति सूर्यास प्राप्त असो हिच्यावर माझी सत्ता नाहीं. पूर्ववत् १०. (मेखलेचे आच्छादन केलेले दर्भ काढून) पूर्वीसारखें उदकाचें सिंचन व प्रोक्षण करावें ११. सौरांत अर्थ लिहावयाचा आहे. १२-१३-१४-१५-१६-१७-१८-१९.

प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापति स्त्रिष्टुप् ॥ प्रजापत्युपस्थाने विनियोगः ॥२०॥ ओं प्रजापते नत्वं देतान्यन्यो विश्वा जातानि परिता बभूव ॥ यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तुवयं स्याम पतयोरयीणाम् ॥२१॥ तंतुं तन्वं देवा अग्निर्जगती ॥ अग्न्युपस्थाने विनियोगः ॥२२॥ ओं तंतुं तन्वन्रजसो भानुमन्विहि ज्योतिष्मतः पथोरक्षधियाकृतान् । अनुल्बणं वयत जोगुवामपो मनुर्भवजनया दैव्यं जनम् ॥ २३ ॥ हिरण्यगर्भ इत्यस्य हिरण्यगर्भः प्रजापति स्त्रिष्टुप् ॥ प्रजापत्युपस्थाने विनियोगः ॥२४॥ ओं हिरण्यगर्भःसमवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ॥ सदाधारपृथिवीं द्यामुते मां कस्मै देवाय हविषा विधेम । २५ ॥ मानस्तोकेति कुत्सो रुद्रो जगती ॥ विभूतिग्रहणे विनियोगः ॥ २६ ॥ ओं मानस्तोके तनये मान आयौ मानो गोषुमानोऽअश्वेषुरीरिषः ॥ वीरान्मानो रुद्रभामितोवधीर्हविष्मंतः सदमित्वाहवामहे ॥ २७ ॥

ह्या मंत्राचा हिरण्यगर्भ ऋषि, प्रजापति देवता, त्रिष्टुप छंद आणि प्रजापतीच्या उपस्थानाकडे उपयोग. २० हे प्रजापति देवा, हीं सर्व सृष्ट झालेलीं जगतें आहेत त्यांचें निर्माण करणारा तुझ्याहून अन्य कोणी नाहीं. आम्ही ज्या फलाच्या इच्छेनें तुला हविर्द्रव्य देतों तें फल आम्हांस प्राप्त होवो. आणखी आम्ही श्रीमंत होऊं. २१ ह्या मंत्राचे देव ऋषि, अग्निदेवता, जगती छंद व अग्नीच्या उपस्थानाकडे उपयोग. २२. हे अग्ने, यज्ञाचा विस्तार करीत लोकास प्रकाशित करणाऱ्या सूर्यामध्यें किरण रूपानें प्रवेश कर, आणि कर्मानें संपादित केलेले स्वर्गाचे मार्ग रक्षण कर. आणखी तो अग्नि स्तुति करणाराचें कर्म दोषरहित करो. हे अग्ने, तूं मान्य हो आणि देवसमुदाय यज्ञास येईल असें कर. २३. ह्या मंत्राचा हिरण्यगर्भ ऋषि, प्रजापति देवता, त्रिष्टुभ छंद आणि प्रजापतीच्या उपस्थानाकडे उपयोग. २४ सर्व सृष्टीच्या पूर्वीं हिरण्यगर्भ प्रजापति उत्पन्न झाला, आणि सर्व प्राणिमात्राचा ईश्वर झाला, आणि तो अंतरिक्ष, स्वर्ग व पृथिवी धारण करतो, त्या प्रजापति देवाला हविर्भागानें आम्ही पूजित करतों. २५.

त्र्यायुषं जमदग्नेरिति ललाटे ॥ कश्यपस्य त्र्यायुषमितिकंठे अगस्त्यस्य त्र्यायुषमिति नाभौ। यद्देवानां त्र्यायुषमिति दक्षिण-स्कंधे ॥ तन्मेऽअस्तु त्र्यायुषमिति वामस्कंधे ॥ सर्वमस्तु शता-युषमिति शिरसि ॥ २८ ॥ ओंचमेस्वरश्चमेयज्ञोपचते नमश्च ॥ यत्ते न्यूनं तस्मैत उपयत्तेतिरिक्तं तस्मै ते नमः ॥ २९ ॥ स्वस्ति श्रद्धां मेधां यशः प्रज्ञां विद्यां बुद्धिं श्रियं बलम्। आयुष्यं तेज आरोग्यं देहि मे हव्यवाहन ॥३०॥ प्रमादात्कुर्वतां कर्म प्रच्य-वेताध्वरेषु यत् ॥ स्मरणादेव तद्विष्णोः संपूर्णं स्यादिति श्रुतिः ॥ ३१ ॥ अनेन प्रातरौपासनहोमाख्येन कर्मणा भग-वान् श्रीपरमेश्वरः प्रीयतां न मम॥ ओं तत्सद्ब्रम्हार्पणमस्तु॥३२॥

## इति प्रातरौपासनम्.

---

वैश्वदेवांत अर्थ लिहावयाचा आहे. २६-२७-२८-२९-३०. अनुष्ठानामध्यें कर्म करणाराच्या चुकीनें जें न्यूनातिरिक्त झालें असेल तें विष्णूच्या स्मरणानेंच परि-पूर्ण होईल असें वेदवचन आहे. ३१. ह्या प्रातर्होम कर्मानें परमात्मा प्रीति करो, हें कर्म माझें नाहीं. परब्रम्हार्पण असो. ३२.

याप्रमाणें प्रातरौपासन [ सांगितलें ].

---

## अथ सौरविधिः

याज्ञवल्क्यः—हुत्वाग्नीन् सूर्यदैवत्यान् जपेन्मंत्रान् समा-हित इति

---

**याज्ञवल्क्य**—प्रातःकाळीं अग्निहोम झाल्यानंतर समाधानयुक्त चित्तानें सूर्य ज्यांची देवता आहे अशा मंत्रांचा अर्थज्ञानपुरस्सर जप करावा. १.

याप्रमाणें सौरविधि [ सांगितला ].

---

## अथ सौरः

उदुत्यमितित्रयोदशर्चस्य सूक्तस्य प्रस्कण्वऋषिः सूर्योदेवता नवानामाद्यानां गायत्रीच्छंदोऽत्यानां चतसृणामनुष्टुप्छंदः॥ चित्रं देवानामिति षडृचस्य सूक्तस्य कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ इद्रं मित्रमिति द्वयोर्ऋचोर्दीर्घतमाः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ हंसः शुचिषदित्यस्य वामदेवः सूर्योजगती ॥ यत्वा सूर्येत्यस्या अत्रिः सूर्य उष्णिक् ॥ यदद्यसूर्येत्यस्या वसिष्ठः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ उत्सूर्य इत्यादीनां तिसृणां वसिष्ठः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ उद्वेति सुभग इति सार्धपंचर्चस्य सूक्तस्य वसिष्ठः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ उदुत्यद्दर्शतमित्यादीनां तिसृणां प्रगाथः सूर्यो बृहती सतोबृहत्युष्णिहः ॥ बण्महाँ असीतिऋचोर्जमदग्निः सूर्योबृहती ॥ नमोमित्रस्येति द्वादशर्चस्य सूक्तस्याभितपाः सूर्यो जगती ॥ सूर्योनोदिवस्पात्विति पंचर्चस्य सूक्तस्य चक्षुः सूर्यो गायत्री ॥ विभ्राड् बृहदिति चतुर्ऋचस्य सूक्तस्य विभ्राट् सूर्यो जगती ॥ आयं गौरिति त्र्यृचस्य सूक्तस्य सर्पराज्ञी सूर्यो गायत्री ॥ ऋतं चेतित्र्यृचस्याघमर्षणो भाववृतोऽनुष्टुप् ॥ सवितेति ऋचोलुशः सविता त्रिष्टुप् ॥ जपे विनियोगः ॥ १ ॥

## अथ सौर.

उदुत्यं इत्यादि तेरा ऋचांच्या सूक्ताचा प्रस्कण्व ऋषि, सूर्यदेवता, आणि पहिल्या नऊ ऋचांचा गायत्री छंद व शेवटच्या चार ऋचांचा अनुष्टुभ छंद, चित्रंदेवानां इत्यादि सहा ऋचांच्या सूक्ताचा कुत्सऋषि, सूर्यदेवता व त्रिष्टुभ छंद; इंद्रं मित्रं इत्यादि दोन ऋचांचा दीर्घतम ऋषि, सूर्यदेवता व त्रिष्टुभ छंद; हंसः शुचिषुत् इत्यादि ऋचेचा वामदेवऋषि, सूर्यदेवता आणि जगतीछंद; यत्वा सूर्य इत्यादि ऋचेचा अत्रिऋषि, सूर्यदेवता व उष्णिक छंद; यदद्य सूर्य इत्यादि ऋचेचा वसिष्ठ ऋषि, सूर्य देवता व त्रिष्टुभ छंद; उत्सूर्यो इत्यादि तीन ऋचांचा वसिष्ठ ऋषि, सूर्यदेवता व त्रिष्टुभ छंद; उद्वेति सुभगो इत्यादि साडेपांच ऋचांच्या सूक्ताचा वसिष्ठ ऋषि, सूर्यदेवता व त्रिष्टुभ छंद; उदुत्यदर्श इत्यादि तीन ऋचांचा प्रगाथ ऋषि, सूर्यदेवता आणि पहिलीचा बृहती, दुसरीचा सतोबृहती व तिसरीचा उष्णिक् छंद; बण्महाँ

असि इत्यादि दोन ऋचांचा जमदग्नि ऋषि, सूर्यदेवता व बृहती छंद; नमो मित्रस्य इत्यादि बारा ऋचांच्या सूक्ताचा अभितप ऋषि, सूर्यदेवता व जगती छंद; सूर्यो नो दिवस्पातु इत्यादि पांच ऋचांच्या सूक्ताचा चक्षुनामक ऋषि, सूर्यदेवता व गायत्री-छंद; विभ्राड्बृहद् इत्यादि चार ऋचांच्या सूक्ताचा विभ्राट् ऋषि, सूर्यदेवता व जगती छंद; आयंगौः इत्यादि तीन ऋचांच्या सूक्ताची सर्पराज्ञी नांवाची ऋषिका, सूर्यदेवता व गायत्री छंद; ऋतं च सत्यं इत्यादि तीन ऋचांचा अघमर्षण ऋषि, भाववृतसंज्ञक सूर्यपरमात्मा देवता व अनुष्टुभ छंद आणखी सविता इत्यादि ऋचेचा लुश ऋषि सूर्यदेवता व त्रिष्टुभ छंद आणि ( या ) सर्व मंत्रांचा जपाकडे उपयोग १.

(१) ओमुदुत्यं जातवेदसं देवं वहंति केतवः। दृशे विश्वाय सूर्यम् ( २ ) अपत्ये तायवो यथा नक्षत्रायं त्यक्तुभिः। सूराय विश्वचक्षसे ( ३ ) अदृश्रमस्य केतवो विरश्मयो जनाँऽअनु । भ्राजंतोऽअग्नयो यथा ( ४ ) तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्कृदसि सूर्य। विश्वमाभासि रोचनम् ( ५ ) प्रत्यङ् देवानां विशः प्रत्यङ्ङुदेषि मानुषान् । प्रत्यङ् विश्वं स्वर्दृशे ॥१ ॥

( १ ) सूर्याचे अश्व सर्व लोकांच्या दर्शनाकरितां त्या सर्व साक्षी सूर्यदेवास ऊर्ध्ववहन करतात. ( २ ) सर्व प्रकाशक सूर्यास पाहून रात्रीसहवर्तमान नक्षत्रें चोरांसारखें पलायन करतात. ( ३ ) जसें देदीप्यमान अग्नि प्रकाश करतात तसें, ह्या सूर्याचे ज्ञानदाते किरण जनांस अनुक्रमानें प्रकाशित करतात. ( ४ ) हे सूर्या, तूं उपासकांचें रोगांपासून तारण करणारा, सर्वांनीं प्रायश्चित्तादिकांकरितां अवलोकनीय व स्वयंप्रकाश अथवा चंद्रादिकांस प्रकाशविणारा आहेस; म्हणून सर्व सुशोभित अंतरिक्षास आसमंतभागीं प्रकाशित करतोस. दुसरा अर्थ—हे सूर्या म्हणजे अंतर्यामित्वेंकरून सर्वांस प्रेरणा करणाऱ्या परमात्म्या, तूं भक्तांस संसारापासून तारणारा, म्हणून सर्व मुमुक्षूंनीं त्वद्रूपाधिष्ठानजन्य साक्षात्कारानें आरोपित मायेच्या निवृत्ती करितां त्वत्कर्मकज्ञानसंपादनाविषयीं योग्य आणि सूर्यादिज्योतींचा कर्ता आहेस. असा तूं चैतन्य स्फुरणानें सर्व जगतास दीप्तिमत् ( प्रकाशित ) करतोस ( ५ ) हे सूर्या, तूं मरुत्संज्ञकदेवांच्या, मनुष्यांच्या आणि सर्व स्वर्गीच्या समोर उदय पावतोस म्हणून हे सर्व त्रिलोकवर्ती लोक तुझें संमुख दर्शन करतात. १.

(१) येना पावक चक्षसा भुरण्यं तं जनाँऽअनु । त्वं वरुण पश्यसि (२) विद्यामेषि रजस्पृथ्वहा मिमानोऽअक्तुभिः । पश्यंजन्मानि सूर्य ॥ (३) सप्तत्वा हरितो रथे वहंति देव सूर्य । शोचिष्केशं विचक्षण ॥ (४) अयुक्त सप्त शुंध्युवः सूरो रथस्य नप्त्यः । ताभिर्याति स्वयुक्तिभिः ॥ (५) उद्वयंतम सस्परि ज्योतिष्पश्यंतऽउत्तरम् । देवं देवत्रासूर्य मगन्म ज्योतिरुत्तमम् ॥ (६) उद्यन्नद्यमित्रमहऽआरोहन्नुत्तरां दिवम् ॥ हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय ॥ (७) शुकेषु मे हरिमाणं रोपणाका सुदध्मसि । अथो हारिद्रवेषु मे हरिमाणं निदध्मसि ॥ (८) उदगादय मादित्योविश्वेन सहसासह । द्विषंतं मह्यंरंधयन्मोऽअहंद्विषतेरधम् ॥ २ ॥

(१) हे सर्व शोधका अनिष्टनिवारका सूर्या, तूं ज्या प्रकाशानें जनाचें पोषण करणाऱ्या ह्या पृथ्वीस अनुक्रमानें पहातोस, त्या प्रकाशाचें आम्ही स्तवन करतों. (२) हे सूर्या, तूं रात्रिसह वर्तमान दिवसांस उत्पन्न करीत व प्राणिमात्रांस अवलोकन करीत महान अंतरिक्ष लोकांत विशेषें करून संचार करतोस. (३) हे सर्वसाक्षी सूर्यदेवा, तुझ्या ठिकाणीं तेजच केशांसारखें दिसतें अशा, रथावर बसलेल्या तुला सात अश्व वहन करतात. (४) अविच्छेदानें रथ चालविणाऱ्या सुशिक्षित सात घोड्या रथास जोडून, त्या स्वतां रथास जोडलेल्या घोड्यांच्या योगानें सूर्य गमन करतो. (५) निष्पाप, तेजस्वी व देवांमध्यें अति उत्कृष्ट अशा सूर्य देवाची आम्ही उपासना करित उत्तम सूर्यात्मक ज्योतीस प्राप्त होऊं. (६) हे सर्वांस अनुकूल प्रकाश करणाऱ्या सूर्या, ह्या कालीं उदय करीत (उगवत) सुंदर अंतरिक्षावर समोर आरोहण करून माझ्या हृदय संबंधी रोगाचें आणि बाह्यकांतिहरणकरणाऱ्या रोगाचा (वैवर्ण्याचा) नाश कर. (७) माझ्या हरिम्यास म्हणजे रोगजन्यविवर्णभावास शुक (पोपट) नांवांच्या पक्ष्यांवर व रोपणा म्हणजे सारिका (साळुंक्या) नांवांच्या पक्ष्यांवर आम्ही स्थापन करतों. आणखी माझ्या रोगजन्य वैवर्ण्यास हिरव्या रंगांच्या वृक्षांवर आम्ही स्थापन करतों. भावार्थ—हे सूर्या, तुझ्या प्रसादानें रोगजन्य हरिद्वर्ण (हिरवारंग) नाहींसा होऊन शुकादिकांवर स्वाभाविक जो हरिद्वर्ण आहे तो मात्र

असो. ( ८ ) हा पूर्वभागीं स्थित अदितीचा पुत्र सर्व बलानें युक्त असा सूर्य माझ्या उपद्रव करणाऱ्या रोगाची हिंसा करीत उदय पावला, म्हणून अनिष्ट करणाऱ्या रोगाची मी हिंसाच करीत नाहीं, कारण, सूर्यच माझ्या रोगाचा नाश करो. २

( १ ) चित्रं देवाना मुदंगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः । आप्राद्यावापृथिवीऽअंतरिक्षं सूर्यं आत्मा जगत स्तस्थुषंश्च ॥ ( २ ) सूर्यो देवी मुषसं रोचमानां मर्योन योषामभ्येति पश्चात् । यत्रा नरो देव यंतो युगानि वितन्वते प्रतिभद्राय भद्रम् ॥ ( ३ ) भद्राऽअश्वा हरितः सूर्यस्य चित्राऽएतग्वाऽ अनुमाद्यासः । नमस्यंतो दिवऽआपृष्ठमस्थुः परिद्यावा पृथिवीयंति सद्यः ॥

( १ ) मित्र ( सूर्य ), वरुण, अग्नि एतदुपलक्षित जनांच्या चक्षुरिंद्रियस्थानास ज्यानें प्राप्त होऊन स्वर्ग, पृथिवि व अंतरिक्ष आसमंतभागीं व्याप्त केलें, असें सर्व प्रेरक सूर्याच्या तेजोरूप किरणांचें समुदायात्मक आश्चर्यकारक मंडळ उदय पावलें, अशा मंडळामध्यें निवास करणारा सूर्य परमात्मा स्थावर जंगमात्मक सृष्टीचा आत्मा होय. ( २ ) ज्याप्रमाणें एखादा मनुष्य सुंदर स्त्रीस निरंतर अनुगत होतो, त्याप्रमाणें सूर्य क्रीडादिगुणांनीं युक्त, सुशोभित अशा उषोवेळेच्या ( प्रभातकाळाच्या ) पश्चात् अनुगत होतो. जी उषोवेळा झाली असतां, द्योतमान सूर्याच्या यजनाच्या इच्छेनें यज्ञ करणारे यजमान नियमितकालसाध्य अग्निहोत्रादि कर्मे विस्तृत करतात. दुसरा अर्थ—जी उषोवेळा झाली असतां, यज्ञ करणारे पुरुष धान्यादिकांच्या इच्छेनें कर्षणाकरितां ( नागरण्याकरितां ) युगें ( हलावयव, जोखडें ) प्रसारित करतात. अशा उषोवेळेस अनुगत होणाऱ्या कल्याणरूप सूर्याची कल्याणकारक कर्माच्या फळासाठीं आह्मीं स्तुति करतों. तिसरा अर्थ—सूर्यदेवाच्या प्राप्तीची इच्छा करणारे पुरुष पत्नीसहवर्तमान, कल्याणात्मक अग्निहोत्रादि कर्मास कल्याणरूप तत्फल प्राप्तीकरितां प्रत्येक उषोवेळा झाली असतां विस्तृत करतात. (३) 'क्षेमकरचपल हरितः' म्हणजे वहन करणारे चित्रवर्ण अनुक्रमित स्तुतीनें प्रहर्षित करावयास योग्य असे सूर्याचे मार्ग गमन करणारे अश्व आह्मीं नमस्कृत केले असतां आकाशाच्या पूर्वदिशोपलक्षित पृष्ठावर प्राप्त होऊन स्वर्ग व पृथिवींचें एक दिवसानें परिक्रमण करतात. दुसरा अर्थ—भद्रादिलक्षणयुक्त हरितः म्हणजे उदकादिरसांचें हरण करण्याविषयीं ज्यांचे शील आहे असे सूर्याचे किरण आकाश पृष्ठावर प्राप्त होऊन स्वर्गपृथिवींचें एक दिवसानें परिक्रमण करतात.

(४) तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्याकर्तोर्विततं संजभार ।
यदेदयुक्तहरितः सधस्थादा द्रात्री वासस्तनुतेसिमस्मै ( ५ )
तन्मित्रस्य वरुणस्याभिचक्षे सूर्योरूपं कृणुते द्योरुपस्थे । अनंत-
मन्यद्रुशदस्यपाजः कृष्णमन्य द्धरितः संभरंति ( ६ )
अद्यादेवाऽउदिता सूर्यस्य निरंहसः पिपृतानिरवद्यात् । तन्नो
मित्रो वरुणोमामहंतामदितिः सिंधुः पृथिवीऽउतद्यौः ॥ ३ ॥

(४) सूर्याचें तेंच स्वातंत्र्य आणि तेंच महत्व होय कीं जें आपलें विस्तृत केलेलें रश्मिजाल कृष्यादि कर्म होत असतां मध्येंच अस्तंगत होऊन उपसंहृत करतो. अर्थांतच सूर्य अस्तंगत झाल्यामुळें कृष्यादि कर्म करणारास परतंत्रपणानें अर्धवट काम सोडावें लागतें. आणखी, सूर्य ज्या काळीं ह्या पृथिवी लोकापासून स्वकीय किरणांचा उपसंहार करून दुसऱ्या ठिकाणीं संयुक्त करतो, त्यानंतरच रात्रिरूपवस्त्र ( अंधकार ) सर्व लोकांवर विस्तृत होतें ( पसरतें. ). ( ५ ) सूर्य परमात्मा, मित्रवरुणोपलक्षित जगताच्या समोर आकाशाच्यामध्यें प्रकाश करतो. ह्या सूर्याचे किरण अपारस्वच्छ अंधकाराचें निवारण करण्याविषयीं समर्थ असें दिवसांत स्वकीय गमनानें तेज उत्पन्न करतात, आणि रात्रीं स्वकीयापगमनानें ( आपलें गमन न झाल्यामुळें ) अंधकार उत्पन्न करतात. ( ६ ) अहो द्योतमान सूर्य किरणांनो, ह्या काळीं सूर्याचा उदय झाला असतां वेगानें इकडे तिकडे प्रसरण करणारे तुह्मी आमचें पापापासूनच संरक्षण करा. मित्र म्हणजे हिंसेपासून रक्षण करणारा दिवसाभिमानी देव, वरुण म्हणजे अनिष्टा-पासून रक्षण करणारा रात्र्यभिमानी देव, अदिति म्हणजे अखंडनीया अदिति नावाची देवमाता, सिंधु म्हणजे वहनशील उदकाभिमानी देव, पृथिवी म्हणजे भूलोकाधिष्ठात्री देवता आणि द्यौ म्हणजे स्वर्गाभिमानी देवता, हे सहा देव ‘ आमचें संरक्षण करा ’ असें जें आह्मी बोललों तें आमचें वचन मान्य करोत. ३.

( १ ) इंद्रं मित्रं वरुण मग्निमाहुरथो दिव्यः ससुपर्णो
गरुत्मान् । एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वान-
माहुः

( १ ) ह्या आदित्यास इंद्र, मित्र, वरुण, अग्निदेव असें म्हणतात. आणखी दिव्य असा उत्तम उड्डाण करणारा गरुत्मान नावाचा (गरुड) पक्षीही हाच आदित्य

होय. आदित्य हा एकच वस्तु असतां देवतातत्त्ववेत्ते विप्र कार्यकारणपरत्वें अनेक प्रकारानें इंद्रायात्मक असें त्यास म्हणतात. आणखी ह्या आदित्यास वृष्ट्यादिकांस कारणभूत विद्युत्संबंधी अग्नि, यम आणि अंतरिक्षांत संचार करणारा वायु असें म्हणतात.

(२) कृष्णं नियानं हरयः सुपर्णाऽअपो वसाना दिव मुत्पतंति । तऽआववृत्रन्त्सदना दृत्रस्यादिद्धृतेन पृथिवी व्युद्यते ॥ (३) हंसः शुचिषद्वसुरंतरिक्ष सद्धोता वेदिषद तिथिर्दुरोणसत् । नृषद्वरसदृत सव्द्योमसद ब्जागोजाऽऋतजाऽ अद्रिजाऽऋतम् ॥ (४) यत्वा सूर्यस्वर्भानुस्तमसा विंध्यदा- सुरः । अक्षेत्र विद्यथामुग्धो भुवनान्यदीधयुः ॥ ४ ॥

(२) शोभन संचार करणारे सूर्यकिरण कृष्ण वर्ण निरंतर गमन करणाऱ्या मेघास उदकांनीं पूर्ण करीत स्वर्गलोकाच्या उद्देशानें वर गमन करतात ते किरण उद- काचें स्थानभूत जें सूर्यमंडळ त्या पासून वृष्टिरूपानें अधोभागीं आगमन करतात त्याच- वेळीं त्या उदकानें पृथिवी आर्द्र होते. (३) सर्वदा गमन करणारा, स्वर्गावर रहा- णारा, अंतरिक्षांत संचार करणारा असा सर्वांचा जीवनभूत वायु, सर्व देवांस आव्हान करणारा वेदीमध्यें रहाणारा गार्हपत्यादि अग्निरूप, अतिथीसारखा सर्वदा पूज्य, गृहांत रहाणारा पाकादिकांस साधनभूत लौकिकाग्नि, मनुष्यांत चित्स्वरूपानें रहाणारा, श्रेष्ठसूर्यमंडळांत रहाणारा, ऋत म्हणजे सत्य अथवा ब्रह्मयज्ञ ह्यांत रहा- णारा वेदादिमय, आकाशांत रहाणारा वायु, उदकांत झालेला विद्युतादिरूप वाड- वाग्नि, किरणांत झालेला, इंद्रादिकां सारखा परोक्ष नाहीं असा सर्वांनीं दृश्यमान सत्यजात, उदयाचलावर झालेला, असा अनेक रूपांनीं दृश्यमान आदित्य हा त्रिकाला- बाध्य ब्रह्म होय. (४) हे सूर्या, जेव्हां तुला असुरीपुत्र स्वर्भानुनामक असुर अंधकारानें आवृत करतो तेव्हां ज्यांतील लोक आपापलें स्थान न जाणतां मूढा- सारखा होतो अशीं सर्व भुवनें दिसतात. ४.

(१) यदद्य सूर्य ब्रवोनागाऽउद्यन्मित्राय वरुणाय सत्यम् । वयं देवत्रादिते स्याम तव प्रियासोऽअर्यमन्गृणंतः ॥

(१) हे अदितिनंदना सूर्या, उदय पावणारा असा तूं आज अनुष्ठानकाळीं देवांमध्यें जर आह्मांस अनपराधी (हे निष्पाप आहेत) असें म्हणशील तर मित्रा-

कडे आणि वरुणाकडे आह्मी निश्चयानें निरपराधी होऊं. आणखी हे अर्यम्या (दात्या) सूर्या, सर्व देवांमध्यें तुझी स्तुति करीत असतां आम्ही तुझे प्रिय होऊं.

(२) उत्सूर्यो॑ बृहद॒र्चींष्य॑श्रेत्पु॒रु॒विश्वा॒जनि॑म॒मानु॑षाणाम् ।
स॒मो दि॒वाद॑दृशे॒ रोच॑मान॒: क्रत्वा॑कृत॒: सुकृ॑त॒: क॒र्तृभि॑र्भूत् ॥
( ३ ) सस॑र्यप्र॒ति पु॒रोन॒ऽउद्गा॑ऽए॒भिः स्तोमे॑भिरेत॒शे भि॒रेवै॑: ॥
प्रनो॑ मि॒त्राय॒ वरु॑णाय वो॒चोना॑गसोऽअर्य॒म्णेऽअ॒ग्नये॑ च ॥
(४) विन॑: स॒हस्रं॑ शु॒रुधो॑रदन्त्वृ॒तावा॑न॒ो वरु॑णो मि॒त्रोऽअ॒ग्निः।
यच्छ॑न्तु च॒न्द्रा उ॑प॒मन्नो॑ऽअ॒र्कमा॒न॒: काम॑ पूपुर॒न्तु॒स्तवा॑ना: ॥ ५ ॥

( २ ) सूर्य मनुष्यजनांवर दिवसां महान पुष्कळ ते जें स्थापन करतो, आणि प्रकाश पाडीत असतां प्रत्येक पुरुषास एक सारखा दिसतो. असा प्रकाश करणारा सूर्य प्रजापतीनें संपादित करून स्तुतींनीं तीव्र केला आहे. ( ३ ) हे प्रसिद्ध सूर्या, तूं ह्या स्तुत्य शुक्लवर्ण ( पांढरे ) गमनशील अश्वांच्या योगानें आमच्याकडे समोर उदयाला पाव, आणि मित्रास, वरुणास, अर्यमादेवास व अग्नीस आह्मी ( स्तुति करणारे ) निष्पाप आहों असें सांग. ( ४ ) हे सूर्या तुझ्या आज्ञेनें वरुण, मित्र व अग्नि हे सत्यसंपन्न होऊन आह्मांस हजारों शुरुधः म्हणजे शोकाचा अवरोध करणाऱ्या औषधि अथवा धनें देवोत. आणखी आल्हाद करणारे चंद्र स्तुत्य अर्चनीय सामग्री देवोत, आणि आह्मी स्तुत केले असतां आमचें अभिलषित पूर्ण करोत. ५.

( १ ) उद्वे॑ति सु॒भगो॑ वि॒श्वच॑क्षा॒: साधा॑रण॒: सूर्यो॑ मानु॑-
षाणाम् । चक्षु॑र्मि॒त्रस्य॒ वरु॑णस्य दे॒वश्चर्मे॑व॒ वि॒यः स॒मवि॑व्यक्त-
मांसि ॥ ( २ ) उद्वे॑ति प्रसवी॒ता जना॑नां म॒हान्के॒तुर॑र्ण॒वः
सूर्य॑स्य । स॒मा॒नं च॒क्रं प॑र्या॒ वि॒वृ॑त्स॒न्यदे॑त॒शो वह॑ति धू॒र्षुयु॒क्तः ॥

(१) ज्याप्रमाणें एखादा पदार्थ चामड्यानें वेष्टन केला असतां अगदीं आवृत होतो त्याप्रमाणें ज्यानें अंधकाराचें तेजाच्या योगानें वेष्टन ( आवरण ) केलें तो अत्यंत भजनीय जगद्द्रष्टा सर्व मनुष्यांस साधारण ( सारखा दिसणारा ) मित्राचा व वरुणाचा प्रकाशक सूर्यदेव उदय पावतो. ( २ ) जनांस कर्माविषयी प्रेरणा करणारा, पूज्य ज्ञान देणारा, वृष्टीच्या योगानें उदक देणारा, एक चाकाच्या रथास फिरविण्याची इच्छा करणारा ज्याचा हरितवर्ण अश्व रथधुरांस युक्त केलेला वहन करतो असा सूर्य उदय पावतो.

(३) विभ्राजमानऽउषसामुपस्थाद्रेभैरुदेत्यनुमद्यमानः । एषमेदेवः सविताचच्छंदयः समानं न प्रमिनातिधाम ॥ (४) दिवो रुक्मऽउरुचक्षाऽउदेति दूरेऽअर्थस्तरणिर्भ्राजमानः । नूनं जनाः सूर्येण प्रसूताऽअयन्नर्थानि कृणवन्नपांसि ॥ (५) यत्रा चक्रुरमृतागातुमस्मै श्येनोनदीयन्नन्वेति पाथः ॥ ६ ॥

(३) जो प्राणिमात्राविषयीं समान स्वकीय तेजस्थानास संकोचित करीत नाहीं, तो देदीप्यमान सूर्य उषःकालामध्यें स्तुतिकर्त्यांनीं प्रहर्षित केला असतां उदय पावतो, असा हा सवितादेव माझ्या इच्छेची पूर्णता करतो. (४) ज्या सूर्यानें प्रेरित केलेले लोक निश्चयानें अधिगत होऊन अनुष्ठानीय कर्में करतात, तो अंतरिक्षास तेजस्वी अलंकारभूत तारक देदीप्यमान सूर्य दूर प्रदेशीं प्राप्त असतां उदय पावतो. (५) ज्यांत अमरदेवांनीं ह्या सूर्यास जावयाकरितां मार्ग केला त्या अंतरिक्षांत हा प्रशंसनीय गमन श्येनपक्ष्यासारखें अनुक्रमण करतो. ६.

(१) उदुत्यद्दर्शतं वपुर्दिवऽएति प्रतिह्वरे । यदीमाशुर्वहति देवऽएतशो विश्वस्मै चक्षसेऽअरम् ॥ (२) शीर्ष्णः शीर्ष्णो जगतस्तस्थुषस्पतिं समया विश्वमारजः । सप्तस्वसारः सुविताय सूर्यं वहंति हरितो रथे ॥ (३) तच्चक्षुर्देवहितं शुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् ॥ ७ ॥

(१) चपल गमन करणारा कर्बुरवर्ण अश्व ज्यास जगताचें अवलोकन करावयाकरितां सत्वर वहन करतो तें दर्शनीय सूर्यमंडळ अंतरिक्षाच्या समीप उदय पावतें. (२) जंगमाचा व स्थावराचा स्वामी, रथांत बसलेला अशा सूर्यास सर्व लोकांच्या समीप तेजाची प्रेरणा करावयाकरितां स्वतांच गमन करणारे हरितवर्ण (हिरव्या रंगाचे) सात अश्व आपापल्या मस्तकांनीं वहन करतात. (३) तें सर्व प्रसिद्ध देवांस हितकारक सर्व प्रकाशक व निर्मल असें सूर्यमंडळ उदय पावतें, तत्काल निबंधन शंभर वर्षांस आम्ही पाहूं आणि शंभर वर्षेंपर्यंत आम्ही वांचूं. द्विरुक्ति आदरार्थक आहे. ७.

(१) बण्महाँऽअसि सूर्य बळादित्य महाँऽअसि । महस्ते सतो महिमापनस्यते द्धादेव महाँऽअसि ॥ (२) बट् सूर्य श्रवसा महाँऽअसि सत्रादेव महाँऽअसि । मन्हादेवानाम सुर्यः पुरोहितो विभुज्योतिरदाभ्यम् ॥ ८ ॥

(१) हे सूर्या, तूं तेजानें महान आहेस हें सत्य (आहे). हे आदित्या, तूं बलानें महान आहेस, हें सत्य. जन अशा महान शाश्वत तुझ्या महिम्याची स्तुति करतात. हे सूर्यदेवा, तूं वीर्यानें महान आहेस, हें सत्य (आहे). (२) हे सूर्या, तूं श्रवणानें (स्तुतिश्रवणकर्तृकधर्मानें) महान आहेस. हे सूर्यदेवा, तूं देवांमध्यें महिम्यानें महान, देवांस हिताचा उपदेश करणारा व असुरांचें हनन करणारा आहेस; आणि तुझें श्रेष्ठ तेज कोणींही अहिंसनीय आहे. (तुझ्या तेजास कोणीही कमीपणा आणूं शकणार नाहीं). ८.

(१) नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महोदेवाय तदृतंसपर्यत । दूरे दृशे देवजाताय केतवे दिवस्पुत्राय सूर्याय शंसत ॥ (२) सामा सत्योक्तिः परिपातु विश्वतो द्यावा च यत्र ततनन्नहानि च । विश्वमन्यान्निविशते यदेजति विश्वाहापो विश्वाहोदेति सूर्यः ॥ (३) नतेऽअदेवः प्रदिवोनिवासते यदेतशेभिः पतरैरथर्यसि । प्राचीनं मन्यदनुवर्तते रजऽउदन्येन ज्योतिषायासि सूर्य ॥

(१) हे ऋत्विजांनो, तुह्मी मित्रदेवास व वरुणास प्रकाश करणारा, श्रेष्ठ, द्योतमान, दूर असणाऱ्या पदार्थांसही अवलोकन करणारा, देवांमध्यें झालेला, सर्वांस ज्ञान देणारा, आकाशपुत्र (आकाशांत उदय पावतो म्हणून पुत्रासारखा), अशा सूर्यास नमस्कार करून त्यानें विहित केलेल्या यज्ञादिकर्मांची पूजा करा आणि स्तुतिही करा. (२) ज्या सत्योक्तीनें ज्या प्रदेशांत स्वर्ग, पृथिवी आणि दिवस रात्री विस्तृत झाल्या त्या प्रदेशांत सर्व प्राणिमात्र विश्रांति करतात, आणि तें प्राणिमात्र चलन करतात, आणि नेहमीं उदकें स्रवण करतात व सर्वदा सूर्य उदय पावतो ती सत्योक्ति माझें चहूंकडून रक्षण करो (३) हे सूर्या, जेव्हां तूं गमनशील अशा अश्वांशीं रथ जोडण्याची इच्छा करतोस, आणि तुझी प्राचीन अन्य जलरूप चंद्रात्मकज्योति तुझ्याशीं अनुगत होते, आणि तूं दुसऱ्या सूर्यमंडलात्मकज्योतीनें उदय पावतोस तेव्हां तुझ्याजवळ पुरातन (बलादिकानें वाढलेला) असुर रहात नाहीं.

( ४ ) येन सूर्य ज्योतिषा बाधसे तमो जगच्च विश्वमुदियर्षि भानुना । तेनास्मद्विश्वामनिरामनाहुतिमपामीवामपदुष्वप्न्यं सुव ॥ ( ५ ) विश्वस्य हि प्रेषितो रक्षसि व्रतमहेळयन्नुचरसि स्वधाऽअनु । यदद्य त्वा सूर्योपब्रवामहै तन्नो देवाऽअनुमंसीरत क्रतुम् ॥ ( ६ ) तन्नो द्यावापृथिवी तन्नऽआपऽइंद्रः शृण्वंतु मरुतो हवं वचः । माशूनेभूम सूर्यस्य संदृशि भद्रं जीवंतो जरणामशीमहि ॥ ९ ॥

( ४ ) हे सूर्या, तूं ज्या तेजानें अंधकाराचें निवारण करतोस, आणि ज्या तेजानें सर्व जग जागृत करतोस, त्या तेजानें आह्मांपासून अन्नांचा अभाव (अन्नदरिद्र), आहुतींचा अभाव ( यज्ञाकरणरूप आळस ) व रोग ह्या सर्वांस दूर घालीव. आणखी दुःस्वप्नजन्य अरिष्टास दूर घालीव. ( ५ ) हे सूर्या, तुझी प्रेरणा (कार्याविषयीं प्रार्थना) केली असतां तूं अनादर न करतां सर्व यज्ञकर्त्यांचें यज्ञकर्म यज्ञविध्वंसक राक्षसांपासून रक्षण करतोस आणि होम झाल्यावर ऊर्ध्व गमन करतोस; म्हणून जेव्हां आज तुला आह्मी प्रार्थनापूर्वक सांगूं तेव्हां तुझ्या प्रेरणेनें इंद्रादिदेव आमच्या त्या यज्ञकर्मास मान्य करोत. ( ६ ) सूर्याचें उत्तम दर्शन झालें असतां स्वर्ग, पृथिवी, उदक, इंद्र व वायु हे सर्व आमचें तें ( यज्ञांत करूं तें ) आव्हानवचन व तें स्तुतिवचन श्रवण करोत; आणखी आह्मी अत्यंत दुःखी न होतां कल्याणानें चिरकाल वांचून अमरत्वास प्राप्त होऊं. ९.

( १ ) विश्वाहा त्वा सुमनसः सुचक्षसः प्रजावंतोऽअनमीवाऽअनागसः । उद्यंतं त्वा मित्रमहो दिवे दिवे ज्योग्जीवाः प्रति पश्येम सूर्य ॥ ( २ ) महि ज्योतिर्बिभ्रतं त्वा विचक्षण भास्वंतं चक्षुषे चक्षुषे मयः । आरोहंतं बृहतः पाजसस्परि वयं जीवाः प्रतिपश्येम सूर्य ॥

( १ ) हे मित्रदेवांनीं पूज्या सूर्या, प्रीतिकर्ते, उत्तम अवलोकन करणारे, पुत्रादियुक्त, नीरोगी व निरपराधी असे आह्मी चिरकाल जिवंत असतां दररोज नेहमीं उदय पावणाऱ्या तुला पाहूं. ( २ ) हे सर्व द्रष्टया सूर्या, सर्वांच्या नेत्रांस सुख करणारा, महान तेजास धारण करणारा, देदीप्यमान, महान उदकावर ( समुद्रावर ) आरोहण करणारा, अशा तुला आह्मी जिवंत असतां प्रत्यहीं अवलोकन करूं.

( ३ ) यस्यंते विश्वा भुवनानि केतुना प्रचरंतेनिचं विशं-तेऽअक्तुभिः अनागास्त्वेनं हरिकेश सूर्यान्हांन्हानो वस्यं-सावस्यसोदिंहि ॥ ( ४ ) शन्नोंभव चक्षसा शन्नोऽअन्हा शंभानुनाशं हिमाशं घृणेनं । यथाशमध्वञ्छम संदुरोणे तत्सूर्य द्रविणं धेहि चित्रम् ॥ ( ५ ) अस्माकं देवाऽउभयाय जन्मंने शर्मं यच्छत द्विपदे चतुंष्पदे । अदत्पिबंदूर्जयंमान माशितं तदस्मे शंयोररपो दंधातन ॥ ( ६ ) यद्वों देवाश्चकृमंजिव्हयां गुरु मनंसो वा प्रयुंतीदेवहेळनम् । अरांवायानोंऽअभिदुच्छुनायते तस्मिन्तदेनों वसवो निधेंतन ॥ १० ॥

( ३ ) हे हरित वर्ण आहेत केस ज्याचे अशा सूर्या, ज्या तुझ्या ज्ञानकर्तृ तेजानें सर्व भुवनें संचार करतात आणि अस्तमयरूपी रात्रींनीं विश्रांति करतात, तो तूं आमच्मा अनपराधाच्या योगानें अत्यंत श्रेयस्कर दिवसादिवसानें (प्रतिदिवशीं) उदय पाव. ( ४ ) हे सूर्या, तूं आमचें तेजानें कल्याण करणारा हो. दिवसानें कल्याण करणारा हो. किरणानें कल्याण करणारा हो. हिमानें (चंद्रकिरणरूप शीतानें) कल्याण करणारा हो. आणि ज्या धनाच्या योगानें मार्गांत सुख होईल व घरांत सुख होईल तें उत्तम धन आम्हांस दे. ( ५ ) अहो देवांनो, तुह्मी सूर्याच्या आज्ञेनें आमच्या द्विपद ( दोन पायांचे ) आणि चतुष्पद ( चार पायांचे=पशु ) ह्या दोन प्रकारच्या प्राणिमात्रांस सुख द्या. आणखी, जेणेंकरून आमचें पुत्रादिक प्राणिमात्र भक्षणीय पदार्थांचें भक्षण करीत व प्राशनीय पदार्थांचें प्राशन करीत बलवंतासारखें आचरण करीत असतां सुस्थित होईल असें आह्मांस रोगशांति निमित्तक सुख, विषय-योगजन्यसुख आणि निष्पापत्व द्या. ( ६ ) अहो वसुदेवांनो, आह्मीं वाणीनें अथवा मनाच्या प्रेरणेनें जो तुमचा मोठ्या मदानें अनादर केला असेल त्या अनादरजनित पापास, जो आमचा शत्रु आह्मांकडे येऊन आह्मांस दुःखित करील त्यावर स्थापन करा. १०.

( १ ) सूर्योनो दिवस्पांतु वातोंऽअंतरिक्षात् । अग्निर्नः पार्थिवेभ्यः ॥

( १ ) सूर्य आमचें स्वर्गस्थ लोकांपासून संरक्षण करो. वायु अंतरिक्षस्थ पीडां पासून रक्षण करो. अग्नि आह्मांस पृथिवीस्थ जनांपासून रक्षो.

(२) जोषासवितर्यस्यंते हरः शतं सवाँऽअर्हति। पाहि-नोंदिद्युतः पतंत्याः॥ (३) चक्षुर्नो देवः सविता चक्षुर्नऽउत पर्वतः। चक्षुर्धाताददधातुनः॥ (४) चक्षुर्नोधेहि चक्षुषे चक्षुर्विख्यैतनूभ्यः। संचेदंविचं पश्येम॥ (५) सुसंदृशं त्वा वयं प्रतिपश्येम सूर्य। विपश्येम नृचक्षसः॥ ११॥

(२) हे सर्व प्रेरक सूर्या, ज्या तुझें गमनशील तेज शेंकडो यज्ञांस योग्य होतें, तो तूं आमच्या स्तुत्यादिकांचें सेवन कर, आणि शत्रूंकडून पतन पावणाऱ्या द्योतमान शक्ति नांवाच्या आयुधापासून आमचे संरक्षण कर. (३) सवितादेव आम्हांस चक्षुरिंद्रिय देवो. पर्वतदेव आम्हांस चक्षु देवो, आणि धाता म्हणजे द्वादशादित्यांतःपाती देव आम्हांस चक्षु देवो. (४) हे सूर्या, आम्हांस तूं अवलोकन करावयाकरितां चक्षुरिंद्रिय दे, म्हणजे नाना प्रकारच्या अनेक विषययुक्त या जगास आम्हीं पाहूं. आणखी, आमच्या शरीरांच्या प्रकाशनाकरितां तुझा प्रकाश कर. (५) हे सूर्या, अत्यंत सर्व द्रष्टया तुला आम्ही प्रत्येक अवलोकन करूं आणि मनुष्यांनीं दर्शनीय अशा पदार्थांस पाहूं. दुसरा अर्थ—शत्रु मनुष्यांचीं हिंसा करीत असतां आम्ही विशेष ज्ञानवंत होऊं ११.

(१) विभ्राड् बृहत्पिबतु सोम्यं मध्वायुर्दधद्यज्ञपताव विन्हुतम्। वातंजूतोयोऽअभिरक्षतित्मना प्रजाः पुपोष पुरुधा विराजति॥ (२) विभ्राड् बृहत्सुभृतं वाजसातमं धर्मं दिवो धरुणे सत्यमर्पितम्। अमित्रहा वृत्रहादस्युहंतमं ज्योतिर्जज्ञेऽअसुरहा सपत्नहा॥

(१) जो सूर्य वायूनें प्रेरित केला असतां स्वयमेव जगतास अवलोकन करून रक्षण करतो, पर्जन्याच्या योगानें प्रजांचे पोषण करतो आणि बहुत प्रकारांनीं प्रकाशतो; तो देदीप्यमान सूर्य यज्ञ करणारास रोगादि अपमृत्युरहित आयुष्य देत असतां सोमवल्लीसंबंधी विपुल मधु प्राशन करो. (२) देदीप्यमान, प्रौढ, विपुल, बल देणारें, स्वर्गाच्या धारण करणाऱ्या दिव्य सूर्यमंडळांत स्थापन केलेलें, अविनाशि, अप्रियांचा नाश करणारें, निरोध करणारांचें नाशक, चोरांचें हिंसक, असुरांचें नाशन करणारें व शत्रूंचा नाश करणारें असें सूर्यतेज प्रादुर्भूत होतें.

( ३ ) इदं श्रेष्ठं ज्योतिषां ज्योतिरुत्तमं विश्वजिद्धनजिदुच्यते बृहत् । विश्वभ्राड् भ्राजोमहि सूर्यो दृशऽउरुपप्रथे सहऽओजोऽअच्युतम् ॥ ( ४ ) विभ्राजन् ज्योतिषा स्व१र गच्छोरोचनं दिवः । येनेमाविश्वा भुवनान्या भृता विश्वकर्मणा विश्वदेव्यावता ॥ १२ ॥

( ३ ) जें हें सूर्यतेज, अत्यंत प्रशंसनीय ग्रहनक्षत्रांदिकांस प्रकाशित करणारें म्हणून उत्तम सर्वांचा जय करणारें धनाचा जय करणारें महान असें वेदादिकांनीं म्हटलें आहे. सर्वांस प्रकाशित करणारा देदीप्यमान महान सूर्य सर्वांच्या दर्शनाकरितां त्या विस्तीर्ण अंधकारनाशक अविनाशि तेजोबलास विस्तृत करतो ( ४ ) हे सूर्या, सर्वांच्या व्यापाराविषयीं हेतुभूत, सर्वदेवसंबंधी यज्ञाविषयीं कारणभूत, ज्यानें हीं दृश्यमान सर्व मनुष्यें आसमंतभागीं पोषित होतात, त्या तेजानें तूं सर्व जगतास प्रकाशित करणारा आकाशसंबंधी प्रियस्थानास प्राप्त होतोस. १२.

( १ ) आयंगौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः । पितरं च प्रयन्त्स्वः ॥ ( २ ) अंतश्चरति रोचनास्य प्राणादपानती । व्यख्यन्महिषोदिवम् ॥ ( ३ ) त्रिंशद्धाम विराजति वाक्पतंगाय धीयते । प्रतिवस्तोरहद्युभिः ॥ १३ ॥

( १ ) गमनशील तेजस्वी हा सूर्य उदयाचलाचें आक्रमण करून पूर्वदिशेकडे सर्वांचें निर्माण करणाऱ्या पृथिवीस प्राप्त होतो, आणि सर्वांचें पालन करणाऱ्या स्वर्गलोकास व अंतरिक्षास शीघ्र गमन करीत असतां सुशोभित दिसतो. ( २ ) ह्या सूर्याची दीप्ति प्राणवायूचें नाडीमार्गांनीं ऊर्ध्वनयन करून अधोनयन करीत असतां शरीरामध्यें मुख्य प्राणरूपानें रहाते, अशा दीप्तीनें युक्त महान सूर्य अंतरिक्षांत प्रकाशतो. दुसरा अर्थ—ह्या सूर्याची दीप्ति उदयानंतर सायंकाळीं अस्तास जात असतां स्वर्गभूमीमध्यें संचार करते, अशा दीप्तीनें महान सूर्य अंतरिक्षांत प्रकाशतो. ( ३ ) हा सूर्य तेजांनीं दिवसाच्या तीस घटिकां पर्यंत प्रकाशतो, त्या समयीं वेदवाणी त्यास संमुख करून सेवन करते हें निश्चित होय. १३.

(१) ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत। ततो रात्र्यजायत ततः समुद्रोऽअर्णवः ॥ (२) समुद्रादर्णवादधि संवत्सरोऽअजायत। अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी॥ (३) सूर्याचंद्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत्। दिवं च पृथिवीं चांतरिक्षमथो स्वः ॥ (४) सविता पश्चात्तात्सविता पुरस्तात्सवितोत्तरात्तात्सविता धरात्तात् । सविता नः सुवतु सर्वतातिं सविता नो रासतां दीर्घमायुः ॥ १४ ॥ ओम्

## इति सौरः

---

'ऋतं च' इत्यादि तीन ऋचांचा अर्थ प्रातःसंध्येंत लिहिला आहे. (पृष्ठ ७५, ७६ पहा). (४) सविता सूर्य आमच्या पश्चिमभागीं, पूर्वभागीं, उत्तरभागीं आणि अधोभागीं स्थित असतां आम्हांकडे सर्व अभिरुचित पदार्थांची प्रेरणा करो. आणखी आम्हांस चिरकाल आयुष्य देवो. पुनः पुनः सविता शब्दाचा प्रयोग स्तुतीविषयीं आदरार्थक आहे

सौर [ समाप्त. ]

---

## अथ नित्यदानविधिः

देवलः—पात्रेभ्यो दीयते नित्यमनपेक्ष्यप्रयोजनम् । केवलं त्यागबुध्द्या यद्धर्मदानं तदुच्यत इति ॥ १ ॥ भविष्यत्पुराणे—प्रतिग्रहीता द्रव्यं च कालो देशश्च पावनः । श्रद्धा च सात्विकी ज्ञेयं दानानामंगपंचकमिति ॥ २ ॥

## नित्यदानाचा विधि.

**देवल**—प्रत्युपकार, पुत्रादिप्राप्तिची इच्छा, इत्यादि कारणांवाचून केवळ स्वकीय सत्तानिवृत्तिविषयक बुद्धीनें प्रतिदिवशीं पात्रभूत (सत्पात्र) ब्राम्हणांस जें संप्रदानीय वस्तु द्यावें त्यास पुण्यसंपादक दान असें म्हणतात. १. **भविष्यपुराणांत**—प्रतिग्रह घेणारा, सत्पात्र ब्राह्मण, दानाविषयीं योग्य सुवर्णादि द्रव्य, पूर्वाण्हादि विहित काल, पवित्र स्थळ आणि सत्वगुणयुक्त आस्तिक्यबुद्धि हीं यथाशास्त्र दानांविषयीं पांच साधनें आहेत. २

याज्ञवल्क्यः—गोभूतिलहिरण्यादि पात्रे दातव्यमर्चितम् नापात्रे विदुषा किंचिदात्मनः श्रेय इच्छता ॥ ३ ॥ न विद्यया केवलया तपसा वापि पात्रता । यत्र वृत्तमिमे चोभे ताद्धि पात्रं प्रकीर्तितमिति ॥ ४ ॥ स्मृतिसंग्रहे—गत्वा यद्दीयते दानं तदनंतफलं स्मृतम् । सहस्रगुणमाहूय याचिते तु तदर्धकमिति ॥ ५ ॥ विष्णुधर्मोत्तरे—ब्राम्हणैः पूजितैर्नित्यं पूजितोऽहं न संशयः । निर्भर्त्सितैश्च निर्भर्त्स्यैतैरहं सर्वकर्मस्विति ॥ ६ ॥ षट्त्रिंशन्मते—संकीर्त्य देशकालादि तुभ्यं संप्रददे इति । न ममेति सत्तायानिवृत्तिमपि कीर्तयेत् । प्रागग्रेषु स्वयं स्थित्वा दाता च परमेश्वरम् । ध्यात्वा स्वपुण्यमुद्दिश्य दक्षिणां प्रतिपादयेत् । ब्राम्हणं प्रणिपत्याथ ततःपात्रं विसर्जयेदिति ॥७॥

**याज्ञवल्क्य**—आपलें कल्याण इच्छिणाऱ्या ज्ञात्या पुरुषानें सत्पात्र ब्राम्हणाची पूजा करून त्यास पूजित केलेला गाय, भूमि, तिळ, सुवर्ण इत्यादि दानयोग्य पदार्थ दान करावा. प्रतिगृहीत वस्तूचा असदुपयोग करणाऱ्या कुपात्रास कांहींएक देऊं नये. ३ केवळ विद्येनें किंवा केवळ जपादि अनुष्ठानाचरणानें ब्राम्हण पात्रभूत होत नाहीं. ज्या ब्राम्हणामध्यें वेदशास्त्रादिकांचें ज्ञान, नित्यनैमित्तिक कर्मांचें आचरण आणि सद्वृत्त हे तीन गुण असतील त्यास पात्र असें म्हणावें. ४ **स्मृतिसंग्रहांत**—सत्पात्र ब्राम्हणाकडे आपण जाऊन जें दान द्यावें त्या दानाचें अनंत फळ प्राप्त होतें. सत्पात्र ब्राम्हणास आपणाकडे योग्य रीतीनें निमंत्रित करून जें दान द्यावें त्या दानाचें सहस्रगुणित फळ प्राप्त होतें, आणि ब्राम्हणानें याचना केल्यावर त्यास जें यथाविधि दान द्यावें त्याचें पांचशेंपट फळ मिळतें असें धर्मशास्त्रकर्ते मन्वादिक ऋषि म्हणतात. ५. **विष्णुधर्मोत्तरांत**—"(विष्णूस धर्मसंबंधी प्रश्न केला असतां त्यानें जें तद्विषयक उत्तर दिलें त्या धर्मोत्तररूप संवादांतील श्लोक) "—कोणत्याही दानयजनादि कर्मांत ब्राह्मणांची पूजा केली असतां मी ( विष्णु ) पूजित होतो, आणि ब्राह्मणांचा अपमान केला असतां माझा अपमान होतो ह्यांत संशय नाहीं. ६. **षट्त्रिंशन्मतांत**—पूर्वेस ज्यांचीं अग्रें आहेत अशा दर्भासनावर दान करणाऱ्या पुरुषानें पूर्वाभिमुख बसून आर्यावर्त गंगातीर तिथि वार नक्षत्रादि व्याप्य देशकालांचें उच्चारण करून उदकविसर्जनपूर्वक संकल्प करावा, आणि परमेश्वराचें

ध्यान करून स्वकीय पुण्यप्राप्तीच्या उद्देशानें दक्षिणासहित संप्रदानीय ( दान करण्यांत येण्याऱ्या ) पदार्थाचें ' तुभ्यं संप्रददे ' ( तुला मी सन्मानानें देतों ) असें उच्चारण करून दान द्यावें नंतर ' न मम ' ( हें माझें नाहीं ) अशा शद्बोच्चारणानें दान केलेल्या वस्तूवरील स्वकीयसत्तेच्या निवृत्तीचें स्पष्ट प्रदर्शन करून, पुनः दान घेणाऱ्या सत्पात्र ब्राम्हणास नमस्कार करून त्याचें विसर्जन करावें ७.

**वसिष्ठः—नामगोत्रे समुच्चार्य संप्रदानस्य चात्मनः । संप्रदेयं प्रयच्छंति कन्यादाने तु पुंस्त्रयमिति ॥ ८ ॥ वराहपुराणे—तोयं दद्याद्द्विजकरे दाने विधिरयं स्मृतः । सकुशोदकहस्तश्च ददामीति तथा वदेदिति ॥ ९ ॥ ब्रम्हांडपुराणे—शुचिः पवित्रपाणिश्च गृण्हीयादुत्तरामुखः । अभिष्टदेवतां ध्यायन् मनसा विजितेंद्रियः । कृतोत्तरीयको नित्यमंतर्जानु करस्तथा । दातुरिष्टमभिध्यायन् प्रगृण्हीयादलोलुप इति ॥ १० ॥**

" दानविधीचे आणखी नियम सांगतो ". **वसिष्ठ**—साधारण वस्तूचें दान कर्तव्य असतां दान कर्त्यानें आपल्या व दान घेणाराच्या नामगोत्रांचें व्याकरणनियमानें उच्चारण करून दान द्यावें, आणि कन्यादान कर्तव्य असतां आणखी पिता, पितामह, व प्रपितामह ह्यांच्या नावांचें उच्चारण करावें ८. **वराहपुराणांत**—दान द्यावयाचें असतां दात्यानें आपल्या हातावर दर्भसहित उदक घेऊन ' ददामि ' असें उच्चारण करून तें दान घेणाऱ्या ब्राह्मणाच्या हातावर द्यावें. हा शास्त्रविहित दानविधि होय. ९ **ब्रम्हांडपुराणांत**—दान घेणाऱ्यानें शुचिर्भूत, हातांत दर्भ धारण केलेला, निरंतर निंदित विषयांपासून इंद्रियांचा निग्रह करणारा, उत्तरीय वस्त्र पांघरलेला, उत्तराभिमुख मुखकेलेला, आणि दाता स्वसंतोषानें जें देईल तितक्यावरच तृप्त असणारा असा असून अंतःकरणानें अभीष्टदेवतेचें ध्यान करीत व दात्याचें अभिलषित पूर्ण होवो असें चिंतन करीत उदराच्या आणि गुडघ्यांच्या मध्यें असलेल्या हाताच्या तळव्यावरच्या मध्यप्रदेशांत असणाऱ्या अग्नितीर्थावर दात्यापासून दाननिमित्तिक उदक घ्यावें, आणि ' प्रतिगृण्हामि ' असें उच्चारण करावें. १०

गौतमः—मनसा पात्रमुद्दिश्य जलं भूमौ विनिक्षिपेत् ।
विद्यते सागरस्यांतो दानस्यांतो न विद्यत इति

इति नित्यदानविधिः

---

" प्राप्तदेशकाळीं दान घेणारा जर जवळ नसला तर दान करण्याचा विधि सांगतो. " गौतम—दानकर्त्या पुरुषानें अंतःकरणानें पात्रभूत ब्राम्हणास उद्देशून दाननिमित्तक उदकाचा भूमीवर त्याग करावा. समुद्राचा अंत आहे, परंतु कोठें, केव्हां किती व कसें दान करावें ह्याचा अंत नाहीं. कोणत्याही प्रकारानें परमात्मविषयक बुद्धीनें प्राणीमात्रावर दया होईल असें दान करावें, हें तात्पर्य होय.

याप्रमाणें नित्यदानाचा विधि [ सांगितला ]

---

## अथ नित्यदानप्रयोगः

श्रीभरतवर्षे भरतखंडे अमुक क्षेत्रे श्रीमद्भगवतो० एवं गुण विशेषण विशिष्टायां तिथौ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्राम्हणाय सुवर्णदानमहं करिष्ये ॥ तदंग ब्राम्हणपूजनं च करिष्ये ॥१॥ ओं भूर्भुवः स्वः ब्रम्हणे इदमासनम् ॥ स्वासनम् ॥ ओं भूर्भवः स्वः ब्रम्हणे इदं पाद्यं । सुपाद्यम् ॥ ओं भूर्भुवः स्वः ब्रम्हणे इदमर्घ्यं।

## नित्यदानाचा प्रयोग.

श्री भरतवर्षे०—संकल्प देवपूजेंत लिहिला आहे व अर्थही तेथेंच लिहिला आहे. श्रीपरमेश्वराच्या प्रीतीकरितां ब्राम्हणास सुवर्णदान करतों, आणि दानाच्या निमित्तानें ब्राम्हणाची पूजा करतों. १ " कोणत्याही अनुष्ठानाविषयीं मंत्राचा विधि नसेल तेथें समस्तव्याहृतिमंत्र घ्यावा असा शास्त्रीय नियम आहे म्हणून येथें ब्राम्हणाच्या पूजेकडे त्या मंत्राचा उपयोग केला आहे. ' ओं भूर्भवः स्वः ' ब्राम्हणास हें ( दिलेलें ) आसन असो. उत्तम आसन आहे. हें दान घेणाराचें उत्तर. हें पादप्रक्षालनार्थ उदक असो. उत्तम उदक आहे, हें उत्तर. हें अर्घ्य

अस्त्वर्घ्यम् ॥ ओं भूर्भुवः स्वः इदमाचमनीयम् । अस्त्वाचमनीयम्॥ओं भूर्भुवः स्वः ब्रम्हणे गंधाःपांतु। सौमंगल्यं चास्तु ॥ ओं भू॰स्वः ब्र॰ अक्षताःपांतु । आंयुष्यमस्तु ॥ ओं भू॰ ब्र॰ पुष्पाणि पांतु। सौश्रेयसमस्तु ॥ ओं भू॰ ब्र॰ तांबूलं पातु । ऐश्वर्यमस्तु ॥ ओं भूर्भुवः स्वः ब्रम्हणे दक्षिणाःपांतु । बहुधेयं चास्तु ॥ २ ॥ नमोऽस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे । सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥ सकलाराधनैः स्वार्चितमस्तु । अस्तु स्वर्चितम् ॥ ३ ॥ इदं सुवर्णदानं सदक्षिणाकं गंधादिभिरर्चितममुकप्रवरान्वितामुकगोत्रोत्पन्नोऽमुकशर्माहममुकप्रवरान्वितामुकगोत्रोत्पन्नायामुकशर्मणे तुभ्यमहं संप्रददे प्रतिगृह्यताम् न मम 'प्रतिगृण्हामि' सांगदानफलप्राप्त्यर्थमिमां दक्षिणां तुभ्यमहं संप्रददे तेन श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥

इति नित्यदानप्रयोगः

---

ह्म॰ पूजोदक असो. हें पूजोदक मी गृहीत आहे, हें उत्तर. हें आचमनाकरितां उदक असो, तसें असो. हें उत्तर. गंध म्ह॰ चंदन. पांतु म्ह॰ प्राप्त असोत अथवा ब्राह्मणाच्या घ्राणेंद्रियसंतोषाचें संरक्षण करोत. उत्तम चंदन आहेत, हें उत्तर. पुष्पें प्राप्त असोत. हीं आमच्या अत्यंत कल्याणास हितकारक आहेत, हें उत्तर. तांबूल देतों. ह्या विड्यानें आम्हांस जिव्हारंगादिसंपन्नता आहे, हें उत्तर. दक्षिणा देतों, हें दक्षिणेचें द्रव्य आमच्या पोषणाविषयीं अत्यंत कारणभूत आहे, हें उत्तर. २ "ब्राह्मण हा विराट् स्वरूप धारण करणारा परमात्माच आहे, अशा बुद्धीनें त्यास नमस्कार करावा." नमोस्त्व–अपार, सहस्रशः मूर्ति धारण करणारा, हजारों चरण, नेत्रें, मस्तकें व महाबाहु यांस धारण करणारा, हजारों संज्ञांनीं युक्त, हजारों कोट्यावधि युगात्मक कालधारण करणारा, अशा शाश्वत पुरुषास नमस्कार असो. सकला॰ सर्व प्रकारच्या पूजासामग्रींनीं उत्तम पूजा असो. ही माझी उत्तम पूजा आहे. ३ इदं—हें गंध पुष्पादिकांनीं पूजित केलेलें दक्षिणासहित दानीय सुवर्ण अमुक प्रवरयुक्त अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला अमुक नांवाचा मी अमुक प्रवरयुक्त अमुक गोत्रांत उत्पन्न झालेल्या अमुक नांवाच्या तुला देतों प्रतिग्रह कर. हें माझें नाहीं. प्रतिग्रहण करतों. हें

उत्तर. यथाविहित दानाच्या फलप्राप्तीकरितां ही दक्षिणा तुला मी देतों. ह्या दानानें परमात्मा प्रीति करो.

यात्रमाणें नित्यदानाचा प्रयोग [ सांगितला ].

---

## अथ देवपूजाविधिः

मात्स्ये—प्रातर्मध्यंदिने सायं देवपूजां समाचरेत् । अशक्तौ विस्तरेणैव प्रातःसंपूज्य केशवम्॥मध्यान्हे चैव सायं च पुष्पांजलिमपि क्षिपेत् ॥१॥ कामासक्तोऽथवा क्रुद्धः शालग्रामशिलार्चनात् । भक्त्या वा यदि वा भक्त्या कलौ मुक्तिमवाप्नुयात् ॥ शालग्रामशिलायास्तु प्रतिष्ठा नैव विद्यत इति ॥ २ ॥ कूर्मपुराणे—ब्रम्हाणं शंकरं सूर्यं तथैव मधुसूदनम् । अन्यांश्चाभिमतान्देवान् भक्त्या त्वक्रोधनोनरः । स्वैर्मंत्रैरर्चयेन्नित्यं पत्रैः पुष्पैस्तथांबुभिः ॥ ३ ॥ गृहस्थेन सदा कार्यं पंचायतनपूजनम् । ऋगंते श्लिष्टमुच्चार्य पाद्यादीनि निवेदयेदिति ॥ ४ ॥

## देवपूजेचा विधि.

**मत्स्यपुराणांत**—प्रातःकाळीं, मध्यान्हकाळीं आणि संध्याकाळीं देवांची पूजा करावी अशक्त असल्यास प्रातःकाळीं विस्तारानें पूजा करून मध्यान्हकाळीं व सायंकाळीं देवांस पुष्पांजलीचें तरी अर्पण करावें. १ कामाच्या स्वाधीन असो, अथवा क्रोधयुक्त असो, भक्तीनें किंवा भक्ती वाचूनही कलियुगामध्यें जो ब्राह्मण शालग्रामशिळेची पूजा करील तो मोक्षास जाईल. शालिग्रामशिळेंत विष्णूचा निरंतर आविर्भाव आहे, म्हणून तिचा अन्य प्रतिमासारखा प्रतिष्ठासंस्कार करण्याचें प्रयोजनच नाहीं. २ **कूर्मपुराणांत**—प्रत्यहीं मनुष्यानें इंद्रियांचा निग्रह करून ब्रह्मदेव, शंकर, सूर्य, विष्णु आणि इतर इष्टदेवता ह्यांची त्या त्या देवतेच्या मंत्रांनीं पत्रें पुष्पें, उदक इत्यादि सामग्रीच्या योगानें भक्तीनें पूजा करावी. ३ गृहस्थानें नेहमीं विष्णु, शंकर, गणेश, सूर्य व देवी ह्या पांच देवांची पूजा करावी. पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या शेवटीं देवतानामांचें द्वंद्वात्मक आश्लिष्ट उच्चारण करून पाद्यादि उपचार अर्पण करावे, हा पूजेचा प्रकार होय. ४

ब्राम्हे—ओंकारादिसमायुक्तं नमस्कारांतकीर्तनम् । स्वनाम सर्वसत्वानां मंत्र इत्यभिधीयत इति ॥ ५॥ स्कांदे—शिलाप्यामलकीतुल्या पूज्या सूक्ष्मैव या भवेत् । यथा यथा शिला सूक्ष्मा तथा स्यात्तु महत्फलम् ॥ तस्यां मां पूजयेन्नित्यं धर्मकामार्थसिद्धय इति ॥ ६ ॥ पुराणसंग्रहे—पक्वजंबूफलाकारं कुक्कुटांडसमाकृति । भुक्तिमुक्तिप्रदं चैव बाणलिंगमुदाहृतम् ॥ ७ ॥ शुंडादंडेन दंताभ्यां शोभनाभ्यामलंकृता । एकेन वाथ दंतेन रक्तबिंदुभिरन्विता । पार्श्वभागैकवदनं वक्त्राभ्यां शोभिता च या । गणेशमूर्तिः सा ज्ञेया विघ्नाद्युपविनाशनी ॥ ८ ॥ बाह्ये चाभ्यंतरे वापि चक्रद्वादशसंयुता । सूर्यमूर्तिरितिख्याता सर्वव्याधिविनाशिनी ॥ ९ ॥ गर्ते वा गर्तमध्ये वा योन्याकारेण चिन्हिता । योनेरुपरि मध्ये वा कुंडलीभूतसर्ववत् ॥ अर्धाधिका त्रिरेखाभिर्भूषिता

**ब्रह्मपुराणांत**—ज्याच्यापूर्वी प्रणव आहे व शेंवटीं ' नमः ' शब्द आहे अशा देवतेच्या चतुर्थी विभक्तियुक्त नामास मंत्र असें म्हणतात. हा सर्व देवांच्या मंत्राविषयीं नियम आहे. ५ **स्कंदपुराणांत**—शालग्रामशिळा आवळ्या एवढी लहान असेल तीच पूज्य होय, ह्या पेक्षां जितकी जितकी लहान असेल तिच्या पूजेपासून मोठें फळ प्राप्त होतें. आणखी धर्मार्थ कामाकरितांही अति सूक्ष्म शिळेंत मी (विष्णु) आहें असें समजून प्रतिदिवशीं पूजा करावी. ६ **पुराण्यवाक्यसंग्रहांत**—पिकलेल्या जांभळा एवढी आणि कोंबड्याच्या अंड्याप्रमाणें जिची आकृति आहे अशा शिळेस बाणलिंग ( शंकर ) असें म्हणतात. ह्याच्या पूजेनें उपभोग व मोक्ष प्राप्त होतो. ७ रक्तबिंदूनीं युक्त असून आणि सोंड, सुंदर असे एक किंवा दोन दात आणि बाजूस एक किंवा दोन छिद्रें असतील अशा लक्षणांनीं सुशोभित शिळेस गणेशमूर्ति असें म्हणतात. हिच्या पूजेनें विघ्नादिकांचा नाश होतो. ८ जिच्या बाहेरच्या बाजूस अथवा छिद्रांमध्यें बारा चक्रें असतील त्या शिळेस सूर्यमूर्ति असें म्हणतात. हिची पूजा केली असतां रोगांचा नाश होतो. ९ ज्या शिळेच्या खळग्यावर किंवा खळग्यामध्यें योनीसारखी आकृति असेल, आणि त्या योन्याकाराच्या ऊर्ध्वभागीं अथवा योन्याकृतीमध्यें अखंड कुंडलासारखी आकृति असेल, आणि जिचा अर्ध्यापेक्षां

या शिला शुभा । शक्तिकुंडलिनी सा तु देवानामपि दुर्लभा। शक्तिकुंडलिनीं देवीं नित्यं यः पूजयेन्नरः । इंद्रादिदुर्लभान् भोगान् भुक्त्वा निर्वाणमाप्नुयादिति ॥ १० ॥ पाद्मे—च-क्रांकमिथुनात्सार्धं शालग्रामं प्रपूजयेदिति ॥ ११ ॥ पदा-र्थादर्शे—शंभौ मध्यगते हरीनहरभूदेव्यो हरौ शंकरेभास्ये नागसुता रवौ हरगणेशाजांबिकाः स्थापिताः । देव्यां विष्णु शिवैकदंतरवयो लंबोदरे जेश्वरेनार्याः शंकरभागतोऽति सुखदा व्यस्तास्तु ते हानिदा इति ॥ १२ ॥

अधिक बाहेरचा भाग तीन रेषांनीं अलंकृत असून जी सुशोभित असेल त्या शिळेस शक्तिकुंडलिनी देवी असें म्हणतात. ही शिला देवांनाही पूजा करावयास दुर्लभ आहे; अशा शक्तिकुंडलिनीदेवीची जो मनुष्य प्रत्यहीं पूजा करील तो, इंद्रादिकां-नाही दुर्लभ अशा उपभोग्य पदार्थांचा उपभोग करून मोक्षास जाईल. १० **पद्मपु-राणांत**—दोन चक्रांकितांनीं युक्त शाळग्रामशिळेची पूजा करावी. ११ " विष्णु, शंकर इत्यादि पांच देवांमध्यें जो देव विशेषेंकरून इष्ट असेल त्या देवाची मध्यें स्थापना करून दुसऱ्यांची उपदिशांस स्थापना करावी असें सांगतो. " **पदार्थादर्श-ग्रंथांत**—शंकराची मध्यें स्थापना केली असतां ऐशानी दिशेस विष्णूची, आग्नेयी दिशेस सूर्याची, नैर्ऋति दिशेस गणपतीची आणि वायव्य दिशेस देवीची स्थापना करावी. विष्णूची मध्यें स्थापना केली असतां उपदिशांस पूर्वीच्या क्रमाप्रमाणें शंकराची, गणेशाची, विष्णूची व देवीची स्थापना करावी. देवीची मध्यें स्थापना केली तर पूर्वीप्रमाणें दिशाक्रमानें विष्णूची, शंकराची, गणेशाची, आणि सूर्याची स्थापना करावी. जर गणेशाची मध्यें स्थापना केली तर पूर्वोक्त दिशाक्रमानें विष्णूची, शंकराची, सूर्याची व देवीची स्थापना स्थापना करावी. अशी स्थापना करून पूजा केली असतां पूजकास अत्यंत सुख प्राप्त होतें, आणि ह्याहून व्युत्क्रमानें स्थापना केली असतां नाश होतो. १२

## पंचायतनें मांडण्याचा प्रकार.

पूर्वदिशा.

उत्तरदिशा

| विष्णु सूर्य | शंकर गणेश | शंकर गणेश | विष्णु शंकर | विष्णु शंकर |
| --- | --- | --- | --- | --- |
| २ ३ | २ ३ | २ ३ | २ ३ | २ ३ |
| शंकर | विष्णु | सूर्य | देवी | गणेश |
| १ | १ | १ | १ | १ |
| देवी गणेश | देवी सूर्य | देवी विष्णु | सूर्य गणेश | देवी सूर्य |
| ५ ४ | ५ ४ | ५ ४ | ५ ४ | ५ ४ |

दक्षिणदिशा

पश्चिमदिशा

तारिणीकल्पे—नत्वा गुरून् गणपतिं भूतशुद्धिं समाचरेदिति ॥ १३ ॥ व्यासः—पृथिव्या मेरुपृष्ठं तु ऋषिरित्यभिधीयते । सुतलं छंद इत्याहुः कूर्मो वै देवता स्मृता । मेरावारोहणे तस्य विनियोगः प्रकीर्तित इति ॥ १४ ॥ धर्मसारे—कलशं शंखघंटं च पाद्यार्घ्याचमनीयकम् । संपूज्य प्रोक्ष्य चात्मानं पूजासंभारमेव च । ध्यायेदभिमतां देवमूर्तिं संपूजयेत्तत इति ॥ १५ ॥ पूजासागरे—सुवासितजलैः पूर्णं सव्ये कुंभं सुपूजयेत् । कलशस्येति मंत्रेण तीर्थान्यावाहयेत्ततः ॥ १६ ॥

तारिणीकल्पांत—गणपतीस व विष्णु, शंकर, मातापितर इत्यादिकांस नमस्कार करून आसनविधीनंतर भूतशुद्धि करावी. १३. व्यास—पृथ्वीत्वया इत्यादि मंत्राचा मेरुपृष्ठ ऋषि, कूर्म देवता, सुतलं छंद, आणि मेरुभूत निर्भय आसनावर बसण्याकडे उपयोग होय. १४. धर्मसारग्रंथांत—कलशाची, शंखाची, घंटेची, पाद्योदकाची, अर्घ्योदकाची आणि आचमनीयोदकाची पूजा करून, आपणास व पूजासाहित्यास उदकानें प्रोक्षण करून, अभीष्ट देवतेचें ध्यान करून आवाहनादि उपचारांनीं पूजन करावें. १५. पूजासागरग्रंथांत—पूजाकर्त्यानें आपल्या वामभागीं देवाजवळ सुगंधयुक्त उदकांनीं भरलेला कलश स्थापन करून त्यावर कलशस्य इत्यादि मंत्रानें तीर्थांचें आवाहन करून त्याची पूजा करावी. १६.

शंखमद्भिः पूरयित्वा प्रणवेन च दक्षिणे। संपूज्य त्वंपुरेत्यादि-
मंत्रेण प्रार्थयेत्ततः ॥ १७ ॥ मम नामांकितां घंटां सुदर्शनयुतां
यदि । ममाग्रे स्थापयेद्यस्तु तस्य देहे वसाम्यहं । घंटां संपूज्य
मध्ये तु आगमार्थमिति वादयेत् ॥ १८ ॥ जलैः पाद्यादिपा-
त्राणि गायत्र्यापूर्य पूजयेदिति ॥ १९ ॥ यामले—निवेश-
येत्पुरोभागे गंधं पुष्पं च भूषणम् । दीपं दक्षिणतो दद्यात्पु-
रोवा न तु वामतः । वामतस्तु तथा धूपमग्रे वा न तु द-
क्षिण इति ॥ २० ॥ अगस्त्यसंहितायाम्—अक्षतागंधपु-
ष्पाणि स्नानपात्रे तथा त्रयम् । तथाचमनपात्रेपि दद्याज्जा-
तीफलं मुने । लवंगमपि कंकोलं शस्तनाचमनीयके । तंडुलान्
प्रक्षिपेत्तेषु द्रव्याभावे तु तत्स्मरन्निति ॥ २१ ॥ ज्ञानमाला-
याम्—महाभिषेकं सर्वेषां शंखेनैव प्रकल्पयेत् । सर्वत्रैव प्र-
शस्तोऽब्जः शिवसूर्यार्चनं विनेति ॥ २२ ॥

आपल्या उजव्या भागीं देवाजवळ स्थापन केलेल्या शंखास प्रणवमंत्रानें उदकानें भ-रून त्याची त्वंपुरा इत्यादि मंत्रानें पूजा करून प्रार्थना करावी. १७. माझ्या (विष्णूच्या) नामाक्षरचिन्हानें युक्त अथवा सुदर्शनचक्रचिन्हानें युक्त घंटेस माझ्यापुढें जो स्थापन करील त्याच्या शरीरांत विशेषें करून मी वास करीन. स्थापन केलेल्या शंखाच्या व कलशाच्या मध्यें घंटा स्थापन करून तिची आगमार्थ इत्यादि मंत्रानें पूजा करून वाजवावी. १८. पाद्यपात्रास, अर्घ्यपात्रास व आचमनीय पात्रास उदकानें गायत्री-मंत्रानें करून त्यांची पूजा करावी. १९. यामलांत--पूजाकर्त्यानें आपल्या समोर देवाजवळ गंध, फुलें व देवांचें अलंकार स्थापन करावे आणि उजव्या बाजूस अथवा समोर दीप व डाव्या बाजूस किंवा समोर धूप स्थापन करावा. ह्याहून विपरीत करूं नये. २०. अगस्त्यसंहितेंत—स्नानोदकाच्या व पाद्योदकाच्या पात्रांत जव, गंध व फुलें घालावीं. तसेंच आचमनोदकाच्या पात्रांत सुवासाकरितां जायफळ, लवंग व कंकोळ टाकावें. हीं जवादि द्रव्यें नसल्यास त्यांचें स्मरण करून त्याऐवजीं तांदूळ टाकावे. २१. ज्ञानमालेंत—शिव व सूर्य ह्या दोघांच्या पूजेवाचून सर्व देवांच्या पूजेंत शंख प्रशस्त आहे, आणि ह्या दोन देवांशिवाय सर्व देवांवर महाभिषेक शंखानेंच करावा. २२.

देवीभागवते—शंखस्य स्थापनं कृत्वा सामान्यार्घ्यं विधाय च । पूजाद्रव्याणि चास्त्रेण प्रोक्षयेन्मतिमान्नर इति ॥ २३ ॥ आग्नेयपुराणे—अर्चनं संप्रवक्ष्यामि विष्णोरमिततेजसः । यत्कृत्वा मुनयः सर्वे परं निर्वाणमाप्नुयुः ॥ आनुष्टुभस्य सूक्तस्य त्रिष्टुबंतस्य देवता पुरुषो योजगद्बीजमृषिर्नारायणः स्मृतः । प्रथमां विन्यसेद्वामे द्वितीयां दक्षिणे करे । तृतीयां वामपादे च चतुर्थीं दक्षिणे न्यसेद् । पंचमीं वामजानौ तु षष्ठीं वै दक्षिणे न्यसेत् । सप्तमीं वामकट्यां तु अष्टमीं दक्षिणे तथा । नवमीं नाभिमध्ये तु दशमीं हृदये तथा । एकादशीं कंठमध्ये द्वादशीं वामबाहुके । त्रयोदशीं दक्षिणे तु तथैवास्ये चतुर्दशीम् । अक्ष्णोः पंचदशीं चैव विन्यसेन्मूर्ध्नि षोडशीम् । एवं न्यासविधिं कृत्वा पंचांगानि समाचरेत् ॥ २४ ॥

देवीभागवतांत—पूजाविधि जाणणाऱ्या पुरुषानें शंखाची स्थापना केल्यावर सर्व पूजेस उपयोगीं पडेल इतक्या उदकाचा कलश स्थापन करून पूजेच्या सामग्रीचें 'फट्' ह्या मंत्रानें प्रोक्षण करावें. २३. अग्निपुराणांत—परमात्म्या विष्णूचा जो पूजाविधि केल्यानें सर्व ऋषि सायुज्य मोक्षास पावले तो सर्व पूजाविधि सांगतों. ज्याच्या शेवटीं त्रिष्टुभ छंदाची ऋचा आहे अशा अनुष्टुभ छंदाच्या सूक्ताचा (पुरुषसूक्ताचा) जगद्बीज पुरुष देवता व नारायण ऋषि होय. पुरुषसूक्ताच्या प्रथम ऋचेचा डाव्या हातावर न्यास (स्थापना) करावा, दुसऱ्या ऋचेचा उजव्या हातावर, तिसरीचा डाव्या पायावर, चवथीचा उजव्या पायावर, पांचवीचा डाव्या गुडघ्यावर, सहावीचा उजव्या गुडघ्यावर, सातवीचा डाव्या कमरेवर, आठवीचा उजव्या कमरेवर, नववीचा नाभीवर, दहावीचा उरावर, अकरावीचा कंठावर, बारावीचा डाव्या बाहूवर, तेरावीचा उजव्या बाहूवर, चवदावीचा मुखावर, पंधरावीचा दोन्ही डोळ्यांवर, आणि सोळावीचा मस्तकावर न्यास करावा. असा सोळा ऋचांचा न्यासविधि करून पांच उपकरणांवर न्यास करावा. २४.

ब्राह्मणोस्येत्यादिभिश्च ऋग्भिः पंचांगकल्पना । हृदयं च शिरः शिखा कवचं चास्त्रमेव च। यथा देहे तथा देवे न्यासं कृत्वा यथाविधि । एवं न्यासविधिं कृत्वा पश्चात्पूजां समारभेत् । न्यासेन तु भवेत्सोऽपि स्वयमेव जनार्दनः ॥ २५ ॥ आद्ययावाहयेद्देवमृचा तु पुरुषोत्तम् । द्वितीययासनं दद्यात्पाद्यं चैव तृतीयया ॥ अर्घ्यं चतुर्थ्यां दातव्यं पंचम्याचमनीयकम् । षष्ठ्या स्नानं प्रदेयं तु सप्तम्या वस्त्रमेव च। यज्ञोपवीत मष्टम्या नवम्या चंदनं स्मृतम् ॥ पुष्पं दशम्या दातव्यमेकादश्या तु धूपकम् । द्वादश्या दीपकं दद्यात्त्रयोदश्या निवेदनम् । चतुर्दश्या नमस्कारं पंचदश्या प्रदक्षिणाः । उद्वासनं तु षोडश्या उपचारास्तु षोडश । स्नाने वस्त्रे च नैवेद्ये दद्यादाचमनीयकम् । हुत्वा षोडभिर्मंत्रैर्दद्यात्पुष्पाणि षोडश । तच्च सर्वं जपेद्धृयः पौरुषं सूक्तमेव च । षण्मासात्सिद्धिमाप्नोति ह्येवमेव समर्चनादिति ॥ २६ ॥

तो असा--‘ ब्राह्मणोस्य० ’ ह्या ऋचेचा हृदयावर, ‘ चंद्रमा ’ ह्या ऋचेचा मस्तकावर, ‘ नाभ्या आ० ’ या ऋचेचा शिखेवर, ‘ सप्तास्या ’ ह्या ऋचेचा कवचरूपानें व ‘यज्ञेनयज्ञ’ ह्या ऋचेचा अस्त्ररूपानें न्यास करावा. आणखी जसा आपल्या शरीरावर न्यासविधि केला तसाच देवाच्या शरीरावर न्यासविधि करावा. असा आपला व देवाचा न्यासविधि झाल्यावर आवाहनादि उपचारांस आरंभ करावा. न्यासविधि केल्यानें पूजा करणारा विष्णुस्वरूप ( पूजेविषयीं अधिकारी ) होतो. २५. पुरुषसूक्ताच्या पहिल्या ऋचेनें ( पहिली ऋचा म्हणून ) विष्णूचें आवाहन करावें, दुसरीनें आसन, तिसरीनें पाद्य, चवर्थीनें अर्घ्य व पांचवीनें आचमन द्यावें. सहावीनें स्नान घालावें. सातवीनें वस्त्र, आठवीनें यज्ञोपवीत, नवमीनें चंदन व दहावीनें पुष्प द्यावें. अक्रावीनें धूपाचा सुवास द्यावा बारावीनें दीप दाखवावा. तेरावीनें नैवेद्य समर्पण करावा चवदावीनें नमस्कार करावा. पंधरावीनें प्रदक्षिणा करावी, आणि सोळावीनें विसर्जन करावें. असे सोळा उपचार आहेत. स्नान घातल्यावर, वस्त्र व यज्ञोपवीत दिल्यावर आणि नैवेद्य समर्पण केल्यावर आचमनाकरितां उदक द्यावें. लौकिकाग्नीवर पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचांनीं होम करून पुन्हा

त्यांनींच पुष्पें समर्पण करावीं, आणि पुन्हा सर्व पुरुषसूक्ताचा एकदां जप करावा. ह्या प्रमाणें सहा महिनेपर्यंत पूजा केली असतां कल्याण होतें. २६.

**स्कांदे**—शालग्रामार्चने नैव आवाहनविसर्जने । शालग्रामे हि भगवानाविर्भूतः सदा हरिरिति ॥ २७ ॥ मंत्रराजानुष्टुब्विधाने—आवाहनऋचा दद्यात्पूर्वं पुष्पांजलिं हरेः । तस्यैवोन्मुखतासिध्यै उद्वासनऋचा तथा । अंते पुष्पाजलिं दद्याद्यागसंपूर्तिसिद्धय इति ॥ २८ ॥ कूर्मपुराणे—न विष्णवाराधनात्पुण्यं विद्यते कर्म वैदिकम् । तस्मादनादिमध्यांतं नित्यमाराधयेद्धरिम् ॥ तद्विष्णोरिति मंत्रेण सूक्तेन पौरुषेण वा । नैवाभ्यां सदृशो मंत्रो वेदेपूक्तश्च पावनः । अथवा देवमीशानं भगवंतं सनातनं । आराधयेन्महादेवं भावपूतो महेश्वरम् । मंत्रेण रुद्रगायत्र्या प्रणवेनाथवा पुनः । ईशानेनाथवा रुद्रैस्त्र्यंबकेन समाहितः । तथोंनमः शिवायेति मंत्रेणानेन वा यजेदिति ॥ २९॥

" पुरुषसूक्तविधीमध्यें प्रथम ऋचेनें आवाहन व सोळाव्या ऋचेनें विसर्जन सांगितलें तें विष्णूच्या सुवर्णादि प्रतिमाविषयक होय. शालग्रामात्मक विष्णूची पूजा कर्तव्य असतां त्या दोन ऋचांनीं पुष्पांजळीचें समर्पण करावें असें सांगतो. " **स्कंदपुराणांत**—शालग्रामाची पूजाकर्तव्य असतां आवाहन व विसर्जन करूं नये. कारण, शालग्रामशिळेंत विष्णुपरमात्म्याचा निरंतर वास आहे. २७. **मंत्रराजानुष्टुभविधानांत**--शालग्रामशिलात्मक विष्णूस त्याच्या संबोधनाकरितां प्रथमतः ' सहस्रशीर्षा ' ह्या आवाहन ऋचेनें पुष्पांजलि समर्पण करावा. तसेंच शेवटीं ' यज्ञेन यज्ञ ' ह्या विसर्जन ऋचेनें पूंजापरिपूर्णतेच्या सिद्धीकरितां पुष्पांजलि द्यावा. २८. **कूर्मपुराणांत**—वेदप्रणीत कर्मांमध्येंही विष्णूच्या पूजेसारखें पुण्यकारक कर्म कोणतेंच नाहीं, म्हणून ज्यास आदि, मध्य व अंत नाहीं अशा संसारदुःख हरण करणऱ्या विष्णूचें ' तद्विष्णोः ' ह्या ऋचेनें अथवा पुरुषसूक्तानें निरंतर आराधन करावें. ह्या दोन मंत्रांसारखा पवित्र मंत्र वेदांमध्यें दुसरा नाहींच. अथवा द्योतमान, सत्ताधीश महात्मा शाश्वत देवश्रेष्ठ महेश्वराचें भक्तीनें, रुद्रमंत्रांनीं, त्र्यंबकमंत्रानें किंवा षडक्षरमंत्रानें आराधन करावें. २९.

मंत्रराजविधौ—प्रतिमापट्टयंत्राणां नित्यं स्नानं न कारयेत् । कारयेत्पर्वदिवसे यथा मलनिवारणमिति ॥ ३० ॥ नारसिंहे—वस्त्राभ्यामच्युतं भक्त्या परिवार्य विचित्रितम् । सोमलोके रमित्वा तु विष्णुलोके महीयत इति ॥ ३१ ॥ तत्वसागरे—वस्त्रमभ्युक्षणाच्छुध्येदपरं तु दिने दिन इति ॥ ३२ ॥ वाराहे—यज्ञोपवीतदानेन सुरेभ्यो ब्राह्मणाय च । भवेद्विप्रश्चतुर्वेदी शुद्धधीर्नात्र संशय इति ॥ ३३ ॥ नंदीपुराणे—अलंकारं च योदद्याद्विप्राय च सुराय च । सोमलोके रमित्वा तु विष्णुलोके महीयत इति ॥ ३४ ॥ नारदीये—सुचंदनं सकर्पूरं कुंकुमागरुमिश्रितं । तुलसीचंदनोपेतं महाविष्णोः सुखावहम् । शंखपात्रस्थितं गंधं मंत्रैर्दद्यात्कनिष्ठयेति ॥ ३५ ॥ भविष्यत्पुराणे— पुष्पैररण्यसंभूतैः । पत्रैर्वा गिरिसंभवैः । अपर्युषितनिश्छिद्रैः प्रोक्षितैर्जंतुवर्जितैः । आत्मारामोद्भवैर्वापि भक्त्या संपूजयेत्सुरान् । पूतिगंधीन्यगंधीनि

**मंत्रराजविधींत**—प्रतिमा ( मूर्ति ) पट्ट ( टाक ) व यंत्र ( श्रीयंत्रादि ) ह्यांस नित्य स्नान घालूं नये. पौर्णिमा, अमावास्या इत्यादि पर्वदिवशीं जेणेंकरून मळ जाईल अशा रीतीनें स्नान घालावें ३०. **नरसिंहपुराणांत**—विष्णूवर भक्तीनें सभोंवतीं दोन वस्त्रें चमत्कारिक वारलीं असतां ( त्या दोन वस्त्रांचा वारा घातला असतां ) सोमलोकांत व विष्णुलोकांत रममाण होऊन महत्वास प्राप्त होतो. ३१. **तत्वसागरांत**—देवाचें वस्त्र पाण्यानें प्रोक्षित केलें असतां शुद्ध होतें. फुल वगैरे मात्र नित्य नवें अर्पण करावें. ३२. **वराहपुराणांत**—जो ब्राह्मण देवांस आणि ब्राह्मणांस यज्ञोपवीत दान करील तो चार वेदांचें अध्ययन करणारा व ज्ञानवान असा होईल, यांत संशय नाहीं. ३३. **नंदीपुराणांत**—जो ब्राह्मणांस व देवांस अलंकार देईल तो सोमलोकांत व विष्णुलोकांत रममाण होऊन महत्वास पावेल. ३४ **नारदपुराणांत**—चांगलें चंदन, कापूर, केशर, अगरुचंदन आणि तुळसीकाष्ठ हे पदार्थ घासून सिद्ध केलेला गंध शंखपात्रांत (शिंपल्यांत) भरून विहित मंत्रांनीं कनिष्ठिकांगुलीनें अर्पण करावा. हा गंध महाविष्णूस प्रिय आहे. ३५. **भविष्यपुराणांत**—जीं कोमेजलेलीं, फाटलेलीं, तुटलेलीं अथवा कृमिकीटादि जंतुयुक्त नसतील अशा अरण्यांत, पर्वतावर

विशेषाविहितानि च । कृमिकीटावपन्नानि शीर्णपर्युषितानि च । स्वयंपतितपुष्पाणि त्यजेदुपहतानि च । मुकुलैर्नार्चयेद्देवमपक्वं न निवेदयेत् । फलं च कृमिबद्धं च प्रयत्नात्तद्विवर्जयेत् । अलाभे तु सुपुष्पाणां पत्राण्यपि निवेदयेत् । पत्राणामप्यलाभे तु फलान्यपि निवेदयेत् । फलानामप्यलाभे तु तृणगुल्मौषधीरपि । ओषधीनामलाभे तु भक्त्या भवति पूजितः । प्रत्येकमुक्तपुष्पेण दशसौवर्णिकं फलम् । स्रग्भिश्च नृपशार्दूल तदेव द्विगुणं भवेदिति ॥ ३६ ॥ विष्णुधर्मोत्तरे— धर्मार्जितधनक्रीतैर्यः कुर्यात्केशवार्चनम् । उद्धरिष्यत्यसंदेहात्सप्त पूर्वा स्तथा परान् । समित्पुष्पकुशादीनि वहंतं नाभिवादयेत् । तद्धरी चैव वाऽनान्यान्निर्माल्यं तद्भवेत्तयोः । देवोपरिधृतं यच्च वामहस्त धृतं च यत् । अधोवस्त्रधृतं यच्च जलेंतःक्षालितं च यत् । देवतास्तन्न गृण्हंति पुष्पं निर्माल्यतां गतम् । दवेतार्थं च कुसुममस्तेयं मनुरब्रवीदिति ॥ ३७ ॥

किंवा आपल्या बागेंत उत्पन्न झालेल्या पुष्पांचें व पत्रांचें उदकानें प्रोक्षण करून त्यांनीं भक्तीनें पूजा करावी. दुर्गंधयुक्त, सुवासरहित, विशेषेंकरून निषिद्ध, कृमिकीटादिकांनीं कुरतडून पाडलेलीं, पाकळ्या वगैरे अवयवांनीं गलित ( भग्न ) झालेलीं, शिळीं झालेलीं, आपल्या आपण पडलेलीं, व अशुचि वस्तूनें उपलिप्त अशीं फुलें देवांस अर्पण करूं नयेत. देवांस कळ्या वाहूं नयेत. अपक्व फळ अर्पण करूं नये. तसेंच ज्यांत किडे पडले असतील असें किडकें फळ अर्पण करूं नये. उत्तम फुलें न मिळाल्यास सुवासिक पत्रें अर्पण करावीं. पत्रेंहीं न मिळालीं तर फळें अर्पण करावीं. फळेंही न मिळालीं तर दूर्वादि तृणें, वल्लींच्या तंतूंचे गुच्छ ( कुटिल तंतु ), व व्रीहियवादि औषधि अर्पण कराव्या. हीं देखील मिळालीं नाहीं तर एतच्चिंतनरूप केवळ भक्तीनेंही परमात्मा पूजित होतो. हे धर्मराजा, ह्या सांगितलेल्या प्रत्येक पुष्पापेक्षां सोन्याचें फुल अर्पण केलें तर दहापट फळ प्राप्त होतें, आणि फुलांच्या माळांनीं त्याहूनही दुप्पट फळ मिळतें. ३६. विष्णुधर्मोत्तरांत—जो ब्राह्मण न्यायानें मिळविलेल्या अथवा न्यायानें मिळविलेल्या द्रव्यानें विकत घेतलेल्या गंधपुष्पादि पूजोपकरण पदार्थांनीं देवाचें पूजन करील तो आपल्या वंशांतील पूर्वींचे सात व

पुत्रपौत्रादि क्रमानें पुढले सात आणि आपण ( स्वतां ) इतक्यांचा संसारसमुद्रापासून निःसंशय उद्धार करील. समिधा, पुष्पें, दर्भ इत्यादि यजन साहित्य नेणारास दुसऱ्यानें अथवा नेणाऱ्यानें दुसऱ्यास नमस्कार करूं नये, त्या दोघांपैकीं एकानेंहीं परस्परास नमस्कार केला तर तें पुष्पादि साहित्य पूजादिकांस निरुपयोगीं होतें. जें पुष्प देवास वाहिलेलें, केवळ डाव्या हातांत घेतलेलें, नेसलेल्या वस्त्रांत ठेवलेलें किंवा पाण्यांत घालून धुतलेलें असेल तें निर्माल्य होतें म्हणून देवता घेत नाहींत, ह्या साठीं तें देवांस वाहूं नये. संकटसमयीं देवकार्या पुरतींच फुलें दुसऱ्याच्या मालकीच्या झाडापासून त्याला न कळत काढलीं तरी तें चौर्य होत नाहीं ( त्याबद्दल चोरीचा गुन्हा होत नाहीं ) असें मनूचें वाक्य आहे. ३७.

**भविष्यत्पुराणे—अपामार्गस्य प्रथमं भृंगराजमतः परम् । तस्माद्दमनकं श्रेष्ठं ततो बिल्वस्य पत्रकम् । बिल्वपत्रादपि हरे स्तुलशीपत्र मुत्तमम् । एतेषां तु यथालाभं पत्रैर्यश्चार्चयेद्धरिम् । सर्वपापविनिर्मुक्तो विष्णुलोके महीयते । विष्णुमूर्धनि विन्यस्ता तुलसीपत्रमंजरी । सुवर्णकोटिपुण्यानां पुण्यं यच्छत्यतोऽधिकमिति ॥ ३८ ॥ ज्ञानमालायाम्—न दूर्वया यजेद्देवीं बिल्वपत्रैश्च भास्करम् । उन्मत्तमर्कपुष्पं च विष्णोर्वर्ज्यं सदा बुधैरिति ॥ ३९ ॥ देवीभागवते—नाक्षतैरर्चयेद्विष्णुं न तुलस्या गणेश्वरम् । दूर्वाभिनार्चयेद्दुर्गां केतकैर्न महेश्वरमिति ॥ ४० ॥**

**भविष्यपुराणांत**—अघाडा, माका, दवणा, बेल व तुळसी ह्यांचीं पत्रें विष्णूस एकापेक्षां एक अत्यंत प्रिय आहेस. ह्या पत्रांतून जीं मिळतील त्यांच्या योगानें जो विष्णूचें पूजन करील तो सर्व पापांपासून मुक्त होऊन वैकुंठलोकांत महत्व पावेल. जो मनुष्य तुळसीची पत्रासहित मंजरी विष्णूस वाहील, त्यास विष्णु कोटिकर्ष[1]परिमित सुवर्णदानाच्या पुण्यापेक्षांही अधिक पुण्य देईल. ३८. **ज्ञानमालेंत**—विधि जाणणाऱ्या पुरुषांनीं देवीला कधींही दूर्वा वाहूं नयेत. तसेंच सूर्याला बेल वाहूं नये आणि विष्णूस धोत्र्याचें व रुईचें फुल वाहूं नये. ३९. **देवीभागवतांत**—शालग्रामास अक्षता वाहूं नयेत. तसेंच गणपतीला तुळसी, देवीला दूर्वा आणि महादेवाला केवडा वाहूं नये. ४०.

---

१ ८० गुंजांचा एक कर्ष असे कोटी कर्ष.

नांगुष्ठैर्मर्दयेद्देवं नाधः पुष्पैः समर्चयेत् । कुशाग्रैर्न क्षिपेत्तोयं वज्रपातसमं भवेदिति ॥ ४१ ॥ वामने—हिरुका कंकणं दारुमल्लिकागरुवासिताः । शंखं जातीफलं श्रीमत्प्रिया धूपा हरे रिमे ॥ ४२ ॥ घृततैलैर्विना किंचिद्दीपार्थं न समाहरेत् ॥ ४३ ॥ नैवेद्यपात्रं वक्ष्यामि केशवाय महात्मने । हैरण्यं राजतं कांस्यं ताम्रं मृन्मयमेव च । पालाशं पद्मपत्रं वा पात्रं विष्णोरतिप्रियम् ॥ ४४ ॥ हविः शाल्योदनं दिव्यमाज्ययुक्तं सशर्करम् । नैवेद्यं देवदेवाय यावकं पायसं तथा । नैवेद्यवस्त्वलाभे तु फलानि विनिवेदयेत् । फलानामप्यलाभे तु तोयान्यपि निवेदयेदिति ॥ ४५ ॥ मरीचिः—विधाय देवतापूजां प्रातर्होमादनंतरम् । गुरूक्तेन तु मार्गेण मूलमंत्रं जपेद्बुध इति ॥ ४६ ॥

देवांस स्नानादिकाच्या वेळीं अंगठ्यानें चोळूं नये. देवमूर्तीच्या चरणादि अधोभागीं पुष्पें वाहूं नयेत. देवाच्या अंगावर दर्भांनीं पाणी शिंपडलें तर त्या पाण्याचा त्यास वज्रासारखा प्रहार होतो म्हणून तसें करूं नये. ४१. वामनपुराणांत—जटामांसी, गुग्गुल, देवदार, नखला, जायफळ आणि लवंग ह्या पदार्थांचें चूर्ण मोगरा व चंदन यांच्या सुवासानें ( अत्तरानें ) सुवासित केलें असतां त्या चूर्णाचा धूप हरीस प्रिय होतो. ४२. तूप अथवा तेल ह्यांवाचून दिव्याविषयीं दुसरा स्नेहपदार्थ घेऊं नये. ४३. “ महात्म्या विष्णूकरितां नैवेद्यास पात्र कोणतें असावें तें सांगतो ”. सोनें, रुपें, कांसें, तांबें, ह्या धातूंचें पात्र, भाजलेलें मातीचें पात्र, पळसाच्या पानाचें पात्र ( पत्रावळ ) आणि कमळाचें पान हीं पात्रें यथासंभव एकाचा एक अनुकल्प अशा क्रमानें विष्णूस फार प्रिय आहेत. ४४. तांदुळांचा भात, जवनिर्मित पदार्थ, दुग्धनिर्मित पदार्थ इत्यादि प्रकारचें साखरेनें व तुपानें युक्त सुंदर हविष्य हा नैवेद्य ( निवेदनीय पदार्थ ) परमेश्वरास अर्पण करावा. हे नैवेद्य पदार्थ न मिळाल्यास त्या ऐवजीं फळें अर्पण करावीं. फळांचाही असंभव असतां नैवेद्य पदार्थांच्या भावनेनें उदक अर्पण करावें. ४५. मरीचि—ज्ञात्या पुरुषानें प्रातर्होमानंतर देवपूजा करून गुरूनें उपदेष्ट केलेल्या मार्गानें देवतेच्या मूळ मंत्राचा जप करावा. मूळ मंत्राचें लक्षण पूर्वीं सांगितलें. ४६

भविष्ये—समभ्यर्च्य पिबेद्देवान्यः पादसलिलं हरेः। सर्वपापविनिर्मुक्तः स याति परमांगतिमिति ॥४७॥ पुलस्त्यः—शालग्रामशिलावारि सोमपानं दिनेदिने । पात्रांतरेण तद्ग्राह्यं करेण सुरया सममिति ॥ ४८ ॥ अगस्त्यः—शालग्रामशिला तोयमपीत्वा यस्तु मस्तके। प्रक्षेपणं प्रकुर्वीत ब्रह्महा स निगद्यत इति ॥ ४९ ॥ स्कांदे शिव उवाच—अनर्हं मम नैवेद्यं पत्रं पुष्पं फलं जलम् । शालग्रामशिलालग्नं सर्वं याति पवित्रताम् ॥५०॥ बाणलिंगे तु चंडांशोर्न च निर्माल्यकल्पना। सर्वं बाणार्पितं ग्राह्यं भक्त्या भक्तैश्च नान्यथा । ग्राह्याग्राह्यविचारोऽयं बाणलिंगे न विद्यते। तदर्पितं जलं चान्नं ग्राह्यं प्रासाद संज्ञया । बाणलिंगे स्वयंभूते चंद्रकांते हृदि स्थिते। चांद्रायणसमं ज्ञेयं शंभोर्नैवेद्यभक्षणमिति ॥ ५१ ॥

इति देवपूजाविधिः

---

**भविष्यपुराणांत**—जो मनुष्य देवांची पूजा करून त्यांचें तीर्थ प्राशन करील तो सर्व पापांपासून मुक्त होऊन उत्तम लोकास जाईल. ४७. **पुलस्त्य**—प्रतिदिवशीं शालग्रामशिळेचें तीर्थ प्राशन करणें हें यज्ञसंबंधी सोमवल्ली प्राशनाचें फळ देणारें आहे, परंतु तें दुसऱ्या पात्रांत घेऊन प्राशन करावें, कारण, केवळ हातानें प्राशन केलें असतां जो अज्ञानानें अथवा उन्मत्तेनें तीर्थप्राशनविधीचा अनादररूप दोष होतो, तो अकार्यप्रवर्तनानें कृतकार्याच्या गुणांचाही नाश करणाऱ्या मद्यप्राशनजनित चित्तभ्रंशरूप दोषासारखा होय. ४८. **अगस्त्य**—जो मनुष्य शालग्रामशिळेचें तीर्थ प्राशन केल्याशिवाय आपल्या मस्तकावर उडवील त्यास ब्रह्मसाक्षात्कारास साधनभूत अशा पूजाविधिमार्गाचा उच्छेद करणारा असें म्हणतात तीर्थाचें प्राशन करून नंतर मस्तकावर उडवावें हें तात्पर्य ४९. **स्कंदपुराणांत**, शिव म्हणतो—मला अर्पण केलेला नैवेद्य, पत्र, पुष्प फळ, उदक इत्यादि कोणताही पदार्थ भक्तांनीं ग्रहण करण्याविषयीं अयोग्य आहे, परंतु, शालग्रामशिलसहित माझ्या चलित बाणलिंगाची पूजा केली असतां त्यास अर्पण केलेले सर्व पदार्थ ग्राह्य आहेत. ५०. चलित बाणलिंगाचा निर्माल्य चंडांशु पार्श्वगणास देऊं नये. बाणलिंगास अर्पण केलेले सर्व पदार्थ भक्तांनीं भक्तीनें घ्यावे. अन्यांनीं मात्र घेऊं नयेत. बाणलिंगाविषयीं

ग्राह्याग्राह्य विचार करूं नये. त्यास अर्पण केलेलें अन्न, उदक इत्यादि सर्व प्रसाद-रूपानें घ्यावें. स्वयंभूचलित बाणलिंगांत आविर्भूत अथवा स्फटिकावर आवाहित केलेल्या महादेवाच्या नैवेद्याचें भक्षण करणें हें चांद्रायणव्रत केल्यासारखें होय ५१.

याप्रमाणें देवपूजेचा विधि [ सांगितला ].

---

## अथ देवपूजा.

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः प्रणवस्य० ओं भूः० स्वरोम् ॥ १ ॥ श्रीमन्महागणपतये नमः ॥ लक्ष्मी-नारायणाभ्यां नमः॥ उमामहेश्वराभ्यां नमः॥ शचीपुरंदराभ्यां नमः ॥ मातापितृभ्यां नमः ॥ इष्टदेवताभ्यो नमः ॥ कुलदेव-ताभ्यो नमः॥ग्रामदेवताभ्यो नमः ॥ स्थानदेवताभ्यो नमः॥ वास्तुदेवताभ्यो नमः ॥ सर्वेभ्यो देवेभ्यो नमः ॥ सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमः ॥ आदित्यादिग्रहेभ्यो नमः ॥ २ ॥ सुमु-खश्चैकदंतश्च कपिलोगजकर्णकः । लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ॥ धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजाननः । द्वादशै-तानि नामानि यः पठेच्छृणुयादपि ॥ विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा । संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥ शुक्लांबरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजम् । प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्व विघ्नोपशांतये ॥ ३ ॥

### देवपूजा.

अर्थ लिहिला ( पृष्ठ ३९ आचमनप्रयोग पहा ). १. भगवान गजाननास नमस्कार असो. इत्यादि २. गजाननाच्या ह्या सुमुखादि बारा नावांचें विद्यांचा आरंभ, विवाह, गृहादिकांत प्रवेश, यात्रा, युद्धकरणें, अशा प्रकारचीं कार्यें कर्तव्य असतां जो मनुष्य पठन किंवा श्रवण करील त्यास विघ्न प्राप्त होणार नाहीं, आणि त्याच्या संकटाचा ( पीडेचा ) नाश होईल. म्हणून श्वेतवस्त्र धारण करणारा चंद्रप्रभ चतुर्भुज प्रसन्नमुख गजानन देवाचें सर्व विघ्नांच्या नाशाकरितां ध्यान करावें. ३.

सर्वमंगलमांगल्ये शिवे सर्वार्थसाधिके । शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोऽस्तुते ॥ ४ ॥ सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषाममंगलम् । येषां हृदिस्थो भगवान्मंगलायतनं हरिः । तदेवलग्नं सुदिनं तदेव ताराबलं चंद्रबलं तदेव । विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मीपते तेंघ्रियुगं स्मरामि ॥ ५ ॥ लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः । येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः ॥ ६ ॥ विनायकं गुरुं भानुं ब्रह्मविष्णुमहेश्वरान् । सरस्वतीं प्रणौम्यादौ सर्व कार्यार्थसिद्धये ॥ ७ ॥ अभीप्सितार्थसिध्यर्थं पूजितोयः सुरासुरैः । सर्व विघ्नहरस्तस्मै गणाधिपतयेनमः ॥८॥ सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः । देवा दिशंतु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥९॥ श्रीजंबुद्वीपे भरतवर्षे भरतखंडेऽमुकक्षेत्रे श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्याद्य ब्रह्मणोद्वितियपरार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वंतरे कलियुगप्रथमचरणे शालिवाहनशके

सर्व अत्यंत कल्याण करणारांमध्यें श्रेष्ठ, सकल मनोरथ पूर्ण करणारी, शरणागतांचें रक्षण करणारी, गौरवर्ण हे त्रिलोचन शिवशक्ति, आणि हे विष्णुशक्ति तुला नमस्कार असो. ४. मंगलस्थानभूत सर्वैश्वर्यसंपन्न विष्णूचें जे निरंतर चिंतन करतात त्यांस सर्वकालीं सर्व कार्यांमध्यें अमंगल प्राप्त होत नाहीं. हे लक्ष्मीपति विष्णु, जें मी तुझें चरणयुगुल स्मरण करतों तेंच मला लग्नबळ, वारबळ, नक्षत्रबळ, व चंद्रबळ असो. ५ नीलकमळासारख्या श्यामवर्ण विष्णूचें सर्वकाळीं जें चिंतन करतात त्यांस लाभ व जयच प्राप्त होतो. ६. गणपति, गुरु, सूर्य, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर आणि सरस्वती ह्यांचें मी सर्व कार्यांच्या सिद्धीकरितां पूर्वीं अत्यंत स्तवन करतों. ७. देवदैत्यांनीं अभिलषित पदार्थांच्या सिद्धीकरितां ज्याचें पूजन केलें, त्या सर्व विघ्नांचा नाश करणाऱ्या गजाननास नमस्कार करतों. ८. त्रिभुवनांचे ईश्वर ब्रह्मदेव, शंकर व विष्णु हे तीन देव आमचीं आरंभ केलेलीं सर्व कार्यें सिद्ध करोत. ९. जंबुद्वीपांतील भरत राजाच्या देशाच्या एका भागांत अमुक स्थळीं, श्रीभगवान परमेश्वर विष्णूच्या आज्ञेनें प्रवृत्त झालेल्या कालाच्या आज ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या द्वितीय भागांतील ज्याची मर्यादा बहुत आहे अशा श्रीश्वेतवाराहसंज्ञक ब्रह्मदेवाच्या

अमुकनामसंवत्सरे अमुकायने अमुकऋतौ अमुकमासे अमुक-
पक्षे अमुकतिथौ अमुकवारे अमुकदिवसनक्षत्रे अमुकराशिस्थिते
चंद्रे अमुकराशिस्थिते श्रीसूर्ये अमुकशिरास्थिते देवगुरौ शेषेषु
ग्रहेषु यथायथं राशिस्थानस्थितेषु सत्सु अमुकयोगे अमुक
करणे एवंगुणविशिष्टायां तिथौ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं श्रीविष्णु-
शंकरगणेशसूर्यदेवीनां यथायथा मिलितोपचारद्रव्यैर्यथा-
शक्त्या यथाज्ञानेन पुरुषसूक्तविधिना पूजनमहं करिष्ये
तदंगासनादिविधिं कलशादिपूजनं च करिष्ये ॥ १० ॥
पृथ्वीति मंत्रस्य मेरुपृष्ठऋषिः कूर्मोदेवता सुतलं छंदः आ-
सन आरोहणे विनियोगः ॥११॥ ओं पृथ्वि त्वया धृता लो-
का देवि त्वं विष्णुना धृता। त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरु
चासनम् ॥ १२ ॥ अपसर्पंत्वित्यस्य वामदेवो भूतान्यनुष्टुप्
भूतशुद्धौ विनियोगः ॥ १३ ॥

दिवसांत वैवस्वत मनूच्या सांकेतिककालांत, कलियुगांत, प्रथमचरणांत, शालिवाहन-शकांत, अमुक नांवाच्या संवत्सरांत, अमुक अयनांत, अमुक ऋतूंत, अमुक महि-न्यांत, अमुक पक्षांत, अमुक तिथींत ( सूर्यचंद्रांतरोपलक्षित कालांत ), अमुक वार असतां, अमुक चंद्रयुक्त नक्षत्र असतां, अमुक राशीवर चंद्र असतां, अमुक राशीवर सूर्य असतां, अमुक राशीवर बृहस्पति असतां व बाकीचे ग्रह ज्या त्या राशींत स्थित असतां आणि अमुक योग व अमुक करण असतां, अशा विशेषणांनीं युक्त तिथींत म्हणजे अन्य सर्व कालाविषयीं व्यावर्तककालांत परमात्म्याच्या प्रीतीकरितां विष्णु, शंकर, गणेश, सूर्य व देवी ह्यांची मी यथाप्राप्त उपचार योग्य द्रव्यांनीं यथाशक्ति व यथाज्ञानानें पुरुषसूक्तविधीनें पूजा करतों. आणखी पूजांगभूत आसनादिविधि व कलशादि पूजोपकरणांचें पूजन करतों. १०. ह्या मंत्राचा मेरुपृष्ठनामक ऋषि, कूर्म-देवता, सुतलछंद व आसनावर बसण्याकडे उपयोग. ११. हे पृथिवी देवि, तूं सर्व लोकांचें धारण करतेस व विष्णु तुझें धारण करतो, अशी साधारण आहेस म्हणून हें आसन पवित्र करून त्यावर माझें धारण कर. १२. ह्या मंत्राचा वामदेवऋषि, भूतें देवता, अनुष्टुभ छंद व भूतांच्या दूरीकरणाकडे उपयोग. १३.

ओमपसर्पंतु ते भूता ये भूता भूमिसंस्थिताः । ये भूता विघ्नकर्तारस्ते नश्यंतु शिवाज्ञया ॥ १४ ॥ अपक्रामंतु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम् । सर्वेषामवरोधेन पूजाकर्म समारभे ॥ १५ ॥ कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः । मूले तत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः । कुक्षौ तु सागराः सर्वे सप्तद्वीपा वसुंधरा । ऋग्वेदोऽथ यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः । अंगैश्च सहिताः सर्वे कलशं तु समाश्रिताः । अत्र गायत्री सावित्री शांतिपुष्टिकरी तथा । आयांतु देवपूजार्थं दुरितक्षयकारकाः ॥ १६ ॥ गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति । नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन्सन्निधिं कुरु ॥ १७ ॥ भूर्भुवः स्वः ओं कलशाय नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥ १८ ॥ शंखादौ चंद्रदैवत्यं कुक्षौ वरुणदेवता । पृष्ठे प्रजापतिश्चैव अग्रे गंगा सरस्वती । त्रैलोक्ये यानि तीर्थानि वासुदेवस्य चाज्ञया ः शंखे तिष्ठंति विप्रेंद्र तस्माच्छंखं प्रपूजयेत् ॥ १९ ॥

जीं भूतें माझ्या सभोंवतीं संचार करतात, जीं भूतें माझ्या आसनभूमीवर स्थित आहेत, आणि जीं भूतें मला विघ्न करतील तीं सर्व शिवाच्या आज्ञेनें दूर जावोत. १४. आणखी भूतें, पिशाचें इत्यादि उपद्रव करणारे योनिमात्र सर्व दिशांस दूर गमन करोत, कीं मी सर्वांच्या अप्रतिबंधानें पूजेस आरंभ करीन. १५. मत्कर्तृक पूजेच्या उपकरणाकरितां मीं केलेल्या ध्यानानें कलशाच्या मुखावर विष्णु, कंठावर शंकर, मूलप्रदेशीं ब्रह्मदेव, मध्यभागीं ब्राह्मी वैष्णवी इत्यादि मातृसमुदाय आणि कुक्षींत सर्व समुद्र, सप्तद्वीपवती पृथिवी, शिक्षादि षडंग सहित ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्वणवेद हे सर्व कलशाचा आश्रयकरून राहिलेले तसेंच शांति व पुष्टि करणारी गायत्री व सावित्री हे सर्व पापाचा नाश करणारे देवपूजेसाठीं प्राप्त होवोत. १६. हे गंगे, हे यमुने, हे गोदावरी, हे सरस्वति, हे नर्मदे, हे सिंधुनदि व हे कावेरि तुह्मी ह्या कलशांतील उदकांत माझ्या प्रार्थनेनें सांनिध्य करा. १७. कलशास नमस्कार असो. ह्यास सर्व-उपचार—प्रतिनिधिभूत गंधाक्षत पुष्पें समर्पण करतों. १८. हे ब्राह्मणश्रेष्ठा, शंखाच्या मूलप्रदेशांत चंद्र, कुक्षींत वरुण, पृष्ठभागीं प्रजापति आणि अग्रभागीं गंगा,

सरस्वती इत्यादि पृथ्वींत जीं तीर्थें आहेत तीं, हीं सर्व विष्णूच्या आज्ञेनें वास करतात म्हणून शंखाची प्रथम पूजा करावी. १९.

त्वं पुरा सागरोत्पन्नो विष्णुना विधृतः करे। निर्मितः सर्वदेवानां पांचजन्य नमोऽस्तुते ॥ २० ॥ भूर्भुवः स्वः ओं शंखाय नमः गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥ २१ ॥ आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम्। कुरु घंटे रवं तत्र देवताव्हानलक्षणम् ॥ २२ ॥ भूर्भुवः स्वः ओं घंटायै नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥ २३ ॥ ओं पाद्यार्घ्याचमनीयकेभ्यो नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ॥फट्॥२४॥ अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थांगतोऽपिवा । यः स्मरेत्पुंडरीकाक्षं सबाह्याभ्यंतरः शुचिः ॥ २५ ॥ शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्ण शुभांगम्। लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं वंदे विष्णुं भवभयकरं सर्व लोकैकनाथं ॥ २६ ॥

हे पांचजन्य संज्ञक शंखा, देवांनीं समुद्राचें मंथन केलें तेव्हां तूं तेथें उत्पन्न झालास, आणि विष्णूनें हस्तामध्यें तुझें धारण केलें असा तूं श्रेष्ठ आहेस म्हणून तुला नमस्कार असो. २०. पूर्ववत् २१. हे घंटे, देवांच्या आगमनाकरितां आणि राक्षसांस घालविण्याकरितां तूं उपयुक्त आहेस, म्हणून राक्षसांस गमनविषयक आणि देवांस निमंत्रणभूत संकेतानें युक्त असा शद्ब कर. २२. पूर्ववत् २३. पूर्ववत. फट् ह्या मंत्रानें पूजा साहित्याचें प्रोक्षण करावें. २४. शौच प्रकरणांत अर्थ लिहिला ( पृष्ठ ३४ पहा ). २५. सत्वगुणस्वभावाचा, शेषावर शयन करणारा, ज्याच्या नाभीवर ब्रह्मदेवास धारण करणारें कमळ आहे, देवांमध्यें श्रेष्ठ, जगतांचा आधार, आकाशासारखा विस्तीर्ण अथवा अविनाशी, मेघासारखा नीलवर्ण, ज्याचे सर्व अवयव सुशोभित आहेत, लक्ष्मीचा पति, ज्याचीं नेत्रें कमळदळासारखीं दीर्घ आहेत, योग्यांनी ( चित्तवृत्तीचा अन्य विषयांपासून निरोध करणाऱ्यांनीं ) ध्यानानें प्राप्त केलेला, संसार भयाचा नाश करणारा, सर्व जगतांमध्यें अद्वितीय ईश्वर अशा विष्णूस मी नमस्कार करतों. २६.

ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसं रत्नाकल्पोज्वलांगं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नं । पद्मासीनं समंतात्स्तुतममरगणै र्व्याघ्रकृत्तिं वसानं विश्वाद्यं विश्ववंद्यं निखिलभयहरं पंचवक्त्रं त्रिनेत्रम् ॥ २७ ॥ श्वेतांगं श्वेतवस्त्रं सितकुसुमगणैः पूजितं श्वेतगंधैः क्षीराब्धौ रत्नदीपे सुरतरुविमले रत्नदीपासनस्थम् । दोर्भिः पाशांकुशेष्टाभयधृतिरुचिरं चंद्रमौलिं त्रिनेत्रं ध्यायेच्छांत्यर्थमीशं गणपतिममलं श्रीसमेतं प्रसन्नम् ॥ २८ ॥ ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ती नारायणः सरसिजासनसन्निविष्टः । केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी हारी हिरण्मयवपु र्धृतशंखचक्रः ॥ २९ ॥

चांदीच्या पर्वतासारखा शुभ्रवर्ण, ज्याच्या मस्तकावर सुंदर चंद्र आहे, ज्याचें अंग रत्नांच्या वेषाप्रमाणें देदीप्यमान आहे, हातांत परशु, हरिण, वरद व अभय या मुद्रांस धारण करणारा, प्रसन्न, पद्मासनावर बसलेला, ज्याची आसमंतभागीं देवसमुदाय स्तुति करतात, व्याघ्रचर्म पांघरणारा, जगतांचा आदि, सर्वांनीं स्तुत्य, सर्व भयांचा नाशकर्ता, पंचवदन, त्रिनेत्र अशा महेश्वराचें निरंतर ध्यान करावें. २७. रत्नांनीं देदीप्यमान, कल्पवृक्षांनीं सुशोभित क्षीरसागरामध्यें रत्नदीपिकर आसनावर बसलेला, शुक्लवर्ण, शुक्लवस्त्रपरिधान केलेला, पाश, अंकुश आणि अभीष्ट देणारी व अभय देणारी ह्या मुद्रांस आपल्या हातांनीं धारण करणारा म्हणून अत्यंत सुंदर, मस्तकावर चंद्रास धारण करणारा, त्रिनेत्र, निर्मल, श्रीसमेत म्हणजे धर्मार्थकाम देणारा, अलंकारभूषणांनीं उत्तम वेशरचना केलेला, बुद्धिमान, श्रीराग गायन करणारा अथवा ऋद्धिसिद्धींनीं युक्त, प्रसन्न अशा भगवान गणपतीस संसार भयाच्या शमनाकरितां शुभ्र चंदनांनीं आणि शुभ्र फुलांच्या समुदायानें पूजित केलेला असें चिंतन करावें. २८. सूर्यमंडळामध्यें असणारा, कमलासनावर बसलेला, अंगद भूषणें, मत्स्याकार कुंडलें व मुकुट धारण करणारा, संसारदुःखाचें अवश्य हरण करणारा, सुवर्णमयशरीरी, शंखचक्र धारण केलेला अशा सूर्यनारायणाचें सर्वदा ध्यान करावें. २९.

अरुणकमलसंस्था तद्रजःपुंजवर्णा करकमलधृतेष्टाभीति युग्मांबुजा च । मणिमुकुटविचित्रालंकृता कल्पजालैर्भवतु भुवनमाता संततं श्रीः श्रियै नः ॥ ३० ॥ सहस्रशिर्षेति षोडशर्चस्य सूक्तस्य ॥ नारायण ऋषिः ॥ जगद्बीजपुरुषो देवता ॥ अनुष्टुप् छंदोऽत्यायास्त्रिष्टुप् छंदः ॥ देवपूजायां विनियोगः ॥ ३१ ॥ ओं सहस्रशीर्षा० गुलम् । वामकराय नमः॥ ओं पुरुष एवेदं० रोहति। दक्षिण कराय नमः॥ ओ मेतावानस्य० दिवि। वामपादाय नमः॥ ओं त्रिपादूर्ध्व० अभि। दक्षिणपादाय नमः॥ ओं तस्माद्विराळ० पुरः। वामजानुने नमः॥ ओं यत्पुरुषेण० शरद्धविः। दक्षिणजानुने नमः॥ ओं तंयज्ञं० ऋषयश्चये। वामकट्यै नमः॥ ओं तस्माद्यज्ञा० ग्राम्याश्च ये। दक्षिणकट्यै नमः । ओं तस्माद्यज्ञात्सर्व० दजायत। नाभये नमः॥ ओं तस्मादश्वा० अजावयः। हृदयाय नमः॥ ओं यत्पुरुषं व्यदधुः० उच्येते। कंठाय नमः॥ ओं ब्राह्मणोस्य० अजायत। वामभुजाय नमः ॥ ओं चंद्रमामनसो० यत। दक्षिणभुजाय नमः ॥ ओं नाभ्याआसी० यन्। मुखाय नमः ॥ ओं सप्तास्यास० पशुम्। अक्षिभ्यां नमः॥ ओं यज्ञेनयज्ञ० संतिदेवाः। मूर्ध्ने नमः ॥ ३२ ॥ ओं ब्राह्मणोस्य० यत। हृदयाय नमः ॥ ओं चंद्रमामनसो० यत। शिरसे नमः ॥ ओं नाभ्याआसी० यन्। शिखायै नमः ओं सप्तास्यासन्० पशुम्। कवचायहुम् ॥ ओं यज्ञेनयज्ञ० देवाः। अस्त्राय फट् ॥ ३३ ॥

आरक्त कमलावर बसलेली, आरक्त कमळांतील रेणुपुंजासारखी गौरवर्ण, करकमलांनीं वरदमुद्रा, अभयमुद्रा व दोन कमलें ह्यांस धारण करणारी, रत्नखचित मुकुट धारण केल्यानें अत्यंत आश्चर्यकारक, वेषयोग्य फुलांच्या कळ्यांनीं अलंकृत अशी जगन्माता श्रीदेवी आम्हांस सतत संपत्ति देवो. ३०. सहस्रशीर्षा इत्यादि सोळा ऋचांच्या सूक्ताचा नारायणऋषि, जगत्कारण परमात्मा देवता, पहिल्या पंधरा ऋचांचा अनुष्टुभ छंद व शेवटचीचा त्रिष्टुभ छंद आणि देवपूजेकडे उपयोग. ३१. ओं सहस्र० इत्यादि ऋचारूपच माझे अवयव आहेत असें समजून पूजा करणार्यानें त्या त्या ऋचेनें

त्या त्या अवयवास नमस्कार करावा. ‘ सहस्रशीर्षा इत्यादि ऋचा म्हटल्यावर ’ वामकरास नमस्कार असो. इत्यादि ३२. ३३.

ओं सहस्र० गुलम् । देवस्य वामकराय नमः ॥ एवं पूर्ववत् । एकविंशति न्यासान् कृत्वा ॥ ३४ ॥ ओं सहस्र-शीर्षा० गुलम् । ओं श्रीविष्णुशंकरगणेशसूर्यदेवीभ्यो नमः पुष्पं समर्पयामि ॥ ३५ ॥ ओं पुरुष एवेदं० इति । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आसनं समर्पयामि ॥ ३६ ॥ ओं एता-तावानस्य० दिवि । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । पाद्यं सम-र्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आचमनीयं समर्पयामि ॥ ३७ ॥ ओं त्रिपादूर्ध्व० अभि । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । अर्घ्यं समर्पयामि ॥ ३८ ॥ ओं तस्माद्विराळ० पुरः । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आचमनीयं समर्पयामि ॥ ३९ ॥ ओं यत्पुरुषेण० ह्रविः । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । स्नानं समर्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः आचमनीयं समर्प-यामि ॥ ४० ॥ ओं तंयज्ञं० श्चये । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । वस्त्रं समर्पयामि । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आचमनीयं समर्पयामि ॥ ४१ ॥ ओं तस्माद्यज्ञात्सर्वहुतः संभृतं० श्चये । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । यज्ञोपवीतं समर्पयामि । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आचमनीयं समर्पयामि ॥ ४२ ॥ ओं तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः० जायत । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । गंध समर्पयामि ॥ ४३ ॥ ओं तस्मादश्वा० वयः । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः पुष्पं समर्पयामि ॥ ४४ ॥ ओं यत्पुरुषं० उच्येते । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । धूपं सम-र्पयामि ॥ ४५ ॥ ओं ब्राह्मणोऽस्य० जायत । ओं श्रीविष्णु०

ओं सहस्र० आपल्या न्यासासारखे देवाचेही एकवीस न्यास करावे. ३४ ओं सहस्र० विष्णु, शंकर, गणेश, सूर्य व देवी ह्यांस पुष्पें अर्पण करतों. ३५. विष्णु, शंकर, गणेश, सूर्य व देवी ह्यांस आसन देतों. ३६. पाद्य म्हणजे पादप्रक्षालनाचें उदक. आचमनीय० म्ह० आचमनोदक. ३७. अर्घ्य म्हणजे पूजोदक. ३८. ३९

भ्यो नम० । दीपं समर्पयामि ॥ ४६ ॥ ओं चंद्रमा० जायत । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । नैवेद्यं समर्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । आचमनीयं समर्पयामि ॥ ४७ ॥ ओं नाभ्याआसी० कल्पयन् । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । नमस्कारं समर्पयामि ॥ ४८ ॥ ओं सप्तास्या० पशुम् । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । प्रदक्षिणाः समर्पयामि ॥ ४९ ॥ ओं यज्ञेन० देवाः । ओं श्रीविष्णु० भ्यो नमः । पुष्पांजलिं समर्पयामि ॥ ५० ॥

स्नान म्ह० स्नानाकरितां उदक. ४०, ४१-४२-४३-४४-४५-४६-४७-४८-४९-५०.

ओं सहस्र० गुलम् । ओं श्रीविष्णुशंकरगणेश सूर्यदेवीभ्यः स्वाहा । विष्णुशंकरगणेशसूर्यदेवीभ्य इदं न मम ॥ इति षोडश कृत्वो हुत्वा ओं सहस्र० देवाः ॥ ओं श्रीविष्णुशंकरगणेश सूर्यदेवीभ्यो नमः पुष्पाणि समर्पयामि ॥ ५१ ॥ ओं सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ॥ सभूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ॥ ५२ ॥ पुरुषऽएवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ॥ उतामृतत्वस्येशानो यदन्नेना तिरोहति ॥ ५३ ॥

ओं सहस्र० हवनाविषयीं अशक्त असल्यास पुरुषसूक्ताची एकदा आवृत्ति करावी, आणि पुन्हा ह्या सूक्ताच्या प्रतिऋचेनें पुष्पें अर्पण करावीं. ५१ हजारों मस्तकें, हजारों डोळे, हजारों चरण, एतदुपलक्षित सकलप्राणिरूपानें अनंतशः अनंत अवयव धारण करणारा विराट्संज्ञक पुरुष हा ब्रह्मांडास सर्व भागीं व्यापून दहा अंगुळें (अमर्याद) अधिक उरला. ५२. हें वर्तमानकाळीं असणारें, जें भूतकाळीं झालेलें आणि तसेंच जें भविष्यकाळीं होणारें जगत तें सर्व विराट् पुरुषच होय. " विराट् पुरुषाची पूर्वऋचेनें देशव्यापकता व ह्या अर्ध्या ऋचेनें काल व्यापकता प्रदर्शित केली " आणखी, हा देवांचा ईश्वर असून ज्याअर्थी अन्नाकरितां स्वकीय कारणावस्था टाकून ह्या दृश्यमान जगदवस्थेस प्राप्त होतो, तें केवळ प्राण्यांच्या कर्मफलोपभोगाकरितांच होय. विराट् पुरुषाचें हें वास्तविक स्वरूप नव्हे. ५३.

एतावा॑नस्य महि॒मातो॒ ज्याया॑ंश्च॒ पूरु॑षः ॥ पादो॑ऽस्य॒ विश्वा॑ भू॒तानि॑ त्रि॒पाद॑स्या॒मृतं॑ दि॒वि ॥ ५४ ॥ त्रि॒पादू॒र्ध्व उदै॒त्पुरु॑षः॒ पादो॑ऽस्ये॒हाभ॑व॒त्पुनः॑ ॥ तत॒ो विष्व॒ङ्० व्य॑क्रामत्साशनानश॒ने अ॒भि ॥ ५५ ॥ तस्मा॑द्वि॒राळ॑जायत वि॒राजो॒ अधि॒ पूरु॑षः । स जा॒तो अत्य॑रिच्यत प॒श्चाद्भूमि॒मथो॑ पु॒रः ॥ ५६ ॥

जितकें भूत भविष्य वर्तमानकाळीं असणारें जगत इतकेंही सर्व विराट् पुरुषाचेंच महत्त्व होय, परंतु हें इतकेंच त्याचें वास्तविक स्वरूप नव्हे तर आणखी ह्या महत्वाहूनही तो अतिशयित अधिक आहे; तें असें—तिन्ही कालांत उत्पन्न होणारे जितके सर्व प्राणिमात्र तितका ह्या विराट् पुरुषाचा चतुर्थ भाग होय, आणि ह्याचें अवशिष्ट त्रिभागात्मक स्वरूप उत्पत्त्यादि विकारात्मक विनाशानें रहित असतां स्वप्रकाशरूपांत राहतें. " यद्यपि ' सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ( ब्रह्म हें त्रिकालाबाध्य, ज्ञानमय व अंतरहित आहे. ) ' असें ब्रह्मविदाख्योपनिषदांत वर्णन केलें आहे म्हणून परमात्म्यास परिमाणच नसल्यानें त्याचा एक भाग जगत आणि तीन भाग प्रकाशस्वरूप हें बोलण्यास अशक्य आहे तथापि, हें सर्व जगत ब्रह्मस्वरूपापेक्षां अत्यंत अल्प आहे, इतक्याच विवक्षेनें एक भाग त्रिभाग असें म्हटलें आहे. " ५४. जो त्रिभागात्मक विराट् पुरुष तो अज्ञाननिमित्तक संसारापासून बहिर्भूत असतां सांसारिक गुणदोषांनीं अस्पृष्ट अशा उत्कर्षानें राहिला, आणि जो ह्याचा जगदात्मक चतुर्थ भाग तो ह्या मायिक संसारामध्यें सृष्टिसंहारक्रमानें पुनः पुनः आगमन करतो, आणि आगमनानंतर देव, पक्षी, नदी पर्वत इत्यादि नाना प्रकारच्या भोजनादि व्यवहारयुक्त व तद्रहित अशा चेतनाचेतनरूपानें ( तद्रूप आपणच होऊन ) जगत व्याप्त करतो. ५५. " पूर्वींच्या ऋचेंत चतुर्थभागात्मक विराट् पुरुष नानारूपानें जगत व्याप्त करतो असें सांगितलें, तें पुन्हा सविस्तर सांगतो. " त्या विराट् परमात्म्यापासून विराट् म्हणजे ज्यांत विविध वस्तु दृश्यमान होतात असा विराट्संज्ञक प्रजापतीचा परमात्म चतुर्थभागात्मक ब्रह्मांडरूप देह उत्पन्न झाला. त्या ब्रह्मांडदेहाच्यामध्यें तद्देहाभिमानी देवतात्मक पुरुष म्हणजे जीव उत्पन्न झाला. तो उत्पन्न झालेला ब्रह्मांडदेहाभिमानी जीव देवमनुष्यादिकांसारखा विराट् परमेश्वरापासून भिन्न झाला. त्या प्रजापतीच्या आदि जीवोत्पत्तीनंतर सकल वेदांतवेद्य परमात्म्यानें भूमि म्ह० जींत सर्व भूतें राहतात असें स्थान उत्पन्न केलें, आणि भूमीनंतर पुरः ( पुर् ) म्हणजे रस, रक्त, मांस,

मेद, अस्थि, मज्जा व शुक्र ह्या सप्त धातूंनीं ज्यांचें पूरण होतें अशीं देवमनुष्यादिकांचीं शरीरें उत्पन्न केलीं. ५६.

यत्पुरुषेण हविषा देवायज्ञमतन्वत । वसंतोऽअस्यासीदाज्यं ग्रीष्मऽइध्मः शरद्धविः ॥ ५७ ॥ तंयज्ञं बर्हिषि प्रौक्ष न्पुरुषं जातमग्रतः । तेनदेवाऽअयजंत साध्याऽऋषयश्चये ॥ ५८ ॥ तस्माद्यज्ञात्सर्वहुतः संभृतंपृषदाज्यम् । पशूंस्ताँश्चक्रे वायव्या नारण्यान्ग्राम्याश्चये ॥ ५९ ॥ तस्माद्यज्ञात्सर्वहुतऽऋचः सामानिजज्ञिरे । छंदांसिजज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥६०॥ तस्मादश्वाऽअजायंत येके चोभयादतः । गावोहजज्ञिरे तस्मात्तस्माज्जाताऽअजावयः ॥ ६१ ॥

जेव्हां पूर्वोक्त क्रमानें देवमनुष्यादिकांचीं शरीरें उत्पन्न झालीं असतां उत्तरोत्तर सृष्टिक्रम चालावयास प्रजापतीच्या प्राणेंद्रियरूप देवांनीं जीवपुरुषरूप हविर्द्रव्यानें यज्ञाचें अनुष्ठान केलें, तेव्हां ह्या यज्ञसंबंधी वसंतऋतु हाच आज्य, ग्रीष्मऋतु हाच समिधा आणि शरदऋतु हाच पुरोडाशादिरूप हविःपदार्थ होता. भावार्थ—हविः पदार्थांचा असंभव असल्यानें प्राणेंद्रिय देवांनीं अंतःकरणानें जीवात्मक पुरुषाचा सामान्य हविर्द्रव्यरूपानें व वसंतादि ऋतूंचा आज्यप्रभृति विशेष हविर्द्रव्यानें संकल्प करून मनोमय यज्ञानुष्ठान केलें. ५७. सृष्टि साधन योग्य ( सृष्टि निर्माण करणाऱ्या ) प्रजापति प्राणेंद्रियरूप देवांनीं व तदनुकूल मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं स्थूल शरीरापूर्वीं उत्पन्न झालेल्या व पशुत्वभावनेनें यूपास बद्ध अशा यज्ञसाधनभूत त्या जीवपुरुषाचें मानसिक दर्भांवर प्रोक्षण केलें आणि त्या पुरुष पशूनें मानसिक यज्ञाचें अनुष्ठान केलें. ५८. ज्यांत प्रजापतीच्या जीवपुरुषाचें हवन होतें अशा त्या प्रजापति प्राणेंद्रियरूप देवकर्तृक मानसिक यज्ञापासून दहिं व तूप एतदुपलक्षित सर्व उपभोग्य पदार्थ प्रजापतीनें संपादन केले; आणखी ज्यांची वायुदेवता आहे असे जे अरण्यांत राहणारे हरिणादिक पशु आणि गावांत रहाणारे महिष्यादिक पशु ते उत्पन्न केले. "अंतरिक्ष वायु हा सर्व पशूंची देवता होय". ५९. ज्यांत प्रजापति जीवपुरुषाचें हवन होतें अशा त्या यज्ञापासून ऋग्वेद, सामवेद, गायत्र्यादिछंद व यजुर्वेद हे उत्पन्न केले. ६०. त्या यज्ञापासून अश्व उत्पन्न झाले त्यांपासून ज्यांस ऊर्ध्वभागीं व अधोभागीं दांत आहेत असे अश्वतर ( खेंचर ) व गर्दभ ( गाढव ) उत्पन्न झाले. त्यापासून

गायी उत्पन्न झाल्या. त्यापासूनच शेळ्या मेंढ्या उत्पन्न झाल्या. ह पादपूरणार्थक अथवा निश्चयार्थक आहे. ६१.

यत्पुरुषं व्यदधुः कतिधाव्यकल्पयन् । मुखं किमस्य कौ बाहूकाऽऊरूपादाऽउच्येते ॥६२॥ ब्राह्मणोऽस्य मुखमासी द्बाहूराजन्यः कृतः । ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रोऽअजायत ॥ ६३ ॥ चंद्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्योऽअजायत । मुखादिंद्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत ॥ ६४ ॥ नाभ्याऽआसीदंतरिक्षं शीर्ष्णोद्यौः समवर्तत । पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाँ अकल्पयन् ॥ ६५ ॥ सप्तास्यासन्परिधय स्त्रिः सप्तसमिधः कृताः । देवायद्यज्ञं तन्वानाऽअबध्नन्पुरुषं पशुम् ॥ ६६ ॥

" प्रश्नोत्तर रूपानें ब्राह्मणादि सृष्टि सांगावयास ब्रह्मविषयक भाषण करणारांचे प्रश्न सांगतो. " जेव्हां मानसिक यज्ञ करणाऱ्या प्रजापतीच्या प्राणेंद्रियरूप देवांनीं संकल्पानें विराट् पुरुषाचें ( ब्रह्मांडांतील जीव सृष्टीचें ) उत्पादन केलें, तेव्हां किती प्रकारांनीं नाना प्रकारचें उत्पन्न केलें ? ह्या विराट् पुरुषाचें मुख कोणतें होतें ? बाहु कोणते होते ? ऊरु ( मांड्या ) कोणते होते ? चरण कोणास म्हणतात ? ६२. " आतां पूर्वोक्त प्रश्नांचीं उत्तरें सांगतों. " ह्या प्रजापतीच्या मुखापासून ब्राह्मणत्व जातिमान ( ब्राह्मण जीव ) उत्पन्न झाला. बाहूंपासून क्षत्रिय जीव उत्पन्न केला. ऊरूं पासून वैश्य जीव उत्पन्न झाला. पायांपासून शूद्र जीव उत्पन्न झाला. ६३. विराट् प्रजापतीच्या मनापासून चंद्र झाला. नेत्रापासून सूर्य झाला, मुखापासून इंद्र व अग्नि उत्पन्न झाले. प्राणापासून वायु उत्पन्न झाला. ६४. जसें प्रजापतीच्या मनः प्रभृतिकांनीं चंद्रादिकांचें उत्पादन केलें तसें–नाभ्यादिक इंद्रियदेवांनीं अंतरिक्षादि लोकांचें उत्पादन केलें. हें पुनः दर्शवितो–नाभीपासून अंतरिक्ष उत्पन्न झालें. मस्तका पासून स्वर्ग उत्पन्न झाला. पायांपासून भूमि ( पृथिवी ) उत्पन्न झाली. कानापासून दिशा उत्पन्न झाल्या. ६५. जसें–यज्ञामध्यें ऐष्टिक आहवनीयाग्नीचे तीन, उत्तर वेदिकेचे तीन आणि आदित्य प्रतिनिधिरूप एक एकूण सात परिधि ( दक्षिण दिशेस, पश्चिम दिशेस व उत्तर दिशेस रक्षणार्थ निक्षिप्त केलेलीं पालाशादिकांचीं ( पळस वगैरेंचीं ) हाता एवढालीं काष्ठें आणि उभय स्थळींही पूर्व दिशेस रक्षण करणारा काष्ठ

प्रतिनिधिरूप आदित्य मिळून सात ) असतात; तसें-ह्या प्रजापति प्राणेंद्रियदेवकर्तृक यज्ञांत गायत्र्यादिक सप्तछंदच परिधि होते. बारा महिने, पांच ऋतु, तीन भुवनें व एकविसावा आदित्य हे समिधास्थानीं कल्पित होते असा मानसिक यज्ञ करणाऱ्या प्रजापतीच्या प्राणेंद्रियरूप देवांनीं जो विराट् परमात्म्यापासून उत्पन्न झालेला जीवपुरुष त्याचेंच पशुभावनेनें बंधन केलें " ह्याच अभिप्रायानें ' यत्पुरुषेण हविषा ' ह्या ऋचेनें यज्ञाचें वर्णन केलें आहे ". ६६.

यज्ञेन॑ यज्ञम॑यजंत॒देवास्तानि॒ धर्मा॑णि प्रथ॒मान्या॑सन् ।
ते ह॒ नाकं॑ महि॒मानः॑ सचंत॒ यत्र॒ पूर्वे॑ सा॒ध्याः सन्ति॑ दे॒वाः ॥६७॥
ओं श्रीविष्णवे नमः । ओं श्रीशंकराय नमः । ओं श्रीगणेशाय नमः॥ ओं श्रीसूर्याय नमः॥ ओं श्रीदेव्यै नमः ॥६८॥
अनेन श्रीविष्णु-शंकर-गणेश-सूर्यदेवी-पूजनाख्येन कर्मणा श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥६९॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर । यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे ॥ ७० ॥

पूर्वीं विस्तारानें सांगितलेल्या अर्थाचा संक्षेप करून सांगतो. " प्रजापतीच्या प्राणेंद्रियरूप देवांनीं पूर्वोक्त मानसिक संकल्परूप यज्ञानें यज्ञस्वरूप प्रजापतीचें पूजन केलें; त्या पूजनापासून तीं प्रसिद्ध जगद्रूप विकारांचीं धारण करणारीं मुख्य कारणें (आदिसृष्टि) उत्पन्न झालीं. " पुरुषसूक्ताचा एतावत्पर्यंत सृष्टिप्रतिपादक भाग झाला. आतां उपासनेचा आणि तिच्या फलाचा अनुवादक भाग सांगतो ". ज्या विराट् परमात्मप्राप्तिरूप स्वर्गावर विराट् परमेश्वराच्या उपासनेचें साधन करणारे पुरातन देव आहेत ( रहातात ) त्या स्वर्गावर विराट् परमात्म्याची उपासना करणारे महात्मे निश्चयानें प्राप्त होतात. ६७. विष्णूस नमस्कार असो. इत्यादि. ६८. ह्या पूजेनें परमात्मा प्रीतियुक्त होवो. ६९. पूजा करणारा आपल्या गर्वाचा अभाव दाखविण्याकरितां ' मी सर्व विषयांनीं अत्यंत अल्प आहे व परमात्मा परम श्रेष्ठ आहे ' अशा भावनेनें परमेश्वराची प्रार्थना करतो ". हे देवदेवा, तुझें मीं केलेलें पूजन जें,-शिक्षाप्रणीत माधुर्यादि गुणांनीं युक्त व कंपादि दोषांनीं रहित असें उच्चारण आणि शब्दाचें व अर्थाचें तादात्म्य आहे म्हणून मंत्रप्रतिपाद्य त्वत्कर्मक ज्ञान ह्या उभयगुणाश्रित मंत्रानें विहीन आहे, जें असा तुझ्या दर्शनाचाच अभाव असल्यानें त्वत्कर्मक प्रत्यक्ष सेवन क्रियेनें हीन आहे; आणि जें अशा दर्शनसेवनविरहामुळें तुझ्या

ठिकाणीं चित्तैकाग्रतारूप भक्तीनेंही शून्य आहे, परंतु तें माझें पूजनकर्म केवळ तुझ्या प्रसादानेंच त्वत्कर्मक साक्षात्कार प्रत्यक्ष सेवा व इतर विषय निरसनपूर्वक भक्ति ह्या तीन गुणांनीं परिपूर्ण असो. ७०

> आवाहनं न जानामि न जानामि तवार्चनम् । पूजां चैव न जानामि क्षम्यतां परमेश्वर ॥ ७१ ॥ अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम । तस्मात्कारुण्यभावेन रक्षस्व परमेश्वर ॥ ७२ ॥ भूमौ स्खलितपादानां भूमिरेवावलंबनम् । त्वयि जातापराधानां त्वमेव शरणं मम ॥ ७३ ॥ शंखमध्ये स्थितं तोयं भ्रामितं केशवोपरि । अंगलग्नं मनुष्याणां ब्रह्महत्यां व्यपोहतु ॥ ७४ ॥ अकालमृत्युहरणं ब्रह्महत्याविनाशनम् । रोगघ्नं पुण्यदं पास्ये सुरपादावनेजनम् ॥ ७५ ॥

हे परमेश्वरा, तूं मला जिव्हा, अंतःकरण, हात, पाय इत्यादि सर्व उपयुक्त अवयव दिले असतां मी तुझें आवाहन म्हणजे समीप प्राप्तीकरितां निमंत्रण जाणत नाहीं. अर्चन म्ह० कोणत्या प्रतिमेवर, कोणत्या स्थळीं पूजा करावी, अथवा पूजेचें यथाविहित गंधपुष्पादि उपकरण साहित्य काय ? हें जाणत नाहीं, आणि अशा साधनाच्या अज्ञानानें पूजा करावयासही जाणत नाहीं. मग पूजेनें तुझी प्रीति संपादन करणें दूरच आहे. म्हणून मी तुझा महान अपराधी आहे परंतु, क्षमा हा तुझा धर्म आहे म्हणून ह्या अपराधांची क्षमा कर. ७१. हे ईश्वरा, कदाचित् तूं असें म्हणशील कीं ‘ परमेश्वराचा अपराधी मी अन्य देवमनुष्यादिकांस शरणागत होऊन तुझ्या अपराधजनित भयापासून मुक्त होईन ’ तर तसें नाहीं. देवमनुष्यादिक तुझ्याहून अत्यंत हीनशक्ति असल्यानें ते रक्षण करणारेच नाहींत. तूं सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस म्हणून अगतिक माझें तूंच संरक्षण करणारा आहेस. तस्मात तुझ्या स्वभावसिद्ध करुणेनें माझें रक्षण कर. ७२. हे परमेश्वरा, ‘ आणखी मी अगतिक कसा आहे तें सांगतों. ’ जसें--भूमीवर ज्यांचे पाय घसरले आहेत अशांस भूमिच आश्रय आहे तसें,-तुझ्याविषयीं झालेल्या अपराधांच्या भयापासून रक्षण करणारा तूंच आहेस. ७३ शंखामध्यें असलेलें उदक विष्णूवर भ्रामित केलें असतां जर तें मनुष्यांच्या अंगास लागेल तर तें त्यांच्या ब्रह्मसंपादक पूजा कर्मांतील न्यूनातिरिक्त दोषांचें अवश्य निवारण करतें. ७४. अपमृत्यूचें हरण करणारें, ब्रह्महत्या म्हणजे अज्ञान कार्य संसार

तत्पुरुषाय ॥ विद्महे महादेवाय धीमहि । तन्नोरुद्रः प्रचोदयात् ॥ ७६ ॥ ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानां ब्रह्माधिपति ब्रह्मणोधिपति ब्रह्मा शिवोमेऽअस्तु सदाशिवोम् ॥ ७७ ॥

## इति देवपूजा.

---

प्रवृत्ति तिचें विशेषें करून नाशन करणारें, संचितदोषानें प्राप्त झालेल्या रोगांची हानि करणारें आणि प्राप्त जन्मांत उपभोग्य वस्तूंच्या उपभोगाविषयीं पुण्य देणारें असें देवचरणापासून गळलेलें पापांचें शोधन करणारें असें उदक मी प्राशन करतों. ७५. " देवपूजाविधीच्या २९ व्या अंकांतील कूर्मपुराणवाक्यांत देवपूजेविषयीं पुरुषसूक्ताहून दुसरे मंत्रही विहित आहेत, त्यांपैकीं ' तद्विष्णोः ' इत्यादि मंत्र पूर्वीच्या प्रकरणांत आले आहेत. रुद्रगायत्री व ईशानमंत्र येथें लिहिले, आणि रुद्रमंत्र पूजा प्रकरण झाल्यानंतर लिहिले आहेत. " त्या आगम प्रसिद्ध वस्तुतः निराकार असतांही पुरुषाकार धारण करणाऱ्या महादेवाचें आम्ही ध्यान करतों. त्या ध्यानाविषयीं रुद्र आम्हांस प्रेरणा करो. ७६. वेदादिक चवदा विद्यांचा व गीतनृत्यादिक चौसष्ट कलांचा नियंता, सर्व प्राणिमात्रांचा नियामक, वेदांचें अत्यंत पालन करणारा, हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाचा स्वामी, असा जो महान परमात्मा ( महादेव ) आहे तो माझ्यावर अनुग्रह करण्याविषयीं सर्वदा शांत असो, त्याच्या अनुग्रहानें मी सदाशिवस्वरूपच होईन.

ह्याप्रमाणें देवपूजा ( सांगितली. )

---

## अथ रुद्रः

( १ ) ओं नमस्ते रुद्रमन्यव उतोतइषवे नमः ॥ नमस्ते अस्तु धन्वने बाहुभ्यामुतते नमः ॥

## अथ रुद्र.

( १ ) हे रुद्रा, तुझ्या कोपास नमस्कार असो आणि तुझ्या बाणास नमस्कार असो. तुझ्या धनुष्यास नमस्कार असो व धनुष्यबाण धारण करणाऱ्या बाहूंस

नमस्कार असो. ' रुद्राचा कोप, बाण, धनुष्य व ह्या दोहोंनीं युक्त बाहु हे सर्व आमच्या शत्रूंच्याच नाशाविषयीं प्रवृत्त होवोत '. हें स्तुतिकर्त्याचें तात्पर्य.

( २ ) ॥ यातइषुः शिवतमाशिवं बभूवते धनुः ॥ शिवाश-रव्यायातवतयानो रुद्रमृडय ॥ ( ३ ) याते रुद्रशिवातनूरघो रापापकाशिनी ॥ तयानस्तनुवाशंतमयागिरिशंताभिचाक-शीहि ॥ ( ४ ) ॥ यामिषुं गिरिशंतहस्ते बिभर्ष्यस्तवे ॥ शिवांगिरि तां कुरु माहिꣳसीः पुरुषं जगत् ॥ ( ५ ) ॥ शिवेन वचसा त्वा गिरिशाच्छा वदामसि ॥ यथानः सर्वमिज्ज-गदयक्ष्मꣳसुमना असत् ॥ ( ६ ) ॥ अध्यवोचदधिवक्ताप्रथ-मोदैव्यो भिषक् ॥ अहींꣳश्च सर्वाञ्जंभयन्त्सर्वांश्चयातुधान्यः ॥

( २. ) हे रुद्रा, तुझे आम्ही भक्त आहोंत म्हणून आम्हांविषयीं जो तुझा बाण अत्यंत शांत झाला, तुझें धनुष्य शांत झालें आणि जो तुझा भाता शांत झाला, त्या बाण धनुष्य भात्यांकडून आम्हांस सुखी कर. ( ३ ) हे कैलास पर्वतावर राहून प्राणिमात्रांस निरंतर सुख देणाऱ्या रुद्रा, जी तुझी आम्हांवर अनुग्रह करणारी तनू आमचें अनिष्ट करीत नाहीं, अशी आम्हांस अभयंकर आहे त्या अतिशय कल्याण करणाऱ्या तनूनें आम्हांस अवलोकन करून सुखी कर. ( ४ ) हे कैलासावर वास करून सर्वांविषयीं सुखाचा विस्तार करणाऱ्या व कैलासाचें पालन करणाऱ्या रुद्रा, तूं ज्या बाणास शत्रूवर टाकावयास हातांत धारण करतोस त्या बाणास आम्हांविषयीं शांत कर आणि आमच्या मनुष्यांची व गोमहिष्यादिक, प्राण्यांची हिंसा करूं नको. ( ५ ) हे कैलासनाथा, तुझ्या समोर आम्हीं मंगलस्तुतिरूप वचनानें तुझी प्रार्थना करतों कीं, जेणें करून आमचें सर्व मनुष्यपशुपक्ष्यादि जंगममात्र रोगरहित होऊन स्वस्थचित्त होईल असें कर. ( ६ ) जो रुद्र मला ' हा सर्वांपेक्षां अधिक आहे ' असें सर्वांच्या पुढें बोलण्यास समर्थ, देवांमध्यें मुख्य आणि ज्याचें ध्यान केलें कीं तत्कालींच सर्व रोगांचें उपशमन करणारा तो सर्व आहनन करणाऱ्या सर्प व्याघ्रादिकांचा आणि सर्व राक्षसजातींचा विनाश करीत असतां मला ' हा सर्वांहून अधिक आहे ' असें बोलो. त्या रुद्राच्या अशा बोलण्यानेंच मी सर्वांहून अधिक होईन.

(७) ॥ अ॒सौयस्ता॒म्रोअ॑रु॒णउ॒तब॒भ्रुःसु॑मं॒गलः ॥ येचे॒मा-ᳪरु॒द्राअ॒भितो॑दि॒क्षुश्रि॒ताःस॑हस्र॒शो॒वैषा॒ᳪहेड॑ईमहे ॥ (८) ॥ अ॒सौयोव॒सर्प॑ति॒नील॑ग्रीवो॒विलो॑हितः ॥ उ॒तैनं॑ गो॒पाअ॑दृश॒न्नदृ॑श-न्नुद॒हार्यः॑ ॥ उ॒तैनं॒ विश्वा॑भू॒तानि॒ सदृ॒ष्टोमृ॑डयातिनः ॥(९)॥ नमो॑ अस्तु॒नील॑ग्रीवाय सहस्रा॒क्षाय॑मी॒ढुषे॑ ॥ अथो॒येअ॑स्य॒सत्वा॑नो॒हं-तेभ्यो॑क॒रं नमः॑ ॥(१०)॥ प्रमु॑ंच॒ धन्व॑न॒स्त्वमु॒भयो॒रार्त्नि॑यो॒र्ज्यां॥ याश्च॑ते॒हस्त॒इष॑वः परा॒ताभ॑गवोवप ॥

(७) जो हा रुद्र सूर्याच्या मंडळांत राहणारा सूर्यरूप आहे तो उदयकाळीं अत्यंत रक्तवर्ण, उदयानंतर आरक्तवर्ण ( किंचित् तांबडा ) आणि त्यानंतर पिंग-टवर्ण इत्यादि अनेक काळीं अनेक वर्ण धारण करून अंधकारादिकांचें निवारण कर-णारा म्हणून सर्वांस अत्यंत मंगलकारक होय. आणखी जे रुद्र अनेक सहस्रावधि सूर्यकिरणरूपानें ह्या पृथिवीच्या आसमंतभागीं सर्व दिशांमध्यें राहिले आहेत त्या ह्या सूर्यात्मक व किरणात्मक रुद्रांच्या क्रोधरूप तीक्ष्णत्वाचें आम्ही नमस्कारादि उपासनेनें निवारण करतों. (८) ज्याचा कंठ कालकूटविषाच्या प्राशनानें नीलवर्ण झाला आहे असा जो हा रुद्र तोच सूर्यमंडळामध्यें अत्यंत रक्तवर्ण सूर्यरूपानें वास करीत असतां सर्वांस मीं दिसावें म्हणून उदय व अस्त करण्यास प्रवृत्त होतो म्हणून ह्यास वेदशास्त्रांविषयीं संस्कारहीन गोपाळही ( गौळीही ) अवलोकन करतात, उदक वाहणाऱ्या स्त्रियाही पाहतात आणखी ह्यास सर्व पशुपक्ष्यादि प्राणिमात्रही दृष्टिगोचर करतात. कैलासादिकांवर राहणाऱ्या रुद्राचें स्वरूप वेदशास्त्राभिज्ञांनींच अवलोकनीय आहे म्हणून त्यां वाचून इतरां करितां असा हा दृश्यमान होणारा रुद्र आम्हांस सुखी करो. (९) इंद्रमूर्तीच्या धारणानें सहस्रनयन व मेघमूर्तीच्या धारणानें वृष्टिकर्ता अशा नीलग्रीव रुद्रास नमस्कार असो. आणखी जे ह्याचे सेवक प्राणी आहेत त्यांस मी नमस्कार करतों. (१०) हे भगवन् रुद्रा, तूं धनुष्याच्या उभय कोटींवर ( दोन टोंकांवर ) असलेल्या मौर्वीस ( धनुष्याचें आकर्षण कराव-याच्या दोरीस ) खालीं उतर, आणि जे तुझ्या हातांत बाण आहेत त्यांचा त्याग कर.

(११)॥ अवतत्यधनुस्त्वᳬसहस्राक्षशतेषुधे ॥ निशीर्यं शल्यानां मुखा शिवोनः सुमनाभव ॥(१२)॥ विज्यं धनुःकपर्दिनो विशल्यो बाणं वाᳬउत॥ अनेशन्नस्येषवआभुरस्यनिषंगथिः॥ (१३) यातेहेतिर्मीढुष्टमहस्ते बभूवते धनुः॥ तयास्मान्विश्वतस्त्वमयक्ष्मया परिभ्भुज ॥(१४)॥नमस्ते अस्त्वायुधायानाततायधृष्णवे ॥ उभाभ्यामुतते नमो बाहुभ्यां तवधन्वने ॥ (१५) ॥ परिते धन्वनोहेतिरस्मान्वृणक्तु विश्वतः ॥ अथो यइषुधि स्तवारे अस्मन्निधेहि तम् ॥ १ ॥

(११) हे सहस्रनेत्रा शंभर भाते धारण करणाऱ्या रुद्रा, तूं धनुष्याची प्रत्यंचा उतरून आणि बाणांची मुखें खालीं होतील अशीं भात्यांत खोंचून आम्हांविषयीं शांत व अनुग्रह करणारा हो. (१२) जटाजूट धारण करणाऱ्या रुद्राचें धनुष्य ज्याची मौर्वी उतरली आहे असें असो आणि बाण रहाण्याचा भाता बाणांच्या अग्रांस बाह्यभागीं प्रकटित न करणारा असा असो. आणखी ह्या रुद्राचे बाण कोणताही वेध करावयास असमर्थ असोत आणि भाता बाणांस बाहेर काढूं देण्याविषयीं अल्पशक्ति असो. (१३) हे भक्तांच्या अभिलषित पदार्थांचें अतिशयित वर्षण करणाऱ्या रुद्रा, जें तुझें खड्गादिरूप शस्त्र आहे आणि जें तुझ्या हातांत धनुष्य आहे, उपद्रवाचा नाश करणाऱ्या त्या शस्त्रानें व धनुष्यानें तूं आमचें चहूंकडून परिपालन कर. (१४) हे रुद्रा, धनुष्यावर संधानयुक्त न केलेलें व स्वतेजानेंच प्रहार करण्याविषयीं समर्थ अशा तुझ्या बाणरूप आयुधास नमस्कार असो, आणि तुझ्या दोन्ही बाहूंस व तुझ्या धनुष्यास नमस्कार असो. (१५) हे रुद्रा तुझें धनुष्यावर संधानयुक्त केलेलें बाणायुध आम्हांस बाधा न होईल असें आमचें चहुंकडून वर्जन करो (आम्हांस न लागो). आणखी जो तुझा भाता आहे त्यास आम्हांपासून दूर स्थापन कर ॥ १ ॥

(१) नमो हिरण्य बाहवे सेनान्ये दिशां च पतये नमो

(१) बाहूंवर सुवर्णमय अलंकार धारण करणाऱ्या व संग्रामामध्यें योग्य क्रमानें सेनेचें नयन करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो, आणि दिशांचें पालन करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो.

( २ ) नमो॑ वृ॒क्षेभ्यो॒ हरि॑केशेभ्यः पशू॒नां पत॑ये॒ नमो॒ ॥ ( ३ ) नम॑ः स॒स्पिञ्ज॑राय॒ त्विषी॑मते पथी॒नां पत॑ये॒ नमो॒ ( ४ ) नमो॑ बभ्लु॒शाय॑ विव्या॒धिनेऽन्ना॑नां॒ पत॑ये॒ नमो॒ ( ५ ) नमो॒ हरि॑केशायोपवी॒तिने॑ पु॒ष्टानां॒ पत॑ये॒ नमो॒ ( ६ ) नमो॑ भ॒वस्य॑ हे॒त्यै जग॑तां॒ पत॑ये॒ नमो॒ ( ७ ) नमो॑ रु॒द्राया॑तता॒विने॒ क्षेत्रा॑णां॒ पत॑ये॒ नमो॒ ( ८ ) नम॑ः सू॒ताया॒हन्त्या॑य॒ वना॑नां॒ पत॑ये॒ नमो॒ ( ९ ) नमो॒ रोहि॑ताय स्थ॒पत॑ये वृ॒क्षाणां॒ पत॑ये॒ नमो॒

( २ ) ज्यांचे केस ( पानें ) हिरव्या रंगाचे आहेत अशा वृक्षाकार रुद्रमूर्तींस नमस्कार असो. गोमहिष्यादि पशूंचें पालन करणाऱ्या रुद्रमूर्तींस नमस्कार असो. ( ३ ) कोमल तृणासारखा पीतरक्तवर्णात्मक संकीर्णवर्ण धारण करणाऱ्या देदीप्यमान रुद्रास नमस्कार असो. ‘ पथीनां ’ कैवल्य प्राप्तीस साधनभूत उत्तरायणादि लक्षणांनीं युक्त असा शुक्लमार्ग, स्वर्गादिकांच्या प्राप्तीविषयीं साधनभूत दक्षिणायनादि लक्षणांनीं युक्त असा कृष्णमार्ग आणि पुनः पुनः मृत्युलोकींच तिर्यगादि योनींमध्यें जन्म प्राप्त होण्यास कारणभूत पापाचा परिणामरूप तृतीयमार्ग ह्या भगवद्गीतादि शास्त्रप्रतिपादित तीन मार्गांचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. ( ४ ) वृषभावर आरोहण करणारा व शत्रूंस अत्यंत वेध ( प्रहार ) करणारा अशा रुद्रास नमस्कार असो. अन्नाचें पालन करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. ( ५ ) ज्याचे केस कृष्णवर्ण आहेत असा तरुण व मंगलाकरितां यज्ञोपवीत धारण करणारा अशा रुद्रास नमस्कार असो. इंद्रियनिग्रहादि गुणांनीं परिपूर्ण पुरुषांच्या पालक रुद्रास नमस्कार असो. ( ६ ). संसाराचें छेदन करणाऱ्या शस्त्ररूप रुद्रास नमस्कार असो. स्थावरजंगमात्मक जगताचा पालक अशा रुद्रास नमस्कार असो. ( ७ ) विस्तारित ( सज्ज ) केलेल्या धनुष्यानें सर्वांचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. धान्यादि क्षेत्रांचें संरक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. ( ८ ) सारथ्य करणारा व जो शत्रूंनीं हनन करावयास अशक्य अशा रुद्रास नमस्कार असो. अरण्यांचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. ( ९ ) ज्याचा वर्ण रक्त आहे असा व प्रभु अशा रुद्रास नमस्कार असो. वृक्षांचें पालनकर्त्या रुद्रास नमस्कार असो.

(१०) नमो॑ म॒न्त्रिणे॑ वाणि॒जाय॒ कक्षा॑णां॒ पत॑ये॒ नमो॒ (११) नमो॑ भुव॒न्तये॑ वारिवस्कृ॒तायौष॑धीनां॒ पत॑ये॒ नमो॒ (१२) नम॑ उ॒च्चैर्घो॑षायाक्र॒न्दय॑ते पत्ती॒नां पत॑ये॒ नमो॒ (१३) नमः॑ कृत्स्नवी॒ताय॒ धाव॑ते॒ सत्व॑नां॒ पत॑ये॒ नमः॑ ॥ २ ॥

(१०) राजसभेमध्यें गुप्त विचार करण्याविषयीं कुशळ आणि व्यवहार करणाऱ्या वणिजांचा स्वामी अशा रुद्रास नमस्कार असो. अरण्यांत होणाऱ्या तृणादिकांचा स्वामी अशा रुद्रास नमस्कार असो. (११) भूमि उत्पन्न करणाऱ्या व धन उत्पन्न करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. अरण्यांत व गावांत उत्पन्न होणाऱ्या औषधींचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. (१२) युद्धामध्यें मोठ्यानें शब्द करणारा व शत्रूंकडून रोदन करविणारा अशा रुद्रास नमस्कार असो. युद्धामध्यें पत्तींचें म्हणजे पादचारी योध्द्यांचें (पायदळाचें) अथवा एक रथ, एक हत्ती, तीन घोडे व पांच पायदळ अशा समुदायास पत्ति असें म्हणतात. अशा अनेक पत्तींचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. (१३) स्वकीय सर्व सैन्यास वेष्टित करून शत्रूंच्या सैन्या मागें धावणारा अशा रुद्रास नमस्कार असो. शरणागत झालेल्या सात्विकांचें (भक्तांचें) रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. २.

(१) नमः॒ सह॑मानाय निव्या॒धिन॑ आव्या॒धिनी॑नां॒ पत॑ये॒ नमो॒ नमः॑ (२) क॒कु॒भाय॑ निष॒ङ्गिणे॑ स्ते॒नानां॒ पत॑ये॒ नमो॒ ॥

(१) शत्रूंचीं शस्त्रें सहन करण्याविषयीं समर्थ व शत्रूंस अत्यंत प्रहार करणारा अशा रुद्रास नमस्कार असो. आसमंतभागीं स्थित होऊन शत्रूंस वेध करणाऱ्या सेनांचें रक्षण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. (२) ककुभ म्हणजे वीण्याचा भोपळा हा जसा वीण्याच्या अवयवांत ध्वनि उत्पन्न होण्यास मुख्य साधन आहे तसा सर्व जगतांमध्यें मुख्य व खड्ग धारण करणारा अशा रुद्रास नमस्कार असो. दूर प्रदेशाहून येऊन भिंत, कवाड इत्यादि फोडून गुप्तपणानें चोरी करणाऱ्या चोरांचा स्वामी (पालनकर्ता) अशा रुद्रास नमस्कार असो. "रुद्र हा लीलेनें नटासारखे अनेक वेष धारण करतो म्हणून चोर हें स्वरूपही रुद्रात्मकच आहे. अथवा रुद्र हा सर्व जगदात्मक आहे म्हणून जगतांत जे जे पदार्थ आहेत त्या त्या रूपांनीं रुद्रच वर्तन करतो अशा प्रकारचें रुद्राचें सर्वात्मकत्व प्रकटित करावयास ह्या मंत्रामध्यें चोरांचा स्वामी असें म्हटलें आहे. चोरादिकांच्या शरीरांमध्यें जीव-

रूपानें व ईश्वररूपानें रुद्र रहातो. त्यांत जो जीवरूप पदार्थ आहे तो चोरादि शद्बांचा वाच्य अर्थ होय. तोच अपहरणादि असत्क्रिया करणारा म्हणून त्यासच 'हा निंद्य आहे' असें शास्त्रांत म्हटलें आहे. आणि चोरादि शद्बांनीं ईश्वररूप उपलक्षित होतें (ईश्वर सर्व व्यापक आहे व चोरादि पदार्थ व्याप्य आहेत असें त्या चोरादि शद्बांनीं उत्पन्न झालेल्या अनुमानस्मरणानें ईश्वरसंबंधी ज्ञान होतें) म्हणून पापाचा क्षय व्हावा ह्या हेतूनें मंत्रांत त्या चोरादि शद्बांचें जें ईश्वरभावनेनें चिंतन करणें हा परम-पुरुषार्थ होय. अशा लक्ष्यार्थ विवक्षेनें मंत्रामध्यें चोरादि लौकिक शद्बांचा प्रयोग केला आहे. जसें-चंद्र दाखविण्याकरितां 'अमुक वृक्षोपलक्षित दिशेस चंद्र आहे अशा तात्पर्यानें अमुक वृक्षावर चंद्र आहे असें कोणीं वाक्य म्हटलें असतां, त्या समीपस्थ वृक्षाच्या अन्वेषणानें चंद्र पहावा, वस्तुतः वृक्षावर चंद्र नाहीं, असाच ह्या वाक्याचा अर्थ आहे हें सामान्यतः अज्ञान मनुष्यही त्या वाक्यश्रवणाच्या समकालींच समजेल, तसें-धर्मार्थकाममोक्षांच्या प्राप्तीविषयीं साधनरूपानें प्रवृत्त झालेल्या मंत्रांत निंद्यार्थप्रतिपादक चोरादि शद्बांचा प्रयोग नाहीं, तर ईश्वररूपार्थो-पलक्षकच चोरादि शद्बांचा प्रयोग आहे हें सर्वांशीं निभ्रांत आहे. ह्या प्रमाणेंच सर्व मंत्रांतील निंद्यार्थप्रतिपादक शद्बांचा अर्थ समजावा."

(३) नमो॑ निषं॒गिणं॑ इषुधि॒मते॒ तस्क॑राणां॒ पत॑ये॒ नमो॒ (४) नमो॒ वचं॑ते परि॒वंच॑ते स्ताय॒ूनां पत॑ये॒ नमो॒ (५) नमो॑ निचे॒-र॒वे परि॒चरायार॑ण्याना॒ं पत॑ये॒ नमो॒ ॥

(३) धनुष्यावर संधान करावयास हातांत बाण धारण केलेल्या व पृष्ठभागीं भाता धारण केलेल्या रुद्रास नमस्कार असो. प्रकटपणानें चोरी करणाऱ्या चोरांचें (दरोडखोरांचें) पालन करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. (४) धन्याजवळ विश्वासुपणानें राहून त्याच्या क्रयविक्रयादि व्यवहारांमध्यें कांहीं द्रव्याचा अपहार करणाऱ्या (कसर, लांच, इत्यादि खाणाऱ्या) व सर्व व्यवहारामध्यें 'मी कांहीं जाणत नाहीं' इत्यादि प्रकारचा खोटसाळपणा करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. सर्वांस विश्वासूपणानें आपलेसें करून साधल्या वेळेस कोणांस न समजतां द्रव्याचें अपहरण करून जाणाऱ्या चोरांच्या पालनकर्त्या रुद्रास नमस्कार असो. (५) धन्याच्या घरीं केव्हां चोरी करीन अशा बुद्धीनें निरंतर सावध असतां सर्व पदार्थांस टेहळून राहणाऱ्या (बिलंद चोरास) व घर, बाजार इत्यादि ठिकाणीं

चोरीच्या बुद्धीनें इकडे तिकडे फिरणाऱ्या ( भामट्या ) रुद्रास नमस्कार असो. द्रव्याचा अपहार करण्याकरितां अरण्यांत राहून वाटसरूंस पीडा करणाऱ्या चोरांचें ( वाट मारणारांचें ) पालनकर्त्या रुद्रास नमस्कार असो.

( ६ ) नमः सृकाविभ्यो जिघांᳬसद्भ्योमुष्णतांपतये नमो ( ७ ) नमोंसिमद्भ्यो नक्तं चरद्भ्यः प्रकृंतानां पतये नमो ( ८ ) नम उष्णीषिणे गिरिचराय कुलुंचानां पतये नमो ( ९ ) नम इषुमद्भ्योधन्वाविभ्यश्चवो नमो ( १० ) नम आतन्वानेभ्यः प्रतिदधानेभ्यश्चवो नमो ( ११ ) नम आयच्छद्भ्यो विसृजद्भ्यश्चवो नमो ( १२ ) नमो स्यद्भ्यो विध्यद्भ्यश्चवो नमो ॥

( ६ ) आपलीं शरीरें वज्रायुधानें रक्षण करणारे व प्राण्यांस मारण्याची इच्छा करणारे अशा चोररूप रुद्रांस नमस्कार असो. धन्याचें कृषिकर्म ( शेतकी ) करून त्याचें धान्य चोरणाऱ्या रुद्रांस नमस्कार असो. ( ७ ) खड्ग धारण करणाऱ्या व रात्रीं संचार करीत असतां मार्गांत सांपडलेल्या प्राण्यास लुटणाऱ्या रुद्रांस नमस्कार असो. प्राण्यांचें निकृंतन करूनच त्यांच्या द्रव्याचें अपहरण करणाऱ्या चोरांच्या पालक रुद्रास नमस्कार असो. ( ८ ) सभ्य लोकांसारखें पागोटें घालून त्या सभ्य लोकांत वागत असतां चोरी करणाऱ्या, व पर्वतावर काष्ठादि पदार्थ नेण्याकरितां आलेल्या मनुष्यांचें वस्त्रादि हरण करावयास तेथें संचार करणाऱ्या रुद्रास नमस्कार असो. घर, शेर इत्यादिसंबंधी भूमीचें अपहरण करणाऱ्या चोरांच्या पालन कर्त्या रुद्रास नमस्कार असो. ( ९ ) अहो रुद्रांनो, लोकांस भिवविण्याकरितां हातांत बाण धारण करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो, व धनुष्य धारण करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो. ( १० ) अहो रुद्रांनो, धनुष्याची प्रत्यंचा चढविणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो व धनुष्यावर बाणाचें संधान करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो. ( ११ ) अहो रुद्रांनो, धनुष्याची दोरी आकर्षण करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो, व बाण सोडणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो. ( १२ ) अहो रुद्रांनो, लक्ष्यापर्यंत ( निशाणापर्यंत, नेमापर्यंत ) बाणाचें गमन होईल असें करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो, व बाणाचा लक्ष्यांत वेध होईल असें करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो.

(१३) नम आसीनेभ्यः शयानेभ्यश्चवो नमो नमः स्वपद्भ्यो जाग्रद्भ्यश्चवो नमो नमस्तिष्ठद्भ्यो धावद्भ्यश्चवो नमो नमः सभाभ्यः सभापतिभ्यश्चवो नमो नमो अश्वेभ्योश्वपतिभ्यश्चवो नमः ॥ ३ ॥

(१३) अहो रुद्रांनो, बसणारे, निजणारे, झोंप घेणारे, जागणारे, उभे राहणारे, धावणारे, सभारूप, सभांचें रक्षण करणारे, अश्वरूप व अश्वांचे रक्षण करणारे अशा तुम्हांस पुनः पुनः नमस्कार असो. ३.

( १ ) नम आव्याधिनीभ्यो विविध्यंतीभ्यश्चवो नमो ( २ ) नम उगणाभ्यस्तृंहतीभ्यं श्चवो नमो ( ३ ) नमो गृत्सेभ्यो गृत्सपतिभ्यश्चवो नमो ( ४ ) नमो व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्चवो नमो ( ५ ) नमो गणेभ्यो गणपतिभ्यश्चवो नमो (६) नमो विरूपेभ्यो विश्वरूभ्यश्चवो नमो (७) नमो महद्भ्यः क्षुल्लकेभ्यश्चवो नमो (८) नमो रथिभ्यो रथेभ्यश्चवो नमो

( १ ) अहो रुद्रांनो, आसमंतभागीं वेध करण्यास समर्थ अशा स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो, व अत्यंत वेध करणाऱ्या स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो. ( २ ) अहो रुद्रांनो, ज्यांचे समुदाय उत्कृष्ट आहेत अशा सप्तमातृकादि स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो, व प्राण्यांचे हनन करण्यास समर्थ अशा क्रूर दुर्गादि स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो. ( ३ ) अहो रुद्रांनो, कामुकी स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो, व कामुकींच्या पालन करणाऱ्या स्त्रिया एतद्रूप तुम्हांस नमस्कार असो. ( ४ ) अहो रुद्रांनो, अनेक जातीय स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो, व त्यांचें रक्षण करणाऱ्या स्त्रीरूपात्मक तुम्हांस नमस्कार असो. (५) अहो रुद्रांनो, देवाचे सेवक भूतगण व भूतगणांचे पालक ( मुख्य ) अशा तुम्हांस नमस्कार असो. ( ६ ) अहो रुद्रांनो, नग्नमुंडादि विकृतरूपें धारण करणाऱ्या व अश्वरूप, उष्ट्ररूप, खरमुख इत्यादि अनेक प्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या तुम्हांस नमस्कार असो. ( ७ ) अहो रुद्रांनो, ऐश्वर्यसंपन्न व ऐश्वर्यरहित तुम्हांस नमस्कार असो. ( ८ ) अहो रुद्रांनो, रथांवर बसलेल्या व रथविरहित तुम्हांस नमस्कार असो

(९) नमो रथेभ्यो रथपतिभ्यश्च वो नमो नमस्सेनाभ्यः सेनानिभ्यश्च वो नमो नमः क्षत्तृभ्यः संग्रहीतृभ्यश्च वो नमो नमस्तक्षभ्यो रथकारेभ्यश्च वो नमो नमः कुलालेभ्यः कर्मारेभ्यश्च वो नमो (१०) नमः पुंजिष्टेभ्यो निषादेभ्यश्च वो नमो नम इषुकृद्भ्यो धन्वकृद्भ्यश्च वो नमो नमो मृगयुभ्यः श्वनिभ्यश्च वो नमो नमः श्वभ्यः श्वपतिभ्यश्च वो नमः ॥ ४ ॥

(९) अहो रुद्रांनो, रथरूप व सारथि, सेना व सेना वागविणारे, शरणागतांचें दुःखापासून रक्षण करणारे क्षत्रिय व धनादिकांचा संचय करणारे वैश्य, सुतार व सुतारकाम करविणारे, कुंभार व कुंभारकाम करविणारे अशा तुम्हांस पुनः पुनः नमस्कार असो. (१०) अहो रुद्रांनो, शुकादि पक्षिसमुदायांचे घातक व मत्स्य मारणारे, बाण करणारे व धनुष्यें करणारे, मृगया करणारे व कुत्र्यांस बांधलेली दोरी हातांत धरून त्यांस फिरविणारे, कुत्रे व कुत्र्यांचें रक्षण करणारे महान कुत्रे अशा तुम्हांस वारंवार नमस्कार असो. ४.

नमो भवाय च रुद्राय च नमः शर्वाय च पशुपतये च नमो नीलग्रीवाय च शितिकंठाय च नमः कपर्दिने च व्युप्तकेशाय च नमः सहस्राक्षाय च शतधन्वने च नमो गिरिशाय च शिपिविष्टाय च नमो मीढुष्टमायचेषुमते च नमो ह्रस्वाय च वामनाय च नमो बृहते च वर्षीयसे च नमो वृद्धाय च संवृध्वने च नमो अग्रियाय च प्रथमाय च नम आशवे चाजिराय च नमः शीघ्रियाय च शीभ्याय च नम ऊर्म्याय चावस्वन्याय च नमः स्रोतस्याय च द्वीप्याय च ॥ ५ ॥

**भव** म्हणजे ज्यापासून जगत् उत्पन्न होतें तो, **रुद्र**-रोदनास कारणीभूत दुःखाचा नाशक, **शर्व**-पापाचा नाश करणारा, **पशुपति**-पशुतुल्य अज्ञानी लोकांचें रक्षण करणारा, **नीलग्रीव**-ज्याची मान (कंठाचा पृष्ठभाग) विषप्राशनानें कृष्णवर्ण झाली असा, **शितिकंठ**-ज्याचा गळा (कंठाचा अग्रभाग) शुभ्र आहे असा, **कपर्दी**-पाशुपतादि दीक्षावेषानें जटांचा समुदाय धारण करणारा, **व्युप्तकेश**-संन्यासादि वेशानें केशहीन (मुंड), **सहस्राक्ष**-इंद्रवेशानें सहस्र नयन, **शतधन्वा**-सहस्र

भुजावतारीं शंभर धनुष्यें धारण करणारा, **गिरिश**-कैलासावर रहाणारा, **शिपिविष्ट**-विष्णुमूर्ति धारण करणारा, **मीढुष्टम** मेघरूपानें अत्यंत वृष्टि करणारा, **इषुमान्**-बाणधारी, **ऱ्हस्व**-अल्पशक्तिमान्, **वामन**-अल्प अवयवांचा ( ठेंगणा ), **बृहत्**-आकृतीनें महान, **वर्षीयान्**-गुणांनीं समृद्ध, **वृद्ध**-वयानें अधिक, **संवृध्वा**-वेदादिकांनीं अधिक ( युक्त ), **अग्रिय**-जगताच्या पूर्वीं असणारा, **प्रथम**-सभेमध्यें मुख्य, **आशु**-व्यापक, **अजिर**-गमन करण्याविषयीं कुशळ, **शीघ्रिय**-चपल गमन करणारा, **शीभ्य**-उदकाच्या अत्यंत वाहणाऱ्या प्रवाहांत रहाणारा, **ऊर्म्य**-उदकाच्या लाटांत रहाणारा, **अवस्वन्य**-शब्दरहित उदकांत ( डोहांत ) राहणारा, **स्रोतस्य**-उदकाच्या सामान्य प्रवाहांत राहणारा, व **द्वीप्य**-द्वीपांत रहाणारा अशा रुद्रांस पुनः पुनः नमस्कार असोत ९.

**नमो॑ ज्ये॒ष्ठाय॑ च कनि॒ष्ठाय॑ च॒ नमः॑ पूर्व॒जाय॑ चापर॒जाय॑ च॒ नमो॑ मध्य॒माय॑ चापग॒ल्भाय॑ च॒ नमो॑ जघ॒न्या॑य च॒ बुध्नि॑याय च॒ नमः॑ सो॒भ्या॑य च प्रतिस॒र्या॑य च॒ नमो॒ याम्या॑य च॒ क्षेम्या॑य च॒ नम॑ उर्व॒र्या॑य च॒ खल्या॑य च॒ नमः॒ श्लोक्या॑य चावसा॒न्या॑य च॒ नमो॒ वन्या॑य च॒ कक्ष्या॑य च॒ नमः॑ श्र॒वाय॑ च प्रतिश्र॒वाय॑ च॒ नम॑ आ॒शुषे॑णाय चा॒शुर॑थाय च॒ नमः॒ शूरा॑य चावभिन्द॒ते च॒ नमो॑ व॒र्मिणे॑ च वरू॒थिने॑ च॒ नमो॑ बि॒ल्मिने॑ च कव॒चिने॑ च॒ नमः॑ श्रु॒ताय॑ च श्रुतसे॒नाय॑ च ॥ ६ ॥**

**ज्येष्ठ**—विद्येनें व ऐश्वर्यानें अत्यंत अधिक, **कनिष्ठ**—विद्येनें व ऐश्वर्यानें अत्यंत हीन, **पूर्वज**—जगताच्या पूर्वीं हिरण्यगर्भरूपानें उत्पन्न झालेला, **अपरज**—जगताच्या नाशाच्या वेळीं कालाग्निरूपानें उत्पन्न होणारा, **मध्यम**—जगताच्या स्थितिकालीं देव मनुष्य वृक्ष इत्यादि रूपांनीं असणारा, **अपगल्भ**—बाल, **जघन्य**—गोमहिष्यादिकांच्या पश्चाद्भागीं दूध पिण्यास वत्सरूपानें रहाणारा, **बुध्निय**—वृक्षांच्या मुळांवर अंकुर फांद्या इत्यादि रूपानें उत्पन्न होणारा, **सोभ्य**—पुण्य व पाप ह्या उभयांसहित उत्पन्न होणारा ( मनुष्यलोक ), **प्रतिसर्य**—विवाहादिकांतील कंकणबंधनाविषयीं योग्य, **याम्य**—यमलोकामध्यें पाप्यांना शिक्षा देण्यास उत्पन्न झालेला, **क्षेम्य**—मोक्षास योग्य, **उर्वर्य**—सर्व धान्यें उगवणाऱ्या भूमींत अनेक धान्यरूपांनीं पेरण्यास योग्य, **खल्व**—खळ्यांत रहाण्यास योग्य, **श्लोक्य**—वेदमंत्रांत मंत्र-

प्रतिपाद्यरूपानें राहणारा, **अवसान्य**—उपनिषदादि वेदांतांत तत्प्रतिपाद्यरूपानें रहाणारा, **वन्य**—वनांत वृक्षादिरूपानें रहाणारा, **कक्ष्य**—वनांत लतादिरूपानें रहाणारा, **श्रव**—शब्द, **प्रतिश्रव**—प्रतिध्वनि, **आशुषेण**—ज्याची सेना जलद गमन करणारी आहे असा, **आशुरथ**—ज्याचा रथ त्वरित चालतो असा, **शूर**—युद्धांत धैर्य धरणारा, **अव-भिंदन्**—शत्रूंस प्रहार करणारा, **वर्मी**—कुंचुक्तयुक्त **वरूथी**·गृहस्थ, **बिल्मी**—मस्त-कास रक्षण करणारें जाळिदार कवच धारण करणारा, **कवची**—अंगास रक्षण करणारें कवच धारण करणारा, **श्रुत**—वेदवर्णित व **श्रुतसेन**—ज्याच्या सेनेचें भाटचारण इत्यादि पुरुष वर्णन करतात तो, अशीं रूपें धारण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असोत. ६.

**नमो दुंदुभ्याय चाहनन्याय च नमो धृष्णवे च प्रमृशाय च नमो दूताय च प्रहिताय च नमो निषंगिणे चेषुधिमते च नमस्तीक्ष्णेषवे चायुधिने च नमः स्वायुधाय च सुधन्वने च नमः स्रुत्याय च पथ्याय च नमः काट्याय च नीप्याय च नमः सूद्याय च सरस्याय च नमो नाद्याय च वैशंताय च नमः कूप्यायचावट्याय च नमो वर्ष्यायचावर्ष्याय च नमो मेघ्याय च विद्युत्याय च नम ईध्रियायचातप्याय च नमो वात्याय च रेष्मियाय च नमो वास्तव्याय च वास्तुपाय च ॥७॥**

**दुंदुभ्य**—भेरींत ( डंक्यांत ) उत्पन्न होणारा शब्द, **आहनन्य**—भेरी वाजविणाच्या टिपऱ्यांत ताडन क्रियारूपानें राहणारा, **धृष्णु**—युद्धांत शत्रूंस पाठ न दाखविणारा, **प्रमृश**—शत्रुसैन्याच्या वृत्तांतांचें विवेचन ( विचार ) करणारा, **दूत**—शत्रुसैन्याचा वृत्तांत जाणण्याविषयीं कुशळ, **प्रहित**—स्वामीच्या आज्ञेंत वागणारा, **निषंगी**—खड्गयुक्त, **इषुधिमान्**—तूणीरयुक्त, **तीक्ष्णेषु**—तीक्ष्ण बाण धारण करणारा, **आयुधी**—बहुत शस्त्रांनीयुक्त, **स्वायुध**—उत्तम त्रिशूलरूप शस्त्रानेंयुक्त, **सुधन्वा**—उत्तम पिनाकसंज्ञक धनुष्यानें युक्त, **स्रुत्य**—पाऊलच राहील इतक्याही लहान मार्गानें गमन करण्यास कुशल, **पथ्य**—राजमार्गानें चालावयास योग्य, **काट्य**—थोडेंच उदक वाहण्यास योग्य अशा पाटांत जलरूपानें राहणारा, **नीप्य**—पर्वत-संबंधी निर्झरमार्गांत ( गर्नाळ्यांत ) उदकरूपानें असणारा, **सूद्य**—कर्दमयुक्त प्रदेशांत जलरूपानें राहणारा, **सरस्य**—महान सरोवरांत उदकरूपानें राहणारा, **नाद्य**—नदींतील जलरूप, **वैशंत**—अल्प तळ्यांतील उदकरूप, **कूप्य**—कूपस्थ

जलरूप, अवट्य—भूमीच्या खळग्यांतील जलरूप, वर्ष्य—वर्षणोदकरूप, अवर्ष्य—वर्षणावाचून जलरूपानें राहणारा, मेघ्य—मेघांत रहाणारा, विद्युत्य—जलरूपानें विद्युल्लतेसहित गमन करणारा, ईध्रिय—निर्मल चकचकीत आभाळांत जलरूपानें राहणारा, आतप्य—उष्णसहित (उन्हाबरोबर) वृष्टि करणारा, वात्य—वाऱ्या बरोबर वृष्टि करणारा, रेष्मिय—ज्यांत प्राणिमात्रांचा नाश होतो अशा प्रलयकाळीं गारांनीयुक्त होऊन वृष्टि करणारा, वास्तव्य—गाय, म्हैस, घोडे इत्यादिकांच्या उपयोगासाठीं वर्षण करणारा, व वास्तुप—घर बांधण्याच्या भूमीचें रक्षण करणारा, अशीं नाना प्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असोत. ७.

> नमः सोमाय च रुद्राय च नमस्ताम्राय चारुणाय च नमः शंगाय च पशुपतये च नमं उग्राय च भीमाय च नमो अग्रेवधाय च दूरे वधाय च नमो हंत्रे च हनीयसे च नमो वृक्षेभ्यो हरिकेशेभ्यो नमस्ताराय नमः शंभवे च मयोभवे च नमः शंकराय च मयस्कराय च नमः शिवाय च शिवतराय च नमस्तीर्थ्याय च कूल्याय च नमः पार्याय चावार्याय च नमः प्रतरणाय चोत्तरणाय च नमं आतार्याय चालाद्याय च नमः शष्प्याय च फेन्याय च नमः सिकत्याय च प्रवाह्याय च ॥ ८ ॥

सोम—उमासहित, रुद्र—दुःखनाशक, ताम्र—सूर्यरूप धारण केल्यानें उदयकाळीं अत्यंत रक्तवर्ण, अरुण—सूर्यरूपानें उदयानंतर किंचिद्रक्तवर्ण, शंग—सुख प्राप्त करणारा, पशुपति—पशूंचें पाळन करणारा, उग्र—शत्रूंस क्रोध उत्पन्न करणारा, भीम—शत्रूंस दर्शनानेंच भय उत्पन्न करणारा, अग्रेवध—अग्रभागीं शत्रूंचा वध कर्ता, दूरेवध—शत्रु दूरच असतां अनायासानें त्यांचा वध करणारा, हंता—जो जो जीवमात्र आपल्या शत्रूचें हनन करतो त्या त्या रूपानें हनन करणारा, हनीयान्—प्रलयकाळीं सर्व सृष्टीचें हनन करणारा, वृक्ष—आम्रादि वृक्षरूप, हरिकेश—ज्यांचीं पानें हिरव्या रंगाचीं आहेत अशीं कल्पवृक्षादिरूपें धरणारा, तार—प्रणववाच्य (ओंकाररूप), शंभु—विषयसुखाचा उपभोक्ता, मयोभु—मोक्षसुखाचा उपभोक्ता, शंकर—मातापित्रादिरूपानें लौकिक सुख देणारा,

**मयस्कर**—आचार्य शास्त्रादिरूपानें मोक्षसुख देणारा, **शिव**—कल्याणस्वरूप ( निष्पाप ), **शिवतर**—भक्तांसही निष्पाप करणारा, **तीर्थ्य**—गंगागोदावर्यादि तीर्थांच्या समीपभागीं स्वयंभूलिंगरूपानें राहणारा, **कूल्य**—नदीतीरांवर स्थापित लिंगरूपानें राहणारा, **पार्य**—मुमुक्षूंनीं ध्यान करण्यास योग्य असा संसारसमुद्राच्या परतीरास राहणारा, **अवार्य**—काम्यफळ देण्याकरितां संसारामध्यें राहणारा, **प्रतरण**—पापाच्या नाशाविषयीं अत्यंत मंत्रजपादिरूपानें हेतुभूत, **उत्तरण**—सकल संसारापासून तरून जाण्यास कारणभूत, **आतार्य**—काम्यकर्मांच्या अनुष्ठानानें स्वर्गादि सुख भोगून पुनः संसारांत येण्याविषयीं योग्य कर्ममार्गी, **आलाद्य**—कर्मफळाचा उपभोग करणाऱ्या जीवास प्रेरणा करणारा, **शष्प्य-फेन्य-सिकत्य-प्रवाह्य**—श्रद्धाळु पुरुषाचा वेष धारण करून गंगासंबंधी प्रदेशांत पवित्रां करितां कुशादि कोमल तृणें ग्रहण करण्यास, स्नानादिसमयीं फेसानें स्पृष्ट होण्यास, जपादिकांविषयीं वाळुकेवर बसण्यास आणि तर्पणादिकांस प्रवाहाच्या समीप येण्यास, योग्य असा नित्यकर्मांचें आचरण कर्ता. अशीं अनेकरूपें धारण करणाऱ्या रुद्रास नमस्कार असोत ८.

> नम॑ इरि॒ण्या॑य च प्रप॒थ्या॑य च॒ नमः॑ किꣳशि॒लाय॑ च॒ क्षय॑णाय च॒ नमः॑ कप॒र्दिने॑ च पुल॒स्तये॑ च॒ नमो॒ गोष्ठ्या॑य च॒ गृह्या॑य च॒ नम॒स्तल्प्या॑य च॒ गेह्या॑य च॒ नमः॑ काट्या॑य च गह्वरे॒ष्ठाय॑ च॒ नमो॑ ह्रद॒य्या॑य च निवे॒ष्प्या॑य च॒ नमः॑ पाꣳस॒व्या॑य च रज॒स्या॑य च॒ नम॒ः शुष्क्या॑य च हरि॒त्या॑य च॒ नमो॒ लोप्या॑य चोल॒प्या॑य च॒ नम॑ ऊ॒र्व्या॑य च सू॒र्म्या॑य च॒ नमः॑ प॒र्ण्या॑य च पर्णश॒द्या॑य च॒ नमो॑ पगु॒रमा॑णाय चाभिघ्न॒ते च॒ नम॑ आक्खिद॒ते च॑ प्रक्खिद॒ते च॒ नमो॑ वः किरि॒केभ्यो॑ दे॒वाना॒ꣳ हृद॑येभ्यो॒ नमो॑ विक्षीण॒केभ्यो॒ नमो॑ विचिन्व॒त्केभ्यो॒ नम॑ आनिर्ह॒तेभ्यो॒ नम॑ आमीव॒त्केभ्यः॑ ॥ ९ ॥

अहो रुद्रांनो, **इरिण्य**—उखर ( क्षारयुक्त ) भूमींत राहणारा, **प्रपथ्य**—बहुत लोक चालणाऱ्या मार्गांत राहणारा, **किꣳशिल**—लहान लहान खड्यांनीं युक्त प्रदेश, **क्षयण**—घर बांधण्यास योग्य स्थळ, **कपर्दी**—जटाबंध धारण करणारा, **पुलस्ति**—भक्तांच्या पुरोभागीं उभा राहणारा, **गोष्ठ्य**—गायींच्या गोठांत राहणारा,

**गृह्य**—घरांत राहणारा, **तल्प्य**—पलंगावर निजणारा, **गेह्य**—मोठ्या घरांत ( हवेलींत ) राहणारा, **काट्य**—चालावयास कठीण अशा कंटकयुक्त प्रदेशांत राहणारा, **गव्हरेष्ठ**—पर्वताच्या गुहेंत राहणारा, **ह्रदय्य**—डोहांत रहाणारा, **निवेष्प्य**—हिमोदकांत ( दंवांत ) राहणारा, **पांसव्य**—परमाणूंत राहणारा, **रजस्य**—रजःकणांत राहणारा, **शुष्क्य**—वाळलेल्या लाकडांत राहणारा, **हरित्य**—ओल्या लाकडांत राहणारा, **लोप्य**—ज्यावर गवतही उगवत नाहीं अशा कठीण प्रदेशांत राहणारा, **उलप्य**—बल्वज ( तृणांतील एक भेद आहे ) इत्यादि तृणांत राहणारा, **ऊर्व्य**—पृथिवींत राहणारा, **सूर्म्य**—जींत उत्तम तरंग आहेत अशा नदींत राहणारा, **पर्ण्य**—पानांत राहणारा, **पर्णशद्य**—वाळलेल्या पानांच्या समुदायांत राहणारा, **अपगुरमाण**—सज्ज आयुध धरणारा, **अभिघ्नन्**—प्रहार करणारा, **आक्खिदत्**—अल्पखेद करणारा, **प्रक्खिदन्**—अत्यंत खेद करणारा, **किरिक**—भक्तांस धनादिकांची वृष्टि करणारे, **देवानां-हृदय**—प्रियत्वेंकरून देवांचे हृदयभूत, **विक्षीणक**—कधींही क्षीण न होणारे, **विचिन्वत्क**—इच्छित पदार्थांस वेंचून घेणारे, **आनिर्हत**—ज्यांनीं आसमंतभागीं सर्व पापांचा नाश केला असे, आणि **आमीवत्क**—आसमंतभागीं स्थूल होणारे अशा तुम्हांस ( रुद्रांस ) नमस्कार असोत. ९.

> **( १ ) द्रापे अंधसस्पते दरिद्र नीललोहित ॥ एषां पुरुषाणामेषां पशूनां माभेर्मारोमोएषां किंच नाममत् ॥ ( २ ) यातेरुद्र शिवातनूः शिवा विश्वाहभेषजी ॥ शिवारुद्रस्यभेषजी तयानो मृडजीवसे ॥**

( १ ) हे पापीलोकांस नरकांत क्लेश देणाऱ्या, भक्तांच्या अन्नांचें रक्षण करणाऱ्या, असें करूनही आपण निष्कांचन विरक्त असणाऱ्या, आणि कंठप्रदेशीं नीलवर्ण व सर्वांगीं रक्तवर्ण धारण करणाऱ्या रुद्रा, तूं आमच्या ह्या पुत्रपौत्रादिक पुरुषांच्या व ह्या गाय, म्हैस, घोडा इत्यादि पशूंच्या समदायास भिववूं नको, आणि तुझ्या ह्यापूर्वी नमस्कृत केलेल्या ध्येय रूपांपैकीं एकही रूप आमच्या चित्तांतून घालवूं नको हे कांचनरूपा रुद्रा, आमचा सर्व प्राणिमात्र रोगी न होवो. ( २ ) हे रुद्रा, जी तुझी सर्वांच्या रोगदारिद्र्यादिकांचें निःसंशय निवारण करण्याविषयीं औषधासारखी हेतुभूत व सर्वांस शिवाच्या ( तुझ्या ) सायुज्य प्राप्तीविषयीं औषधरूप ज्ञान होऊन जन्ममरणादि दुःखाचें निवारण करणारी तनू आहे, त्या तनूनें आम्हांस

वांचावयाकरितां सुखी कर. ' सुख हें प्राण राहण्यास कारण आहे. प्राण्याच्या सुस्थितीनें नित्यनैमित्तिक कर्मद्वारा चित्तशुद्धिपूर्वक ज्ञानानें मोक्ष प्राप्त होवो हा याचनीय अर्थ होय. '

( ३ ) इमा॑रुद्राय॑ त॒वसे॑ कप॒र्दिने॑क्ष॒यद्वी॑राय॒ प्रभ॑रामहे म॒तिम् ॥ यथा॑नः॒ शमस॑द्द्वि॒पदे॒ चतु॑ष्पदे॒ विश्वं॑ पु॒ष्टं ग्रामे॑ अ॒स्मिन्नना॑तुरम् ॥ ( ४ ) मृ॒डानो॑ रुद्रो॒तनो॒ मय॑स्कृधिक्ष॒यद्वी॑राय॒ नम॑सा विधेमते ॥ यच्छंच॒योश्च॒ मनु॑राय॒ जेपि॒ता तद॑श्यामतव॒ रुद्र॒ प्रणी॑तौ ॥ ( ५ ) मानो॑ म॒हान्त॑मु॒तमानो॑ अर्भ॒कं मान॒ उक्ष॑तमु॒तमान॑ उक्षि॒तम् ॥ मानो॑वधीः पि॒तरं॒ मोतमा॒तरं॒ प्रि॒या मान॑स्त॒नुवो॑ रुद्ररीरिषः ॥ ( ६ ) ॥ मान॑स्तो॒के तन॑ये॒मान॒ आयु॑षि॒ मानो॒ गोषु॒ मानो॒ अश्वे॑षुरीरिषः ॥ वी॒रान्मानो॑ रुद्रभामि॒तो व॑धीर्ह॒विष्म॑न्तो॒ नम॑ सा विधेमते ॥

( ३ ) आमच्या पुत्रपौत्रादिरूप द्विपद प्राण्यांस व गोमहिष्यादिरूप चतुष्पद प्राण्यांस सुख होण्याकरितां, आणि ह्या गावांतील सर्व प्राणिमात्र सुखयुक्त व उपद्रवरहित होण्याकरितां, आमचे मनोरथ पूर्ण करावयास समर्थ, जटाबंधानें तापसवेष धारण करणारा, कामक्रोधादि रिपुरूप वीरांचा क्षय करणारा अशा रुद्राच्या प्रीत्यर्थ आह्मी त्याची ध्यानादियुक्त बुद्धीनें पूजा करतों. ( ४ ) हे रुद्रा, तूं ह्या लोकीं आम्हांस सुखी कर, व परलोकीं आम्हांस सुख दे. हे रुद्रा, आमच्या पापाच्या क्षयाकरितां तुझी आह्मी नमस्कारानें पूजा करतों. हे रुद्रा, पालन करणाऱ्या प्रजापतीनें जें कांहीं दुःखरहित सुख ( सुखकारक वस्तु ) उत्पन्न केलें आहे त्या सुखास आह्मी आम्हांवर तुझा अतिशयित स्नेह असतां प्राप्त होऊं ( ५ ) हे रुद्रा, तूं आमच्या वृद्ध पुरुषास मारूं नको, आमच्या बालकास मारूं नको, आमच्या गर्भनिषेक करण्याविषयीं समर्थ पुरुषास ( तरुणास ) मारूं नको, आणि आमच्या गर्भस्थ जीवास मारूं नको. आमच्या पित्यास मारूं नको, आमच्या मातेस मारूं नको, आणि आमच्या प्रिय शरीरांस मारूं नको. (६) हे रुद्रा, आह्मी हविर्द्रव्ययुक्त होऊन तुझी नमस्कारानें पूजा करतों म्हणून तूं कोपवश असतां आमच्या अपत्य मात्रावर व विशेषतः पुत्रावर प्रहार करूं नको. आमच्या आयुष्याचा नाश करूं नको, आमच्या

गायींवर प्रहार करूं नको, आमच्या अश्वांवर प्रहार करूं नको, आणि आमच्या नोकरांस मारूं नको.

(७) आरात्ते गोघ्न उतपूरुषघ्ने क्षयद्वीराय सुम्नमस्मेते अस्तु ॥ रक्षा च नो अधि च देवब्रूह्यधा चनः शर्मयच्छद्विबर्हाः (८) स्तुहिश्रुतंगर्तसदंयुवानं मृगं नभीममुपहत्नुमुग्रम् ॥ मृडाजरित्रे रुद्रस्तवानो अन्यंते अस्मन्निवपंतुसेनाः ॥ (९) परिणो रुद्रस्य हेतिर्वृणक्तुपरित्वेषस्य दुर्मतिरघायोः ॥ अवस्थिरामघवद्भ्यस्तनुष्व मीढ्वस्तोकाय तनयाय मृडय ॥ (१०) मीढुष्टम शिवतम शिवोनः सुमनाभव ॥ परमे वृक्ष आयुधं निधाय कृत्तिं वसान आचर पिनाकं बिभ्रदागहि ॥

(७) हे रुद्रा, तुझें गोवध करणारें, पुत्रपौत्रादिक पुरुषांचा वध करणारें व नोकरांचा क्षय करणारें इत्यादि प्रकारचें पूर्वीं वर्णन केलेलें उग्ररूप आम्हांपासून दूर असो, आणि पूर्वीं वर्णित केलेलें तुझें सुखकारकरूप आमच्या सन्निध असो. हे रुद्रदेवा, उभय लोकांत आम्हांस वाढविणारा तूं आमचें रक्षण कर आणि 'यज्ञ करणाऱ्या सर्वांपेक्षां हे अधिक आहेत' असें सर्व देवांमध्यें आम्हांस बोल, आणि सुख दे. (८) हे माझ्या वाचे, तूं प्रसिद्ध, हृदयकमलांत वास करणारा, निरंतर तरुण व जसा सिंह हरिणास भय दाखविणारा नसून गजास मात्र भयंकर तसा प्रलयकालीं सर्व जगताचें हनन करावयास मात्र उग्ररूप धारण करणारा अशा रुद्राची स्तुति कर. हे रुद्रा, तूं आमच्या वाचेनें स्तुत असतां दिवसेंदिवस वृद्धिंगत होणाऱ्या आमच्या शरीरांत सुख दे, आणि तुझ्या सेना आमच्या शिवाय इतराचा (आमच्या शत्रूचा) नाश करोत. (९) रुद्राचें शस्त्र आम्हांस चहूंकडून न लागो. क्रोधानें प्रज्वलित झालेल्या व प्रहार करावयास इच्छिणाऱ्या रुद्राची उग्र बुद्धि आम्हांस वर्ज्य करो, आणि आमच्या शत्रूंच्या नाशाविषयीं स्थित असो. हे भक्तांच्या अभिलषित पदार्थांचें वर्षण करणाऱ्या रुद्रा, तूं त्या तुझ्या उग्र बुद्धीस यज्ञ कर्त्यांपासून पाठीमागें फिरीव, आणि आमच्या पुत्रास व पौत्रास सुखी कर. (१०) हे इच्छित पदार्थांची अत्यंत वृष्टि करणाऱ्या आणि अत्यंत शांत अशा रुद्रा, तूं आम्हाविषयीं शांत व स्नेहयुक्त हो, आणि त्रिशूलादिक आयुध आमच्या दृष्टीस न पडेल असें

महान वृक्षावर ठेवून व्याघ्रचर्ममात्र परिधान केलेला आमच्या समोर ये, अथवा भूषणासाठीं केवळ पिनाक धनुष्यमात्र धारण करूं नये.

( ११ ) विकिरिद्विलोहित नमस्ते अस्तु भगवः ॥ यास्ते सहस्रꣳ हेतयोन्यमस्मन्निवपंतुताः ॥ ( १२ ) सहस्राणि सहस्रधा बाहुवोस्तव हेतयः ॥ तासामीशानोभगवः पराचीना मुखाकृधि ॥ १० ॥

( ११ ) हे भक्तांस अतिशय धन देणारा, शुक्लवर्ण आणि ऐश्वर्य, धर्म, यश, शोभा, ज्ञान व वैराग्य ह्या सहा गुणांनीं युक्त अशा रुद्रा, तुला नमस्कार असो. जीं तुझीं सहस्र आयुधें आहेत तीं आम्हांवाचून इतराचा ( आमच्या श चा ) नाश करोत. ( १२ ) हे षड्गुणयुक्त रुद्रा, तुझ्या दोन्ही हातांत त्रिशूल बाणादि सहस्र प्रकारचीं हजारों आयुधें आहेत, त्या आयुधांचीं मुखें (फळें) तूं समर्थ असतां उलटीं ( पाठीमागें फिरवलेलीं ) कर. १०

( १ ) सहस्राणि सहस्रशोये रुद्रा अधिभूम्याम् ॥ तेषाꣳ सहस्रयोजने वधन्वानितन्मसि ॥ ( २ ) अस्मिन्महत्यर्णवेंतरिक्षे भवा अधिं ॥ ( ३ ) नीलग्रीवाः शितिकंठाः शर्वा अधः क्षमाचराः ( ४ ) नीलग्रीवाः शिति कंठादिवꣳरुद्रा उपश्रिताः ॥ ( ५ ) ये वृक्षेषु सस्पिंजरानीलग्रीवा विलोहिताः ॥

( १ ) भूमीवर जे हजारों व विनायक, प्रमथ, शैल इत्यादि हजारों प्रकारच्या जाति धारण करणारे रुद्र आहेत त्यांच्या धनुष्यांच्या प्रत्यंचा उतरून त्या धनुष्यांस आम्हांपासून हजार योजनें दूर आह्मी स्थापन करवितों. ( २ ) महान समुद्रा सारख्या ह्या अंतरिक्षावर जे रुद्र आहेत, त्यांचीं धनुष्यें हजार योजनें दूर स्थापन करवितों. ( ३ ) जे पृथ्वीच्या अधोभागीं आणि पृथ्वीवर संचार करणारे आणि मानेवर नीलवर्ण व गळ्यावर शुभ्र वर्ण धारण करणारे सर्व रुद्र आहेत त्यांचीं धनुष्यें० (बाकी अर्थ पूर्वीप्रमाणें). ( ४ ) जे स्वर्गावर रहाणारे नीलग्रीव शुभ्रकंठ रुद्र आहेत त्यांचीं धनुष्यें० ( ५ ) जे वृक्षांवर राहणारे कोमल गौररक्तात्मक संकीर्णवर्ण, नीलग्रीव व अत्यंत रक्तवर्ण रुद्र आहेत त्यांचीं धनुष्यें०

(६) ये भूतानामधिपतयो विशिखासः कपर्दिनः ॥ (७) ये अन्नेषु विविध्यंति पात्रेषु पिबतो जनान् ॥ (८) ये पथां पथि रक्षय ऐल बृदाय व्युधः ॥ (९) ये तीर्थानि प्रचरंति सृकावंतो निषगिणः ॥ (१०) य एतावंतश्च भूयांꣳ सश्च दिशो रुद्रावितस्थिरे ॥ तेषांꣳ सहस्रयोजने वधन्वा नितन्मासि ॥ (११) नमो रुद्रेभ्यो ये पृथिव्यां येंतरिक्षेये दिवि येषा मन्नं वातो वर्षमिषं वस्तेभ्यो ॥ (१२) दश प्राचीर्दशंदक्षिणा दश प्रतीचीर्दशोदीचीर्दशोर्ध्वास्तेभ्योनमस्ते ॥

(६) जे गुप्त शरीरें धारण करणाऱ्या भूतांचे रक्षणकर्ते मुंडितकेश (ज्यांच्या मस्तकांस केंस नाहींत असे) आणि जटाबंध धारण करणारे रुद्र आहेत त्यांचीं धनुष्यें० (७ जे रुद्र अन्नांमध्यें व उदकामध्यें गुप्त वेशानें प्रवेश करून लोकांनीं तीं अन्नें खाल्लीं असतां आणि उदकें प्यायलीं असतां त्यांस रक्तमांसप्रभृति धातूंच्या विकाररूपानें पीडा देतात त्यांचीं धनुष्यें० (८) जे मार्गरक्षक रुद्र वैदिक लौकिकादि सर्व मार्गांचें रक्षण करतात, बहुत अन्नांचा संग्रह करून लोकांचें पोषण करतात व शत्रूंशीं युद्ध करून आमचें अनिष्ट निवारण करतात त्या रुद्रांचीं धनुष्यें० (९) जे तीक्ष्ण अग्रांचीं शस्त्रें (भाले) धारण करणारे आणि खड्ग धारण करणारे रुद्र प्रयागादि तीर्थांचें संरक्षण करावयास संचार करतात त्यांचीं धनुष्यें० (१०) जे हजारों पूर्वीं सांगितले तितके व ह्यांहूनही अत्यंत बहुत रुद्र सर्व दिशांमध्यें प्रवेश करून राहतात, त्यांचीं धनुष्यें आम्हांपासून सहस्र योजनें दूर आम्ही स्थापन करवितों. (११) जे रुद्र पृथ्वीवर राहतात त्यांस व त्यांतही विशेषेंकरून ज्यांचें अन्न हेच बाण आहेत ह्मणजे अपथ्य अन्नाच्या भक्षणाविषयीं लोकांस प्रवर्तित करून त्यांचा नाश करतात त्या रुद्रांस नमस्कार असो. जे अंतरिक्षांत राहतात त्यांस व त्यांतही विशेषेंकरून वायुरूप बाणांनीं लोकांस पीडा करतात त्या रुद्रांस नमस्कार असो. जे स्वर्गावर रहातात त्यांस व त्यांतही विशेषेंकरून अतिवृष्टिरूप व अनावृष्टिरूप बाणांनीं जनांची हिंसा करतात त्या रुद्रांस नमस्कार असो. (१२) पूर्वेकडे तोंड करून अंजलि (ओंजळ) केला असतां प्रागग्र (पूर्वेकडे ज्यांचीं टोकें आहेत अशा) दहा अंगुलि होतात, दक्षिणेकडे तोंड करून

अंजलि केला तर दक्षिणाग्र दहा अंगुलि होतात. अशा प्रकारच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर व ऊर्ध्व ( वर ) ह्या दिशांस केलेल्या अंजलींनीं त्या रुद्रांस नमस्कार असो.

( १३ ) नोंमृडयंतुते ( १४ ) यंद्विष्मोयश्चंनोद्वेष्टि तंवो जंभे दधामि ॥ ११ ॥

( १३ ) ते नमस्कृत केलेले रुद्र आह्मांस सुखी करोत. ( १४ ) हे रुद्रांनो ज्याचा आम्ही द्वेष करतों आणि जो आमचा द्वेष करतो अशा आमच्या दोन्ही प्रकारच्या शत्रूंस आम्ही विदारित केलेल्या (पसरलेल्या) तुमच्या मुखांत टाकतों. ११

॥ ओंम् ॥ ( १ ) अग्नां विष्णू स जोषंसे मावंर्धंतुवां गिरंः ॥ द्युम्नैर्वाजेंभिरागंतम् ॥ ( २ ) वाजंश्चमे प्रसवश्चंमे प्रयं-तिश्चमे प्रसितिश्चमे धीतिश्चंमे क्रतुश्चमे स्वरंश्चमे श्लोकंश्चमे श्रावश्चमे श्रुतिंश्चमे ज्योतिंश्चमे सुवंश्चमे प्राणश्चंमे पानश्चंमे व्यान-श्चमे सुंश्चमे चित्तं चंम आधींतं चमे वाक्चंमे मनंश्चमे चक्षुश्चमे श्रोत्रंचमे दक्षंश्चमे बलंचम ओजंश्चमे सहंश्चम आयुंश्चमे जराचंम आत्माचंमे तनूश्चंमे शर्मंचमे वर्मं च मेंगांनिचमे स्थानिंचमे परूंश्चमे शरींराणिचमे ॥ १ ॥

( १ ) हे अग्नि, हे विष्णू, तुह्मी आह्मांविषयीं अत्यंत प्रीतियुक्त व्हा, कीं तुह्मासंबंधीं आह्मी प्रयुक्त केलेल्या ह्या स्तुतिरूप वाणी वृद्धिंगत होवोत, आणि तुह्मीही धनांनीं व अन्नांनीं युक्त होऊन येथें ( आह्मांकडे ) या. ( २ ) ‘ वाजः ’ ह्मणजे अन्न ‘ मे ’ ह्मणजे माझें ‘ कल्पतां ’ ह्मणजे कार्य करण्यास समर्थ होवो. ‘ च ’ ह्मणजे आणि प्रसव इत्यादि. येथपासून सर्व पदांचा संबंध दहाव्या अन्वकांतील ‘ कल्पतां ’ ह्या पदाशीं आहे. भावार्थ—अन्न मला प्राप्त होवो आणि प्रसव मला प्राप्त होवो इत्यादि. **प्रसव**—अन्नाची उत्पत्ति, **प्रयति**—अन्नाची शुद्धि, **प्रसिति**—अन्नाची उत्सुकता, **धीति**—अन्नाचें धारण, **क्रतु**-यज्ञ, **स्वर**—मंत्रांतील उदात्तादि, **श्लोक**—स्तुति, **श्राव**—ऐकविण्याचें सामर्थ्य, **श्रुति**—ऐकण्याची शक्ति, **ज्योतिः**—तेज, **सुवः**—स्वर्ग, **प्राण**—हृदयगत वायु, **अपान**—अधोभागस्थ वायु, **व्यान**—सर्व शरीरसंचारी वायु, **असु**—प्राणादिवायुरूपानें वर्तन करणारा वायु, **चित्त**—मनापासून उत्पन्न होणारें ज्ञान, **आधीत**—मानसिक ज्ञानानें जाणलेला पदार्थ, **वाक्**—वाचा, **मनः**—सर्व इंद्रियांस प्रवर्तन करणारें अंतःकरण, **चक्षुः**—नेत्र,

**श्रोत्र**—कर्णेंद्रिय, **दक्ष**—ज्ञानेंद्रियसंबंधी कौशल्य, **बल**—हस्तपादादिसंबंधी सामर्थ्य, **ओजः**—शरीरांतील शुक्र, **सहः**—शत्रूचा पराभव करण्याची शक्ति, **आयुः**—आयुष्य, **जरा**—वृद्ध होईपर्यंत वांचण्याची शक्ति, **आत्मा**—शास्त्रप्रसिद्ध परमात्मा, **तनू**—उत्तम बांध्याचें शरीर, **शर्म**—सुख, **वर्म**—कवच, **अंग**—सर्व अवयव, **अस्थ**—स्वस्वस्थानीं राहिलेलीं हाडें, **परु**—बोटें वगैरेंचीं पर्वें ( पेरीं ), आणि **शरीर**-पूर्वीं सांगितलेल्या शिवाय राहिलेले अवयव हे सर्व पदार्थ मला प्राप्त होवोत. १

ज्यैष्ठ्यंचम आधिपत्यंचमे मन्युश्चमे भामश्चमे मश्चमेंभश्चमे जेमाचमे महिमा चमे वरिमाचमे प्रथिमाचमे वर्ष्माचमे द्राघुयाचमे वृद्धं चमे वृद्धिश्चमे सत्यं चमे श्रद्धाचमे जगच्चमे धनंचमे वशश्चमे त्विषिश्चमे क्रीडाचमे मोदश्चमे जातं चमे जनिष्यमाणंचमे सूक्तं चमे सुकृतंचमे वित्तंचमे वेद्यंचमे भूतंचम भविष्यच्चमे सुगंचमे सुपथं चमऋद्धंचम ऋद्धिश्चमे कृप्तंचमे कृप्तिश्चमे मतिश्चमे सुमतिश्चमे ॥ २ ॥

**ज्यैष्ठ्य**—अत्यंत प्रशस्तपणा, **आधिपत्य**—स्वामित्व, **मन्यु**—मानसिककोप, **भाम**—शरीरमुद्रेनें दिसणारा बाह्यकोप, **अम**—स्वशक्तीचें परिमाण शत्रूस न समजणें, **अंभः**—थंड गोड पाणी, **जेमा**—जय करण्याचें सामर्थ्य, **महिमा**—जयानें संपादित केलेल्या धनादि संपत्तीचें महत्व, **वरिमा**—पूज्यत्व, **प्रथिमा**—घर, शेत वगैरेंचा विस्तार, **वर्ष्मा**—पुत्रपौत्रादिकांची शरीरसंपत्ति, **द्राघुया**—पुत्रपौत्रादि दीर्घत्व ( अविच्छिन्न संतति ), **वृद्ध**—बहुत अन्न व स्थावर धन, **वृद्धि**—विद्यादि गुणांनीं उत्कर्ष, **सत्य**—यथार्थ भाषण, **श्रद्धा**—परलोक आहे अशी बुद्धि, **जगत्**—जंगमात्मक, **धन**—सुवर्णादि, **वश**—सर्व स्वाधीन असणें, **त्विषि**—शरीरकांति, **क्रीडा**—द्यूतादि, **मोद**—क्रीडाजन्यत्व, **जात**—झालेलें अपत्य, **जनिष्यमाण**—होणारें अपत्य, **सूक्त**—ऋग्वेद, **सुकृत**—वैदिक कर्माच्या आचरणानें उत्पन्न झालेलें पुण्य, **वित्त**—संपादित केलेलें द्रव्य, **वेद्य**—पुढें मिळविण्याचें क्षेत्रादि, **भूत**-संपादित केलेलें गृहक्षेत्रादि, **भविष्यत्**—पुढें संपादन करावयाचें द्रव्य, **सुग**—इष्टबंधु-इत्यादिकांनीं युक्त होऊन ग्रामादिकांस गमन करणें, **सुपथ**—चोरादिकांनीं रहित मार्ग, **ऋद्ध**—वाढविलेलें धनादि अथवा अनुष्ठित कर्माचें फळ, **ऋद्धि**—पुढें करावयाच्या अनुष्ठानाचें फळ, **कृप्त**—स्वकीय कार्य होण्याइतकें द्रव्य, **कृप्ति**—स्वकीय-

सामर्थ्य, **मति**—पदार्थमात्राविषयीं निःसंदेह ज्ञान आणि **सुमति**--अत्यंत विचारणीय राजकार्यादिकाविषयीं निःसंशय ज्ञान, हे सर्व पदार्थ मला प्राप्त होवोत २.

> **शंचंमे मयंश्चमे प्रियं चंमेनुकामश्चंमे कामंश्चमे सौमनसश्चंमे भद्रंचंमे श्रेयंश्चमे वस्यंश्चमे यशंश्चमे भगंश्चमे द्रविणंचमे यंताचंमे धर्ताचंमे क्षेमंश्चमे धृतिंश्चमे विश्वंचमे महंश्चमे संविच्चंमे ज्ञात्रंचमे सूश्चंमे प्रसूश्चंमे सीरंचमे लयश्चंमऋतंचंमे मृतंचमे यक्ष्मंचमेनामयच्चमे जीवातुंश्चमे दीर्घायुत्वं चंमे न मित्रंचमे भयंचमे सुगंचंमे शयंनं चमे सूषाचंमे सुदिनंचमे ॥ ३ ॥**

**शं**--ऐहलौकिक सुख, **मयः**--पारलौकिक सुख, **प्रिय**-प्रियवस्तु, **अनुकाम**-सहाय्यनिमित्तानें इच्छिलेला ऐहिक पदार्थ, **काम**—स्वर्गादि परलोक, **सौमनस**--मनाची स्वस्थता करणारा बंधुवर्ग, **भद्र**--ह्या लोकांत रमणीय कल्याण, **श्रेयः**--परलोकाविषयीं हितकारक कल्याण, **वस्य**—राहण्यास स्थल, **यशः**—कीर्ति, **भग**--सौभाग्य, **द्रविण**--द्रव्य, **यंता**--आचार्यादि शिक्षक, **धर्ता**--पोषणकर्ता, **क्षेम**--विद्यमान द्रव्याच्या रक्षणाविषयीं शक्ति, **धृति**—धैर्य ( आपत्तिकालींही मनाचें चांचल्य न होणें ), **विश्व**--सर्व लोकांची अनुकूलता, **महः**—पूज्यत्व, **संवित्**—वेदशास्त्रादिकांचें ज्ञान, **ज्ञात्र**--दुसऱ्याच्या हृदयांत ज्ञान उत्पन्न करून देण्याची शक्ति, **सू**—पुत्रादिकांस आज्ञा करावयाचें सामर्थ्य, **प्रसू**--सेवकादिकांस आज्ञा करण्याची शक्ति, **सीर**—नांगर, बैल इत्यादि शेतकीचें सामान, **लय**-शेतकींत प्रतिबंध नसणें, **ऋत**—यज्ञादिकर्म, **अमृत**—यज्ञादिकर्माचें फळ, **अयक्ष्म**--क्षयरोगादि महाव्याधि नसणें, **अनामयत्**--ज्वरादि अल्परोग नसणें, **जीवातु**--जीववाचण्याविषयीं रोगनाशार्थ औषध, **दीर्घायुत्व**--अपमृत्यु न होणें, **अनमित्र**-शत्रु नसणें, **अभय**--भय नसणें, **सुग**--सुंदर गमन ( उत्तम आचरण ), **शयन**--पर्यंकादि शय्यासाहित्य, **सूषा**--स्नान संध्यावदन इत्यादिकांचा योग, आणि **सुदिन**-सर्व दिवस यज्ञदानादि सुकर्मांनें युक्त असणें, हे पदार्थ मला प्राप्त होवोत ३.

> **ऊर्क्चंमे सूनृताचमे पयंश्चमे रसंश्चमे घृतंचंमे मधुंचमे सग्धिश्चमे सपीतिश्चमे कृषिश्चंमे वृष्टिश्चमे जैत्रंचम औद्भिद्यंचमे रयि**

**ऊर्क्**--बलप्राप्तीविषयीं साधनभूत लेह्य चोष्यादि सामान्य वस्तु, **सूनृता**--प्रियभाषण, **पयः**--दूध, **रस**--दुधावरची साय काढून अवशिष्ट राहिलेला सारभूत

श्चमे रायश्चमे पुष्टंचमे पुष्टिश्चमे विभुचमे प्रभुचमे बहुचमे भूयश्चमे पूर्णंचमे पूर्णतरंचमे क्षितिश्चमे कूयवाश्चमे न्नंचमेक्षुचमे व्रीहयश्चमे यवाश्चमे माषाश्चमे तिलाश्चमे मुद्गाश्चमे खल्वाश्चमे गोधूमाश्चमे मसुराश्चमे प्रियंगवश्चमेणवश्चमे श्यामाकाश्चमे नीवाराश्चमे॥४॥

पदार्थ, घृत--तूप, मधु--मध, सग्धि--बंधुवर्गसहित ( एकपंक्तीनें ) भोजन, सपीति--बंधुवर्गासह इक्षुरसादिकांचें प्राशन, कृषि-शेतकी, वृष्टि—पर्जन्य, जैत्र-शेतकीची उत्तम भूमि, औद्भिद्य--वृक्षादि उद्भिज्ज वस्तूंची उत्पत्ति, रयि--सुवर्ण, राय--मणिमौक्तिकादि, पुष्ट--सुवर्णादि वस्तु बहुत असणें, पुष्टि--शरीराची पुष्टता, विभु--धान्यादिकांची अल्प संपत्ति, प्रभु--त्यांची मध्यम संपत्ति, बहु--त्यांची बहुत संपत्ति, भूयः--त्यांची अधिक बहुत संपत्ति, पूर्ण-त्यांची पूर्ण संपत्ति, पूर्णतर--त्यांची अधिक पूर्ण संपत्ति, अक्षिति--त्या धान्यादिकांची अक्षय्य संपत्ति, ' विभु इत्यादि सात शद्ब एकापेक्षां दुसरा अधिक अशा व्यवस्थित अर्थांचे वाचक आहेत. कूयव-अरण्यांतील यव, अन्न--ओदनादि ( भात वगैरे ), अक्षुत्--अन्नाच्या भक्षणानें क्षुधा शांत होणें, व्रीहि—शालि ( भात ); यव—जव, माष-उडीद, तिल—तीळ, मुद्ग—मूग, खल्व--ज्याचा दाणा मुगापेक्षां मोठा असतो असें धान्य, गोधूम--गहू, मसुर--मसुरा, प्रियंगु--कांग ( राळे ), अणु—चिमणसाळ ( बारीक भात ), श्यामाक--सावा आणि नीवार--देवभात हे पदार्थ मला प्राप्त होवोत ४.

अश्माचमे मृत्तिकाचमे गिरयश्चमे पर्वताश्चमे सिकताश्चमे वनस्पतयश्चमे हिरण्यंचमे यश्चमे सीसंचमे त्रपुश्चमे श्यामंचमे लोहंचमेग्निश्चम आपश्चमे वीरुधश्चम ओषधयश्चमे कृष्टपच्यंचमे कृष्टपच्यंचमे ग्राम्याश्चमे पशव आरण्याश्च यज्ञेन कल्पंतां वित्तंचम वित्तिश्चमे भूतंचमे भूतिश्चमे वसुचमे वसतिश्चमे कर्मचमे शक्तिश्चमेर्थश्चम एमश्चम इतिश्चमे गतिश्चमे ॥ ५ ॥

अश्मा—दगड, मृत्तिका—माती, गिरि—मोठा डोंगर, पर्वत—दुब्या दुब्यांचा डोंगर (टेंकडी); सिकता--वाळू, वनस्पति—ज्यांस फुलें न येतां फळें येतात अशा औषधि, हिरण्य—सुवण ( सोनें ), अयः--पोलाद, सीस--शिसें, त्रपु—

कथील, **श्याम**--लोखंड, **लोह**—कांसें, तांबें इत्यादि धातु, **अग्नि**-वन्हि, **आप**--उदक, **वीरुध्**--विस्तृत होणाऱ्या ( पसरणाऱ्या ) वेली, **ओषधि**--फळें पिकलीं असतां क्षीण होणाऱ्या औषधि, **कृष्टपच्य**-नागरलेल्या जमिनीवर उगवणारें धान्य, **अकृष्टपच्य**--नागरल्या शिवाय उगवणारें धान्य, **ग्राम्य**--**पशु**--घोडे इत्यादि पशु, व **आरण्य**--अरण्यांतील हरिणादि पशु, हे दोन्ही प्रकारचे पशु माझ्या यज्ञाविषयीं हेतुरूपानें समर्थ असोत. **वित्त**--मिळविलेलें धन, **वित्ति**--होणारा लाभ, **भूत**—ऐश्वर्ययुक्त पुत्रादिक असणें, **भूति**—स्वकीय ऐश्वर्य, **वसु**--दुभतीं गुरें, **वसति**--गोठा, **कर्म**—अग्निहोत्रादि, **शक्ति**--अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य, **अर्थ**--जातकर्मादि नैमित्तिक कर्माविषयीं प्रयोजनभूत पुत्रादिकांची उत्पत्ति, **एम**--पुढें मिळणारें सुख, **इति**--सुखप्राप्तीकरितां उपाय, **गति**—सुखप्राप्ति, हे पदार्थ मला मिळोत. ५.

**अग्निश्चम इंद्रश्चमे सोमश्चम इंद्रश्चमे सविताचम इंद्रश्चमे सरस्वतीचम इंद्रश्चमे पूषाचम इंद्रश्चमे बृहस्पतिश्चम इंद्रश्चमे मित्रश्चम इंद्रश्चमे वरुणश्चम इंद्रश्चमे त्वष्टाचम इंद्रश्चमे धाताचम इंद्रश्चमे विष्णुश्चम इंद्रश्चमेश्विनौचम इंद्रश्चमे मरुतश्चम इंद्रश्चमे विश्वेचमे देवाइंद्रश्चमे पृथिवीचम इंद्रश्चमेंतरिक्षंचम इंद्रश्चमेद्यौश्चम इंद्रश्चमे दिशश्चम इंद्रश्चमे मूर्धाचम इंद्रश्चमे प्रजापतिश्चम इंद्रश्चमे ॥ ६ ॥**

यज्ञामध्यें अग्नि, सोम इत्यादि वीस देवतांसह इंद्र हा समान भागांचें ग्रहण करणारा आहे, म्हणून यज्ञ भाग घेण्याकरितां प्रत्येक देवतासहित इंद्राच्या आगमनाविषयींही प्रार्थना आहे. **विश्वेदेव**—हा शब्द क्रतु, दक्ष इत्यादि दहा देवतांचा योगरूढीनें वाचक आहे. **दिशः**—पूर्वादि चार दिशा, **मूर्धा**-ऊर्ध्वदिशा, सर्व दिशांमध्यें ही मुख्य आहे म्हणून पुनरुक्ति केली आहे. ६

**अ॒ꣳशुश्चमेरश्मिश्चमे दाभ्यश्चमेधिपतिश्चम उपाꣳशुश्चमें तर्यामश्चम ऐंद्रवायश्चमे मैत्रावरुणश्चम आश्विनश्चमे प्रतिप्रस्थानश्चमे शुक्रश्चमे मंथीचम आग्रयणश्चमे वैश्वदेवश्चमे ध्रुवश्चमे**

सोमादि यज्ञामध्यें पालाशादि यथासंभव यज्ञीय काष्ठांचें वीतभर लांब व चार अंगुळें जाड असें उखळी सारखें पात्र करतात त्यास ग्रह असें म्हणतात. ज्या देव-

वैश्वानरश्चमऋतुग्रहाश्चमेतिग्राह्याश्चमऐंद्राग्नश्चमे वैश्वदेवश्चमे मरुत्वतीयाश्चमे माहेंन्द्रश्चम आदित्यश्चमे सावित्रश्चमे सारस्वतश्चमे पौष्णश्चमे पात्नीवतश्चमे हारियोजनश्चमे ॥ ७ ॥

तेच्या आहुतीविषयीं जो ग्रह उपयुक्त असतो त्या ग्रहाची त्या नावानें प्रसिद्धि असते. अंशु, रश्मि, अदाभ्य, इत्यादि अठ्ठावीस ग्रह मला प्राप्त असोत ही प्रार्थना ७.

इध्मश्चमे बर्हिश्चमे वेदिश्चमे धिष्णियाश्चमे स्रुचश्चमे चमसाश्चमे ग्रावाणश्चमे स्वरवश्चम उपरवाश्चमेधिषवणेचमे द्रोणकलशश्चमे वायव्यानिचमे पूतभृच्चम आधवनीयश्चम आग्नीध्रंचमे हविर्धानंचमे गृहाश्चमे सदश्चमे पुरोडाशाश्चमे पचताश्चमेवभृथश्चमे स्वगाकारश्चमे ॥ ८ ॥

**इध्म**—पंधरा समिधांचा मुष्टि, **बर्हि**—दर्भमुष्टि, **वेदि**—गार्हपत्यादि अग्नींच्या मध्यें असलेली संस्कृत भूमि, **धिष्णिय**—होता, मैत्रावरुण, ब्राह्मणाच्छंसी, पोता, नेष्टा व अच्छावाक ह्या ऋत्विजांच्या स्थाननियमाविषयीं असणारीं स्थंडिलें, **स्रुक्**—आहुति देण्याचीं पात्रें, **चमस**—सोमप्राशन करण्याचीं पात्रें, **ग्रावा**—सोमवल्ली कुटण्याचे वरवंटे, **स्वरु**—यूपकंकणें, **उपरव**—चार दिशांस चार छिद्रें असून वरच्या बाजूनें आवृत असे भूमीस केलेले खळगे, **अधिषवण**—सोमाभिषव, **द्रोणकलश**—सोम भरण्याचें पात्र, **वायव्य**--पात्र, **पूतभृत** व **आधवनीय**--पुष्कळ सोम ठेवण्याच्या स्थाली ( थाळ्या ), **आग्नीध्र**—अग्नीत्संज्ञक ऋत्विजाचें स्थान, **हविर्धान**—सोम आणावयाचें शकट, **गृह**—पत्नी शालादिक, **सद्**--ऋत्विक् शालादिक, **पुरोडाश**--यज्ञाचें हविर्द्रव्य, **पचत**--शामित्रादिशाला ( पशुबंधनादि शाला ), **अवभृथ**—यज्ञाच्या शेवटचें स्नान, **स्वगाकार**--शंयुवाक ( तच्छंयो० या ऋचेचा तृतीय सवन ), हे यज्ञसाधनभूत सर्व पदार्थ मला प्राप्त असोत. ८.

अग्निश्चमे घर्मश्चमेर्कश्चमे सूर्यश्चमे ाणश्चमेश्वमेधश्चमे पृथिवीचमेदितिश्चमेदितिश्चमे द्यौश्चमेशक्करीरंगुलयोदिशश्चमे यज्ञेन-

**अग्नि**--चयनसंबंधी अग्नि, **घर्म**—प्रवर्ग्य (मृन्मय पात्र विशेष), **अर्क-सूर्य-प्राण-अश्वमेध**—हे याग विशेष आहेत. **पृथिवी-दिति-अदिति-द्यौ**—ह्या चार

कल्पंतामृक्चमे सामचमे स्तोमश्चमे यजुश्चमेदीक्षाचमे तपश्चमे ऋतुश्चमे व्रतंचमेहोरात्रयोर्वृष्ट्या बृहद्रथंतरेचमे यज्ञेन कल्पे-ताम् ॥ ९ ॥

देवता आहेत. शक्करी—छंद किंवा कर्तृत्वशक्ति, अंगुलि—अंगुलीसारखे विराट् पुरुषाचे अवयव, दिक्—प्राची आग्नेयी इत्यादि सर्व दिशा, यज्ञेन कल्पंताम्—माझ्या यज्ञांत आपआपल्या व्यापाराविषयीं समर्थ होतात. ऋक्—ऋग्वेदांतील मंत्र, साम—सामवेदांतील मंत्र, स्तोम—स्तोत्र, यजुः—यजुर्वेद, दीक्षा—यज्ञकर्त्याचा संस्कार, तपः—पापनाशाकरितां इंद्रियनिग्रहादि, ऋतु—वसंतादि, व्रत—नियम, अहोरात्रयोः-वृष्ट्या—अहोरात्र वृष्टीनें माझ्या यज्ञांत धान्यादि उद्भिज्ज पदार्थ असोत, आणि बृहत्-रथंतर—हीं दान सामें माझ्या यज्ञांत आपल्या कार्यास समर्थ असोत. ९

गर्भाश्चमे वत्साश्चमे त्र्यविश्चमे त्र्यवीचमे दित्यवाट्चमेदि-त्यौहीचमे पंचाविश्चमे पंचावीचमे त्रिवत्सश्चमेत्रिवत्साचमेतुर्य-वाट्चमेतुर्यौहीचमे पष्ठवाच्चमे पष्ठौहीचम उक्षाचमेवशाचमऋ-षभश्चमेवहच्चमेनड्वान्चमेधेनुश्चम आयुर्यज्ञेन कल्पतां प्राणो यज्ञेन कल्पतामपानो यज्ञेन कल्पतां व्यानो यज्ञेन कल्पतां चक्षुर्यज्ञेन कल्पताꣳश्रोत्रं यज्ञेन कल्पतां मनोयज्ञेन कल्पतां वाग्यज्ञेन कल्पतामात्मायज्ञेन कल्पतां यज्ञोयज्ञेनकल्पताम्॥ १० ॥

गर्भ—उदरांतील गर्भ, वत्स—एक वर्षाचा वृषभ व गाय, त्र्यवि—दीड वर्षांचा वृषभ, त्र्यवी—दीड वर्षांची गाय, दित्यवाट्—दोन वर्षांचा वृषभ, दित्यौ--दोन वर्षांची गाय, पंचावि--अडीच वर्षांचा, पंचावी--अडीच वर्षांची, त्रिवत्स—तीन वर्षांचा, त्रिवत्सा--तीन वर्षांची, तुर्यवाट्—साडेतीन वर्षांचा, तुर्यौही—साडेतीन वर्षांची, पष्ठवाट्—चार वर्षांचा, पष्ठौही—चार वर्षांची, उ-क्षन्--गर्भनिषेक करण्यास समर्थ असा वृषभ, वशा--वांझ गाय, ऋषभ—उक्षा-पेक्षां वयानें मोठा वृषभ, वेहत्—जिच्या गर्भाचा नाश होतो अशी ( गाभडणारी ) गाय, अनड्वान्--शकट ओढणारा वृषभ, धेनु--नवीन व्यालेली गाय, हे सर्व पदार्थ मला प्राप्त असोत. आयु—आयुष्य, प्राण—हृदयगतवायु, अपान—गुदस्थ

वायु, व्यान--सर्व शरीरगत वायु, चक्षुः--नेत्रेंद्रिय, श्रोत्र--कर्णेंद्रिय, मनः--अंतःकरण, वाक्--वाचा, आत्मा--शरीर, यज्ञ--पुढें करावयाचा यज्ञ, हे पदार्थ मी आतां स्तुत्यादिरूप यज्ञ करीत आहे ह्या यज्ञानें पुढें करावयाच्या अश्वमेधादि यज्ञांत आपआपल्या कार्याविषयीं समर्थ असोत.

एकाचमे तिस्रश्चमे पंचचमे सप्तचमे नवचम एकादशचमे त्रयोदशचमे पंचदशचमे सप्तदशचमे नवदशचम एकविꣳशतिश्चमे त्रयोविꣳशतिश्चमे पंचविꣳशतिश्चमे सप्तविꣳशतिश्चमे नवविꣳशतिश्चम एकत्रिꣳशच्चमे त्रयस्त्रिꣳशच्चमे चतस्रश्चमेष्टौचमे द्वादशचमे षोडशचमे विꣳशतिश्चमे चतुर्विꣳशतिश्चमेष्टाविꣳशतिश्चमे द्वात्रिꣳशच्चमे षट्त्रिꣳशश्चमे चत्वारिꣳशच्चमे चतुश्चत्वारिꣳशच्चमे ष्टाचत्वारिꣳशच्चमे वाजश्चप्रसवश्चापिजश्चक्रतुश्च सुवश्चमूर्धाच व्यश्नियश्चात्यायनश्चात्यश्च भौवनश्च भुवन श्चाधिपतिश्च ॥ ११ ॥

एक, तीन, पांच, ७, ९, ११, १३, १५, १७, १९, २१, २३, २५, २७, २९, ३१, व ३३ ह्या संख्यापरिमित अक्षरांचे छंद देवांस प्रिय आहेत ते मला प्राप्त असोत. चार, आठ, १२, १६, २०, २४, २८, ३२, ३६, ४०, ४४ व ४८ ह्या संख्यापरिमित अक्षरांचे छंद मनुष्यांस प्रिय आहेत ते मला प्राप्त असोत. वाजः—प्रसव—अन्न व त्याची उत्पत्ति, अपिज--अन्नाची पुनः पुनः उत्पत्ति, क्रतु--स्वर्गादिकांच्या प्राप्तीविषयीं संकल्प अथवा यज्ञ, सुवः--यज्ञाच्या उत्पत्तीस हेतुभूत आदित्य, मूर्धन्—उत्तम उपभोग्य पदार्थ, व्यश्निय—अत्यंत व्यापक किंवा उत्तम भक्षणीय पदार्थ, अंत्यायन--पूर्वी उत्पन्न झालेला पदार्थ, अंत्य—पुढें उत्पन्न होणारा पदार्थ, भौवन—आतां उत्पन्न होत असणारा पदार्थ, भुवन--स्वर्गादि लोक, अधिपति--ईश्वर, हे पदार्थ मला प्राप्त होवोत. ११

इडा देवहूर्मनुर्यज्ञनी बृहस्पतिरुक्थामदानिशꣳसिषद्विश्वेदेवाः सूक्तवाचः पृथिविमातर्मामाहिꣳसीर्मधु मनिष्येमधु जनिष्येमधु

जी देवांची गाय आहे ती आमच्या यज्ञांत देवांचें आव्हान करणारी असो. जो मनु आहे तो यज्ञाविषयीं प्रवर्तक असो. जो बृहस्पति आहे तो उक्थामदसंज्ञक

वक्ष्यामिमधुं वदिष्यामिमधुंमतीं देवेभ्योवाचंमुद्यासꣳशुश्रूषेण्यांमनुष्येभ्यस्तंमादेवाअवंतुशोभायैपितरोनुं मदंतु॥ ओं शांतिः शांतिः शांतिः

इति रुद्रः

---

शस्त्रें पठन करणारा असो. जे विश्वेदेव आहेत ते सूक्तें पठन करणारे असोत. हे पृथिवीमाते, तूं इडादि ( देवांची गाय इत्यादि ) देवांच्या अनुग्रहानें निरपराधी असणाऱ्या मला मारूं नको. तुझ्या कृपेनें मी उत्तम कार्याचें चिंतन करीन. उत्तम कर्माचें फल उत्पन्न करीन. उत्तम हविर्द्रव्य देवांस अर्पण करीन. मधुरवाक्य ( यज्ञांतील प्रतिगररूप ) बोलेन. देवांस प्रिय अशी वाणी ( उक्थशस्त्रात्मक ) बोलेन. मनुष्यांस श्रवण करावयास अत्यंत प्रिय अशी वाणी बोलेन. असें बोलणाऱ्या मला उत्तम बोलण्याकरितां ( बोलण्यांत चुका न याव्या म्हणून ) देव रक्षोत. आणखी मला बोलावयास पितर अनुमोदन देवोत ( ही वाणी चांगली आहे असें म्हणोत ). ओं शांतिः— त्रिविध तापाची शांति असो.

रुद्र [ समाप्त ].

---

## अथ वेदाभ्यासविधिः

दक्षः—दिवसस्याद्यभागे तु सर्वमेतत्समाचरेत्। द्वितीये च तथा भागे वेदाभ्यासो विधीयते ॥ १ ॥ वेदस्वीकरणं पूर्वविचारोऽभ्यसनं जपः । तद्दानं चैवशिष्येभ्यो वेदाभ्यासोहि पंचधेति ॥ २ ॥

### वेदाभ्यासाचा विधि.

दक्ष—प्रातःसंध्या, नित्यहोम व देवपूजा हीं सर्व कर्में तीस घटका दिवसाच्या पहिल्या आठव्या भागांत करून दुसऱ्या भागांत वेदाचा अभ्यास करावा. १. वेदमंत्रांचा यथाविधि प्रथमतः अर्थसहित गुरूपासून उपदेशरूपानें अंगीकार करणें, अंगीकृत मंत्रांचा विचार करणें, विचारानें अर्थविषयीं निश्चित बुद्धि झाल्यावर मंत्रांची धारणा होण्याकरितां ऋक्शः, वर्गशः इत्यादि क्रमानें पुनः पुनः आवृत्तिरूप

परिश्रम करणें, नित्यनैमित्तिककर्मद्वारा पुण्यरूप फलप्राप्तीकरितां ब्रह्मयज्ञादिकांत जप करणें आणि धर्मबुद्धीनें शिष्यांस उपदेश करणें ( शिकविणें ), ह्या पांच प्रकारच्या कर्मोसच वेदाभ्यास असें म्हणतात. "हें वेदाभ्यासकर्म अनेक दिवससाध्य आहे." २

ऋक्संहितायाम्—उतत्वः पस्यन्नददर्श वाचमुतत्वः शृण्वन्नशृणोत्येनाम्। उतोत्वस्मै तन्वं १ विसस्रे जायेवपत्य उशती सुवासा इति ॥ ३ ॥

ऋग्वेदसंहितेंत—कोणीं लिहिलेली वेदवाणी ज्या मूर्खास वाचतां येत नाहीं त्यानें डोळ्यांनीं जरी पाहिली तरी ती न पाहिल्यासारखीच होय. कोणीं पठित केलेली वेदवाणी ज्या मूर्खास अर्थ समजत नाहीं त्यानें कानांनीं जरी ऐकली तरी ती न ऐकल्या सारखीच होय. जो विद्वान आहे त्यासच ही वेदवाणी शब्दार्थोभयात्मक स्वकीय शरीर प्रकाशित करते. ह्यास दृष्टांत—जशी उत्तम वस्त्रादि भूषणांनीं अलंकृत व संभोगाची इच्छा करणारी कुलीन भार्या आलिंगनादि क्रीडावेत्त्या स्वकीय पतीसच हावभावयुक्त स्वशरीर प्रकाशित करते तशी, वेदवाणी विद्वानासच आपलें यथार्थ शरीर दाखविते अविद्वानास दाखवीत नाहीं. ह्यासाठीं अर्थविचारपूर्वक वेदाभ्यास करावा हें तात्पर्य. दुसरा अर्थ—कोणीं लिहिलेली वेदवाणी द्विजानेंही जरी पाहिली ( वाचली ) तरी ती यथाशास्त्र गुरूच्या उपदेशाशिवाय पठन केली असतां पठनजन्य पुण्यरूप फळ देत नाहीं म्हणून न पाहिल्यासारखीच ( निष्फळ ) होय. कोणीं विप्रानेंही म्हटलेली वेदवाणी शूद्रादि अनधिकाऱ्यानें जरी श्रवण केली तरी ती अनधिकाऱ्यास श्रवणादिकांनीं दोष देणारी म्हणून श्रवण न करणें हेंच उत्तम होय. जो अधिकारी (द्विज) यथाशास्त्र गुरूपदेशपूर्वक वेदवाणीचा अर्थ विचारसहित अभ्यास करतो त्यासच ही वेदवाणी शुभज्ञानसाधनभूत शब्दार्थरूप स्वकीय तनु प्रकाशित करते. ह्याविषयीं उपमा—जशी उत्तम वस्त्रादि अलंकारांनीं भूषित व सुरत इच्छिणारी कुलीन वधू यथाविधि स्वकीय पाणिग्रहण करणाऱ्या पतीसच आपली तनू दाखविते. इतर पुरुष अभिलाष करील तर त्यास तनू न दाखवितां शाप मात्र देते तशी वेदवाणी शास्त्रमार्गानें अभ्यास करणाऱ्या अधिकाऱ्यासच उत्तम फळ देते आणि अनधिकाऱ्यास यत्किंचितही फळ न देतां दूषित मात्र करते. ह्या साठीं द्विजानेंच वेदांचें पठन करावें इतरानें करूं नये. ३.

याज्ञवल्क्यः—पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्रांगमिश्रिताः ।
वेदा स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दशेति ॥ ४ ॥
मनुः—बुद्धिवृद्धिकराण्याशु धन्यानि च हितानि च । नित्यं
शास्त्राण्यवेक्षेत निगमांश्चैव वैदिकान् ॥ ५ ॥ यथायथाहि
पुरुषः शास्त्रं समधिगच्छति । तथा तथा विजानाति विज्ञानं
चास्य रोचत इति ॥ ६ ॥

## इति वेदाभ्यासविधिः

---

**याज्ञवल्क्य**--ज्यांपासून चतुर्विध पुरुषार्थांच्या साधनांविषयीं ज्ञान होतें त्यांस विद्या असें म्हणतात. पुराण ह्मणजे ब्राह्मादि, न्याय म्ह० तर्कशास्त्र, मीमांसा म्ह० वेदवाक्यांचा विचार करण्यास प्रवृत्त झालेलें शास्त्र, धर्मशास्त्र म्ह० मनु, अत्रि इत्यादिकांनीं प्रणीत केलेलें शास्त्र, व्याकरणादि सहा अंगें आणि चार वेद हे चवदा ग्रंथ विद्यांस आश्रयभूत आहेत आणि धर्मास तर प्राधान्यतः कारणीभूत आहेत ह्मा करितां ब्राह्मणांनीं निरपेक्ष बुद्धीनें ह्यांचें अध्ययन करावें. ४. **मनु**--वेदांस विरुद्ध नाहींत अशीं, बुद्धीस त्वरित वाढविणारीं न्यायादिकशास्त्रें, अर्थ संपादनाविषयीं शुक्रनीत्यादिकशास्त्रें, दृष्टिगोचर हित करणारीं वैद्यक ज्यौतिषादिकशास्त्रें आणि वेदार्थांचें ज्ञान करणारे निगमाख्य ग्रंथ ह्यांचें निरंतर विप्रानें अवलोकन करावें. ५. पुरुष जसा जसा शास्त्राचा अभ्यास करतो तसा तसा अत्यंत ज्ञानवान होऊन शिल्पादि विद्यांविषयींही सहज ज्ञाता होतो. ६.

याप्रमाणें वेदाभ्यासाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ धनसंपादनविधिः

दक्षः—तृतीये च तथा भागे पोष्यवर्गार्थसाधनम् । गृहस्थस्तु सदा युक्तो धर्ममेवानुचिंतयेत् । पोष्यवर्गार्थसिध्यर्थं धनमिच्छेत बुद्धिमान् ॥ १ ॥ माता पिता गुरुर्भार्या प्रजाहीनः समाश्रितः। अभ्यागतोऽतिथिश्चाग्निः पोष्यवर्ग उदाहृत इति॥२॥ याज्ञवल्क्यः—इज्याध्ययनदानानि वैश्यस्य क्षत्रियस्य च । प्रतिग्रहोऽधिकोविप्रे याजनाध्यापने तथेति ॥ ३ ॥ मनुः--षण्णां तु कर्मणामस्य त्रीणि कर्माणि जीविका । याजनाध्यापने चैव विशुद्धाच्च प्रतिग्रह इति ॥ ४ ॥ याज्ञवल्क्यः--विद्यातपोभ्यां हीनेन न तु ग्राह्यः प्रतिग्रहः । गृण्हन्प्रदातारमधोनयत्यात्मानमेव चेति ॥ ५ ॥

## द्रव्य मिळविण्याचा विधि.

दक्ष—बुद्धिमान गृहस्थानें पोष्यवर्गाविषयीं द्रव्य संपादन करणें हा एक धर्मच आहे असें समजून दिवसाच्या तिसऱ्या अष्टमांशांत अथवा यथावकाशांत अनेक युक्तींनीं पोष्य वर्गाच्या पोषणरूप अर्थाची सिद्धि होण्याकरितां धन संपादन करावयास यत्न करावा. १. माता, पिता, गुरु म्हणजे आचार्य किंवा वृद्धजन, भार्या, अपत्यादि संतति, अनाथ, आपल्याच आधारानें राहिलेला, पूर्वीं कधींही न आलेला असा पाहुणा, एकत्र राहणारा पाहुणा आणि गृह्याग्नि ह्या समुदायास पोष्यवर्ग असें म्हणतात २. याज्ञवल्क्य--यज्ञ करणें, वेदादिकांचें अध्ययन करणें आणि दान करणें हीं तीन कर्में क्षत्रियास व वैश्यास विहित आहेत. आणखी यज्ञादि तीन कर्में व दान घेणें, ऋत्विज कर्म करणें आणि शिष्यांकडून वेदादिकांचें अध्ययन करविणें अशीं सहा कर्में ब्राह्मणांस विहित आहेत. ३. मनु--ह्या यज्ञादि सहा कर्मांमध्यें, ऋत्विज कर्मानें धन संपादन करणें, धर्मबुद्धीनें शिष्यांस विद्या शिकवून ते विद्वान झाल्यावर प्रत्युपकार बुद्धीनें जें द्रव्य देतील तें ग्रहण करणें आणि न्यायानें धनसंपादन करणाऱ्या यजमानापासून प्रतिग्रह घेणें हीं तीन कर्में ब्राह्मणांच्या उदरनिर्वाहाविषयीं साधनभूत आहेत. ४. याज्ञवल्क्य—वेदशास्त्रादि विद्येनें व नित्य नैमित्तिक कर्माचरणरूप तपानें जो ब्राह्मण विहीन आहे त्यानें दान घेऊं नये, जर दान घेईल तर यजमानास आणि आपणास अधोलोकास नेईल ५.

मनुः--विद्याशिल्पं भृतिः सेवा गोरक्ष्यं विपणिः कृषिः । धृतिर्भैक्ष्यं कुसीदं च दश जीवनहेतवः ॥ ६ ॥ यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् । यद्यदात्मवशं कर्म तत्तत्सेवेत यत्नतः ॥ ७ ॥ सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् । एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोरिति ॥ ८ ॥

## इति धनसंपादनविधिः

---

मनु—शिलोंछादि निरपेक्ष वृत्तीनें ब्राह्मणाचा चरितार्थ होत नसल्यास त्यानें उदरनिर्वाहाकरितां इतर कर्मांचाही स्वीकार करावा तीं अशीं—वैद्यकादि विद्या, शिवणें, कोरणें, विणणें, लिहिणें इत्यादि कौशल्य, साधारण स्वतंत्रपणानें ( मक्त्यानें, वकिलातीनें इत्यादि रीतीनें ) दुसऱ्याचें काम करणें, चाकरी, गोवारीपणा करणें ( गुरें राखणें ), धान्यादिकांचा व्यापार करणें, शेतकी, स्वतंत्र वृत्तीनें जें मिळेल त्यावरच धैर्य धरून निर्वाह करणें, भिक्षा आणि कर्ज देऊन व्याज घेणें ही दहा कर्में संकटसमयीं जीविकेस हेतुभूत आहेत. ६ "जेणेंकरून स्वतंत्रतेनें निर्वाह होईल तेंच कर्म यत्नानें स्वीकारावें, त्यापासून जरी अल्प लाभ झाला तरी तोच विशेष सुखावह आहे असें सांगतो." जें जें परतंत्र कर्म असेल तें तें यत्नानें टाकावें, आणि जें जें स्वतंत्र कर्म असेल तें तें यत्नानें स्वीकारावें. ७. जितका परतंत्रपणा तितकें सर्व दुःख आणि जितका स्वतंत्रपणा तितकें सर्व सुख होय. हें संक्षेपानें सुखदुःखाचें लक्षण समजावें. ८.

याप्रमाणें द्रव्य मिळविण्याचा विधि [ सांगितला ].

---

## अथ मध्यान्हस्नानविधिः

दक्षः--चतुर्थे तु दिवाभागे स्नानार्थं मृदमाहरेत् । समित्पुष्पकुशादींश्च स्नायाच्चाकृत्रिमे जल इति ॥ १ ॥

## मध्यान्हस्नानाचा विधि

दक्ष--दिवसाच्या चवथ्या अष्टमांशांत स्नानादिकांकरितां मृत्तिका, समिधा, फुलें, दर्भ, इत्यादि अपेक्षित उपयुक्त पदार्थ आणून नदी तळें वगैरे अशा स्वतःसिद्ध उदकांत स्नान करावें. १.



## मध्यान्हस्नानाचा विधि.

गृह्यपरिशिष्टे—अथ मध्यंदिने तीर्थमेत्य वरुणप्रार्थनादि-तर्पणांतेनोक्तविधिना स्नायान्नास्मिन्प्राग्ब्रह्मयज्ञांगतर्पणाद्वस्त्रं निष्पीडयेदपुत्रादयोह्यंते तर्प्या इत्येष स्नानविधिरिति ॥ २ ॥

इति मध्याह्नस्नानविधिः

---

गृह्यपरिशिष्टांत—पूजावेदाभ्यासादि कर्म झाल्यानंतर मध्यान्हकाळीं नद्यादि तीर्थावर जाऊन प्रातःस्नानादितर्पणांतकर्माविषयीं सांगितलेल्या प्रातःस्नानविधीनें स्नान करावें, आणि देवऋषिपितृतर्पण करून अपुत्रक पितरांचें व यक्ष्म्याचें तर्पण करावें ह्या मध्यान्हस्नानसंबंधी वस्त्राचें निष्पीडन ब्रह्मयज्ञानंतर करावयाचें तर्पण झाल्याशिवाय करूं नये. हा स्नानविधि होय.

याप्रमाणें मध्यान्हीं स्नानाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ मध्यान्हस्नानम्.

ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं मध्याह्नस्नानं करिष्ये ॥१॥ तत्वायाम्युदुत्तममित्यनयोराजीगर्तिः शुनः शेपो-वरुणस्त्रिष्टुप् ॥ वरुणावाहनेविनियोगः ॥२॥ ओं तत्वांयामि० प्रमोषीः ॥ ओमुदुत्तमं वरुण० स्याम ॥ ३ ॥ ओंश्रीकेशवाय नमः ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ४ ॥ आपोहिष्ठेति नवर्चस्य० मार्जने विनियोगः ॥ ओमापोहिष्ठा० स्रंजवर्चसा ॥ ५ ॥ इमं मे इत्यस्याः० जगतीअंभआलोडने विनियोगः ॥ ओमिमंमें० सुषोमया ॥ ६ ॥ ऋतं चेति० अनुष्टुप् ॥ अघमर्षणे विनियोगः ॥ ऋतं चं० मथोस्वः ॥ ७ ॥ द्रुपदा० मैनसः ॥ ८ ॥ ब्रह्मादयोयेदेवास्तान्देवांस्तर्पयामि० यक्ष्माणं तर्पयाम्यहम् ॥ ९ ॥

इति मध्यान्हस्नानम्

---

## मध्यान्हस्नान.

प्रातःस्नानप्रकरणांत अर्थ लिहिला. (पृष्ठ ४६–४७–४८–४९ पहा) १–२–३–४–५–६–७–८–९.

यांप्रमाणें मध्यान्हस्नान [ सांगितलें ]

---

## अथ मध्यान्हसंध्याविधिः

अत्रिः—स्नानं माध्यान्हिकं कृत्वा संध्याकर्म निवर्त्यच । ब्रह्मयज्ञं विधायाथ गृहमेत्याचरेत्परानिति ॥ १ ॥ शंखः—प्रातःसंध्यां सनक्षत्रां मध्यमां स्नानकर्मणि । सादित्यां पश्चिमां संध्यामुपासीत यथाविधीति ॥ २ ॥ गृह्यपरिशिष्टे—अथ मध्यंदिने त्वापः पुनंत्विति मंत्राचमनमाकृष्णीयया हंसवत्या वा त्रिःसकृद्वार्घ्यमुत्क्षिपेदुद्बाहुरुन्मुखउदुत्यं जातवेदसं चित्रं देवानामिति सूक्ताभ्यां तच्चक्षुरित्येकयादित्यमुपस्थाय जपमासीनो यथेष्टकालं कुर्यादिति ॥ ३ ॥

इति मध्यान्हसंध्याविधिः

---

## मध्यान्हसंध्येचा विधि.

**अत्रि**— गंगा गोदावरी इत्यादि तीर्थावर मध्यान्हस्नान, मध्यान्हसंध्या, आणि ब्रह्मयज्ञ तर्पण करून नंतर घरीं जाऊन वैश्वदेवादि कर्मे करावीं. १. **शंख** —शास्त्रमार्गानें सूर्योदया पूर्वी नक्षत्रें दिसत असतां प्रातःसंध्येस आरंभ करावा, मध्यान्हस्नान झाल्यावर मध्यान्हसंध्या करावी आणि संध्याकाळीं सूर्य दिसत असतां सायंसंध्येस प्रारंभ करावा. २. **गृह्यपरिशिष्टांत**—मध्यान्हसंध्येमध्यें प्रथम मार्जन झाल्यानंतर ‘ आपः पुनंतु ’ ह्या मंत्रानें मंत्राचमन घ्यावें. ‘ आकृष्णीयेन ’ अथवा ‘ हंसः शुचि ’ ह्या ऋचेनें तीनदां किंवा एकदां अर्घ्य निवेदन करावें. आणि ऊर्ध्वबाहु ( वर हात करून ) उभा राहून ‘ उदुत्यं जातवेदसं, चित्रं देवानां ’ ह्या सूक्तांनीं व ‘ तच्चक्षुर्देव हितं ’ ह्या ऋचेनें सूर्याचें उपस्थान करून आसनावर बसून यथावकाश जप करून संध्या समाप्त करावी. ३

यांप्रमाणें मध्यान्हसंध्येचा विधि [ सांगितला ].

---

## अथ मध्यान्हसंध्या.

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ इति द्विराचम्य ॥ प्रणवस्य० प्राणायामे विनियोगः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ एवं त्रिः ॥ १ ॥ ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं मध्यान्हसंध्यामुपासिष्ये ॥ २ ॥ आपोहिष्ठेतित्र्यृचस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोगायत्री ॥ मार्जने विनियोगः ॥ ओमापोहिष्ठामयो भुवः० जनयथाचनः ॥ ३ ॥ आपः पुनन्त्वित्यस्य नारायण आपोऽष्टिः मंत्राचमने विनियोगः ॥४॥ ओमापः पुनंतु पृथिवीं पृथिवी पूता पुनातु माम्॥ पुनंतु ब्रह्मणस्पति ब्रह्म पूता पुनातुमाम् ॥ यदुच्छिष्टमभोज्यं यद्वा दुश्चरितं मम । सर्वं पुनंतु मामापो सतां च प्रतिग्रहꣳस्वाहा ॥ ५ ॥ ओं श्रीकेशवाय नमः ओं श्रीकृष्णाय नमः॥ ओं भूः० स्वरोम् ॥६॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवीगायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापति बृहती ॥ मार्जने विनियोगः॥ ओं भूर्भुवः स्वः ॥७॥

### मध्यान्हसंध्या.

पूर्वी अर्थ लिहिला १-२-३. ह्या मंत्राचा नारायणऋषि, उदकदेवता, अष्टिछंद आणि मंत्राचमनाकडे उपयोग. ४. जीं उदकें आहेत तीं पृथिवीस प्रक्षालनानें शुद्ध करोत, ती शुद्ध झालेली पृथिवी मला ( अनुष्ठानकर्त्यास ) शुद्ध करो. तसेंच निरंतर पठनरूपानें वेदाचें पालन करणाऱ्या आचार्यास उदकें शुद्ध करोत. त्या आचार्यानें उपदिष्ट केलेलें वेदस्वरूप आपण शुद्ध असतां मला आणखी शुद्ध करो. जें इतराचें उच्छिष्ट तें भक्षण करावयास अयोग्य परंतु कदाचित् तें मी भक्षण केलें असेल, अथवा दुसरें कांहीं प्रतिषिद्ध कर्म आचरण केलें असेल, त्या उभय कर्मजन्य माझ्या पापाचा उदकें परिहार करून मला शुद्ध करोत, आणि अदत्तादायी शूद्र इत्यादिक असाधूंपासून जें मीं दान घेतलें असेल तज्जन्य पापापासून सोडवून उदकें मला शुद्ध करोत; यासाठीं ( उदकांनीं माझी पुनः पुनः शुद्धि करावयाकरितां ) ह्या अभिमंत्रित केलेल्या उदकाचा मी माझ्या मुखरूप अग्नींत होम करतों. ५ अर्थ लिहिला ६-७-८-९-१०-११-१२. हंसः—या मंत्राचा गौतमपुत्र

गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ मार्जने विनियोगः ॥ ओं तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो योनः प्रचोदयात् ॥ ८ ॥ आपोहिष्ठेति नवर्चस्य सूक्तस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोगायत्री पंचमी वर्धमाना सप्तमी प्रतिष्ठान्त्ये द्वे अनुष्टुभौ मार्जने विनियोगः ॥ ओंमापोहिष्ठामयो० तंमासंसृज वर्चसा ॥ ९ ॥ गायत्रीशिरसः प्रजापतिर्ब्रह्माग्निवाय्वादित्या यजुरात्मपरिषेचने विनियोगः ॥ ओमापो ज्योतीरसोमृतं ब्रम्हभूर्भुवः स्वरोम् ॥ १० ॥ ऋतं चेतित्र्यृचस्याघमर्षणो भाववृत्तोऽनुष्टुप् ॥ अघमर्षणे विनियोगः ॥ ओमृतं च सत्यं० मथोस्वः ॥ ११ ॥ ओं श्रीकेशवायनम० ओं श्रीकृष्णायनमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ १२ ॥ हंसः शुचिषदितिमंत्रस्य गौतमो वामदेवः सूर्यो जगती ॥ अर्घ्यनिवेदने विनियोगः ॥ १३ ॥ ओं हंसः शुचिषद्वसुरंतरिक्षसद्धोतावेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥ नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जागोजाऋतजा अद्रिजा ऋतम् ॥ ओं श्रीसूर्यायेदमर्घ्यं समर्पयामि ॥ एवं त्रिः ॥ १४ ॥ ओमसावादित्योब्रह्म ॥ १५ ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ १६ ॥

वामदेव ऋषि, सूर्यदेवता, जगतीछंद व अर्घ्यनिवेदना विषयीं विनियोग. १३. हंसः- या ऋचेचा अर्थ, सौरांत लिहिला आहे. १४-१५-१६.

उदुत्यमितित्रयोदशर्चस्य सूक्तस्य काण्वः प्रस्कण्वऋषिः ॥ सूर्योदेवता ॥ नवाद्यागायत्र्योऽन्त्या अनुष्टुभः ॥ चित्रं देवानामिति षडृचस्य सूक्तस्यांगिरसः कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ तच्चक्षुरित्यस्याः प्रगाथः सूर्य उष्णिक् ॥ सूर्योपस्थाने विनियोगः ॥ १७ ॥

'उदुत्यं जातवेदसं' हें तेरा ऋचांचें सूक्त व 'चित्रं देवानामुदगादनीकं' हें सहा ऋचांचें सूक्त अशीं दोन्ही सूक्तें सौरांत लिहिलीं आहेत म्हणून येथें पुनः लिहिलीं नाहींत, आणि ह्या दोन सूक्तांचा व 'तच्चक्षुर्देवहितं' ह्या ऋचेचा अर्थही तेथेंच लिहिला आहे. [ सौरपृष्ठ ९३-९४-९५-९६ व ९९ पहा ] १७.

ओं मुदुत्यं जातवेदसं० अहं द्विषतेरधम् ॥ १८ ॥ ओं चित्रं देवानामुदगादनीकं० सिंधुः पृथिवी उतद्यौः ॥ १९ ॥ तच्चक्षुर्देवहितं शुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् ॥ २० ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ आसन उपवेशने विनियोगः ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ २१ ॥ प्रणवस्य० प्राणायामे विनियोगः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ एवं त्रिः ॥ २२ ॥ समस्तव्याहृतीनां० बृहती ॥ आत्माभ्युक्षणे विनियोगः ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ २३ ॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापति र्बृहती ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ जपे विनियोगः ॥ तत्सवितु हृदयाय नमः० अस्त्रायफट् ॥ २४ ॥ युवतीं युवादित्यमंडलस्थां श्वेतवर्णां श्वेतांबरानुलेपनस्रगाभरणां पंचवक्त्रां प्रतिवक्त्रं त्रिनेत्रां चंद्रशेखरां त्रिशूलखड्गखट्वांगडमरुकांकचतुर्भुजां वृषभासनारूढां रुद्रदैवत्यां यजुर्वेदमुदाहरंतीं भुवर्लोकाधिष्ठात्रीं सावित्रीं नाम देवतां ध्यायामि ॥ २५ ॥ आगच्छ वरदे देवि जपे मे सन्निधौ भव । सवितारं द्योतयसे सावित्री त्वं ततः स्मृता ॥ २६ ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ तत्सवितुर्वरेण्यम् ॥ भर्गोदेवस्य धीमहि ॥ धियो योनः प्रचोदयात् ॥ २७ ॥ तत्सवितुर्हृदयाय नमः० अस्त्रायफट् ॥ २८ ॥ प्राच्यै

१८-१९-२०-२१-२२-२३-२४. तरुणावस्था धारण करणारी मध्यान्हकाळच्या सूर्यमंडलांत उपलक्षित होणारी, जिचा शुभ्र वर्ण अशी, शुभ्र अशीं वस्त्रें, उटी, माळा व अलंकार यांस धारण करणारी, पंचमुखी, जिच्या प्रत्येक मुखास तीन तीन नयनें आहेत अशी, मस्तकावर चंद्र धारण करणारी, जिचे चार हात त्रिशूळ, खड्ग, खट्वांग ( बाजेचा पावका ) व डमरु या आयुधांनीं युक्त आहेत अशी, वृषभासनावर बसलेली, रुद्रात्मक दिव्यमूर्ति, यजुर्वेदाचें पारायण करणारी, आणि भुवर्लोकांत राहणारी अशा सावित्रीनामक संध्यादेवतेचें मी ध्यान करतों. २५ हे मनोरथ पूर्ण करणारी देवि, मी जप करीत असतां तूं माझ्या सन्निध रहा; तूं भक्तांस ज्ञानरूप प्रकाश देऊन त्यांजकडून सवितृब्रह्मविषयक साक्षात्कार करवितेस म्हणून तुला सावित्री असें म्हणतात. यासाठीं आपले भक्तांकडून ब्रह्मसाक्षात्कार करविण्याचें बिरुद

दिशे चेंद्राय नमः० सर्वाभ्यो देवताभ्यो नमः ॥ २९ ॥ उत्तमे० सुखम् ॥ ३० ॥ ओं भद्रं नोऽअपिवातय मनः ॥ ३१ ॥ ओं शांतिः शांतिः शांतिः ॥ आसत्य० नमो नमः ॥ ३२ ॥ स्योना० सप्रथः ॥ अमुक० त्वामभिवादयामि ॥ ३३ ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः इति द्विः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ३४ ॥ अनेन मध्यान्हसंध्याख्येन कर्मणा श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ ३५ ॥

इति मध्यान्हसंध्या.

---

( वृद ) तुला रक्षण करणें अवश्य आहे. २६-२७-२८-२९-३०-३१-३२-३३-३४-३५.

याप्रमाणें मध्यान्हसंध्या [ सांगितली ].

---

## अथ ब्रह्मयज्ञतर्पणविधिः

मनुः—पंचसूना गृहस्थस्य चुल्ही पेषण्युपस्करः ॥ कंडणी चोदकुंभश्च बध्यते यास्तु वाहयन् ॥ १ ॥ तासां क्रमेण सर्वासां निष्कृत्यर्थं महर्षिभिः ॥ पंच कॢप्ता महायज्ञाः प्रत्यहं गृहमेधिनाम् ॥ २ ॥

## ब्रह्मयज्ञतर्पणविधि.

मनु—गृहस्थाच्या घरांत चूल आहाळ इत्यादि पाकसाधन, जातें पाटावरवंटा इत्यादि पिष्ट करण्याचें साधन, केरसुणी खराटा कुंचा इत्यादि गृहशुद्धि करण्याचें साधन, उखळ मुसळ इत्यादि कांडण्याचें साधन आणि घडा हंडा इत्यादि उदक ठेवण्याचें साधन, हीं पांच साधनें कृमिकीटादिकांची अलक्षित हिंसा होण्याविषयीं संभवनीय स्थळें आहेत. ज्या साधनांनीं तो स्वकीय कलत्रादिकांकडून शिजविणें, दळणें इत्यादि कार्यें करवीत असतां साहजिक घडलेल्या हिंसेनेंही दोषी होतो १. त्यासाठीं गृहस्थास त्या पांच साधनसंबंधी हिंसेच्या प्रायश्चित्ताकरितां वेद जाणणाऱ्या ऋषींनीं ब्रह्मयज्ञादि पांच महायज्ञ प्रतिदिवशीं कर्तव्यतेनें विहित केले आहेत. २.

अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् । होमोदैवोबलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनमिति ॥ ३ ॥ आश्वलायनः—स्वगृह्यविधिना कृत्वा ब्रह्मयज्ञं पुरा द्विजः । स्वाध्यायतर्पणाभ्यां च गृहमेत्याचरेत्परानिति ॥ ४ ॥ आश्वलायनसूत्रम्—अथ स्वाध्यायविधिः प्राग्वोदग्वा ग्रामान्निष्क्रम्याप आप्लुत्य शुचौ देशे यज्ञोपवीत्याचम्याक्लिन्नवासा दर्भाणां महदुपस्तीर्य प्राक्कूलानां तेषु प्राङ्मुख उपविश्योपस्थं कृत्वा दक्षिणोत्तरौ पाणी संधाय पवित्रवंतौ विज्ञायतेऽपां वा एष ओषधीनां रसो यद्दर्भाः सरसमेव तद्ब्रह्म करोति द्यावापृथिव्योः संधिमीक्षमाणः संमील्य वा यथा वा युक्तमात्मानं मन्येत तथा युक्तोऽधीयीत स्वाध्यायमोंपूर्वा व्याहृतयः सावित्रीमन्वाहपच्छोऽर्द्धर्चशः सर्वामिति तृतीयमिति ॥ ५ ॥

ते असे—ओंकार, तीन व्याहृती आणि पादशः, अर्धशः, व सर्व ऋचा अशी त्रिवार गायत्री ह्या मंत्रसमुदायाचें उपांशु पठन, ऋग्वेदादिकांचें यथाक्रमानें प्राप्त झालेलें अध्ययन, आणखी देव-ऋषि-पितरांचें तर्पण ह्या त्रिविध कर्मास ब्रह्मयज्ञ असें म्हणतात. वैश्वदेवामध्यें 'स्वधापितृभ्यः' ह्या मंत्रानें ओदनादि देऊन पितरांस तृप्त करणें अथवा नित्यश्राद्धानें तृप्त करणें ह्यास पितृयज्ञ असें म्हणतात. 'सूर्याय स्वाहा' इत्यादि मंत्रांनीं अग्नींत होम करणें ह्यास देवयज्ञ म्हणतात, सूर्यादि देवांतस बलिदान करणें ह्यास भूतयज्ञ म्हणतात, आणि सनकादिकांच्या उद्देशानें अतिथींची पूजा करून त्यांस ओदनादिकांचें 'हंत' असें उच्चारण करून दान करणें अथवा अग्नींत आहुति टाकणें त्या कर्मास नृयज्ञ असें म्हणतात, हे पंचमहायज्ञ होत ३ **आश्वलायन**—ब्राह्मणानें स्वकीय गृह्योक्तविधीनें, प्रणवव्याहृतिसहित तीन वेळां गायत्रीचें मनोमय पठन, क्रमप्राप्त वेदादिकांचें अध्ययन व देव, ऋषि व पितर यांचें तर्पण असा त्रिविध कर्मात्मक ब्रह्मयज्ञ तीर्थाच्या समीप प्रथम करावा, आणि गृहास जाऊन देवयज्ञादिक इतर चार यज्ञ करावे. ४ **आश्वलायनसूत्रांत**—आतां ब्रह्मयज्ञविधि सांगतों. ब्राह्मणानें दिवसाच्या चतुर्थ अष्टमांशांत गावाच्या बाहेर पूर्वदिशेस किंवा उत्तरदिशेस परंतु मुख्यत्वें करून मनुष्यादिउपद्रवरहित प्रदेशांत तीर्थाच्या तीरीं जाऊन उदकांत बुडी मारून यथाविधि मध्यान्हस्नान करावें, आणि वाळलेलें वस्त्र नेसून यज्ञोपवीती असतां मध्यान्हसंध्या झाल्यावर ब्रह्मयज्ञांगभूत आच-

मन करून शुचिर्भूत स्थळीं पुष्कळ दर्भ पूर्वेकडे ज्यांचीं अग्रें आहेत असे हांतरून त्यांवर पूर्वाभिमुख मुख असतां आकुंचित केलेल्या डाव्या पायाच्या पोटरीच्या मूळभागीं उजवें पाऊल ठेवून बसावें व उभय हस्तांमध्यें दोन दर्भ धरून दक्षिण हस्त वर होईल असा दक्षिण ( उजव्या ) गुडघ्यावर ब्रह्मांजलि करावा. दर्भ हा उदकांचा सारभूत व सर्व औषधींमध्यें श्रेष्ठ असा रसरूप पदार्थ आहे म्हणून आपण दर्भयुक्तच असतां ब्रह्मयज्ञ करावा. हा ब्रह्मयज्ञविधि श्रुतिप्रसिद्ध आहे. आणखी आकाश पृथिवीच्या मध्यभागीं दृष्टि करून अथवा नेत्र मिटून किंवा आपल्याला जसें समाधान वाटेल तसें सन्निविष्ट असतां ब्रह्मयज्ञसंबंधी अध्ययन करावें तें असें—ओंकार व तीन समस्तव्याहृति आणि एकश्रुतीनें पादशः, अर्धशः व सर्व ऋचा अशी त्रिवार गायत्री. ५

**विष्णुः**—प्रदक्षिणं समावृत्य नमस्कृत्योपविश्य च। वाग्यतः सोत्तरीयश्च स्पृशेद्विद्युदसीत्यपः। ब्रह्मयज्ञस्य चैवांते वृष्टिरसीत्यपः स्पृशेत् ॥ ६ ॥ ओंकारं व्याहृतीस्तिस्रः सावित्रीं च तदित्यृचम्। मनसैतामनुस्मृत्य वेदादीन् समुपक्रमेदिति ॥ ७॥ **कारिका**:—कृत्वोपस्थं करे सव्ये उत्ताने प्राग्दिगंगुलौ। पवित्रे स्थापयेदुक्के प्रागग्रे दक्षिणेन तु ॥ न्यंचं प्रागंगुलं तत्र संदध्याद्दक्षिणं करम्। ओंपूर्वा व्याहृतीस्तिस्रः समस्ताश्च सकृद्वदेत् ॥ पच्छस्तदर्धशः सर्वां सावित्रीं त्रिर्वदेदथ ॥ पूर्वाभिसंधितं यावत्तदधीत्य समाहितः॥ नमो ब्रह्मण इत्येतां त्रिरुक्त्वा प्रणवं वदेत्। प्रणवाद्ये तदंतस्यान्मध्यमेन स्वरेण तु। अधीते मनसा ग्रामे ब्रह्मयज्ञं करोति चेदिति ॥ ८ ॥

**विष्णु**—विप्रानें ब्रह्मयज्ञकर्तव्य असतां एक वेळां प्रदक्षिण फिरून वेद पुरुषास नमस्कार करून बसावें व मौनव्रत धारण करून उत्तरीय वस्त्र युक्त असतां 'विद्युदसि' इत्यादि मंत्रानें उदक स्पर्श करून अध्ययनास आरंभ करावा, आणि अध्ययन झाल्यावर 'वृष्टिरसि' इत्यादि मंत्रानें पुनः उदक स्पर्श करावा. ६. प्रणव, तीन व्याहृति व गायत्री ह्या मंत्र समुदायाचें अंतःकरणानें चिंतन करून मध्यम ध्वनीनें वेदादिकांचें अध्ययन करावें. ७ **कारिका**—ब्राह्मणानें वामचरण आकुंचित करून त्याच्या पोटरीच्या मूलप्रदेशीं दक्षिण चरणाचें पाऊल ठेवून बसावें, व ज्याच्या अंगुलि पूर्व दिशेस होतील अशा उताण्या डाव्या हातावर प्रागग्र दोन दर्भ ठेवून तो 'दक्षिणेन' म्हणजे अंगाच्या दक्षिणभागीं

( उजव्या गुडघ्यावर ) ठेवावा, आणि त्या वाम करावर प्रागंगुल व पालथा असा उजवा हात जोडावा हाच ब्रह्मांजलि होय. नंतर समाधानयुक्त होऊन ओंकाराचें व संहितापद्धतीनें तीन व्याहृतींचें एकवेळां मनोमय पठन करून पादशः, अर्धशः, आणि सर्व ऋचा एकूण त्रिवार गायत्रीचें चिंतन करावें. आणखी पूर्वदिवशीं जें अध्ययन केलें असेल त्यापुढें यथावकाश अध्ययन करून 'नमोब्रह्मणे' ही ऋचा त्रिवार पठन करून पुनः प्रणवाचें उच्चारण करावें, असें हें प्रणवादि प्रणवांत ब्रह्मयज्ञसंबंधी अध्ययन ह्यांतील गायत्र्यंत मंत्रसमुदाय खेरीज करून मध्यम स्वरानें करावें, परंतु गांवांतच ब्रह्मयज्ञ कर्तव्य असतां सर्व अध्ययन मनोमय करावें. ८.

आश्वलायनः—ऋषिदैवतच्छंदांसि प्रणवं ब्रह्मयज्ञके । मंत्रादौ नोच्चरेच्छ्राद्धे यागकालेपि चैव हीति ॥९॥ आश्वलायनसूत्रम्—अथ स्वाध्यायमधीयीत ऋचो यजूंषि सामान्यथर्वाङ्गिरसो ब्राह्मणानि कल्पान्गाथानाराशंसीरितिहासपुराणानीति यदृचोधीते पय आहुतिभिरेव तद्देवतास्तर्पयति यद्यजूंषि घृताहुतिभिर्यत्सामानि मध्वाहुतिभिर्यदथर्वाङ्गिरसः सोमाहुतिभिर्यद्ब्राह्मणानि कल्पान्गाथानाराशंसीरितिहासपुराणानीत्यमृताहुतिभिर्यदृचोधीते पयसः कुल्या अस्य पितृन्स्वधा उपक्षरंति यद्यजूंषि घृतस्य कुल्या यत्सामानि मध्वः कुल्या यदथर्वांगिरसः सोमस्य कुल्या यद्ब्राह्मणानि कल्पान्गाथानाराशंसीरितिहासपुराणानीत्यमृतस्य कुल्याः स यावन्मन्येत तावदधीत्यैतया परिदधाति नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नये नमः पृथिव्यै नम ओषधीभ्यः । नमो वाचे नमो वाचस्पतये नमो विष्णवे महते करोमीतीति ॥ १० ॥

आश्वलायन—ब्रह्मयज्ञांत, श्राद्धांत व यज्ञांत मंत्रापूर्वी ओंकाराचें व मंत्राच्या ऋषिदेवताछंदांचें उच्चारण करूं नये. ९. आश्वलायनसूत्रांत—ब्रह्मयज्ञसंबंधी गायत्र्यंत मंत्रसमुदायाचें चिंतन झाल्यावर ऋग्वेदादिकांचें स्वाध्यायधर्मानें (त्रैश्वर्यानें) अध्ययन करावें तें असें—ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद, ब्राह्मणें, कल्पसूत्रें, इंद्रगाथा, इदं जना इत्यादि नाराशंसी, इतिहास व पुराणें. विप्रानें ऋग्वेदाचें अध्ययन केलें असतां तें केवळ देवतांचें दुग्धाच्या होमानेंच तर्पण केलें असें होय; यजुर्वेदाचें

अध्ययन केलें असतां घृताच्या होमानें, सामवेदाचें अध्ययन केलें असतां मधाच्या होमानें, अथर्वणवेदाचें अध्ययन केलें असतां सोमवल्लीरसाच्या होमानें, आणि ब्राह्मणादिकांचें अध्ययन केलें असतां अमृताच्या होमानें देवतांचें तर्पण केलें असें होतें. तसेंच ऋग्वेदाचें अध्ययन केलें असतां अध्ययन करणारांच्या पितरांस तृप्ति करण्याविषयीं समर्थ अशा दुधाच्या नद्या प्राप्त होतात. इत्यादि. **यथावन्मन्येत**— अवकाशानुसार अध्ययन करून ' नमो ब्रह्मणे ' ह्या ऋचेनें सर्व अध्ययन आच्छादित करावें. १०.

देवीभागवते—गायत्रीं त्रिर्जपेत्पूर्वं चाग्निमीळे ततः परम्। यदंगदेति च प्रोच्य अग्निर्वै इतिकीर्तयेत् ॥ अथ महाव्रतं चैव पंथा एतच्च कीर्तयेत्। अथातः संहितायाश्च विदामघवदित्यपि ॥ महाव्रतस्येति तथा इषे त्वोर्जेइतीवहि । अग्नआयाहि चेत्येवं शन्नोदेवीरितीति च ॥ अथैतस्य समाम्नायो वृद्धिरादैजितीवहि । अथ शिक्षां प्रवक्ष्यामि पंचसंवत्सरेति च ॥मयरसतजेत्येव गौर्ग्मा इत्येव कीर्तयेत् ॥ अथातो धर्मजिज्ञासा अथातो ब्रह्मइत्यपि । तच्छंयोरिति च प्रोच्य ब्रह्मणे नम इत्यपीति ॥ ११ ॥ आश्वलायनसूत्रम्—देवतास्तर्पयति प्रजापति र्ब्रह्मा वेदा देवा ऋषयः सर्वाणि च्छंदांस्योंकारो वषट्कारो-व्याहृतयः सावित्री यज्ञा द्यावापृथिवी अंतरिक्षमहोरात्राणि

**देवीभागवतांत**—सूत्रोक्त क्रमानें तीनवेळां गायत्रीचें अध्ययन करून 'अग्निमीळे' इत्यादि दोन वर्ग, ' अग्निर्वै ' हें ब्राह्मण, ' अथ महाव्रतं, एष पंथाः, अथातः, विदामघवन्, महाव्रतस्य ' हीं उपनिषदें; ' इषेत्वो ' यजुर्वेद; ' अग्नआ ' सामवेद; 'शंनो' अथर्ववेद; अथैतस्य, कल्पसूत्र; 'समाम्नायः' निरुक्त; 'वृद्धि' व्याकरण (अष्टाध्यायी), ' अथ शिक्षां ' शिक्षा; ' पंचसं ' ज्यौतिष;' मयरस' छंद; 'गौः' निघंट; 'अथातोधर्म' पूर्वमीमांसा; ' अथातोब्रह्म ' उत्तरमीमांसा; 'तच्छंयोः' ही ऋचा आणि 'नमो ब्रह्मणे' ही ऋचा ह्या क्रमानें अध्ययन करावें. त्यांतही 'अग्निमीळे' इत्यादि दोन वर्ग दररोज म्हटले पाहिजेत. ११. **आश्वलायनसूत्रांत**—प्रजापति, ब्रह्मा इत्यादि देवऋषिपितरांचें व पितृपितामहादि स्वपितरांचें प्रतिवाक्यास तर्पण करून घरीं जाऊन अतिथीस भोजन, भिक्षादान इत्यादि जें द्यावें तीच ब्रह्मयज्ञाची दक्षिणा होय. उभ्यानें,

सांख्याः सिद्धाः समुद्रा नद्योगिरयः क्षेत्रौषधिवनस्पतिगंधर्वाप्सरसोनागा वयांसि गावः साध्या विप्रा यक्षा रक्षांसि भूतान्येवमंतान्यथ ऋषयः शतर्चिनो माध्यमा गृत्समदोविश्वामित्रो वामदेवोऽत्रिर्भरद्वाजोवसिष्ठः प्रगाथाः पावमान्यः क्षुद्रसूक्ता महासूक्ता इति ॥ प्राचीनावीती सुमंतुजैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्या जानंतिबाहविगार्ग्यगौतमशाकल्यबाभ्रव्यमांडव्यमांडूकेया गर्गीवाचक्नवी वडवाप्रातिथेयी सुलभामैत्रेयी कहोळं कौषीतकं महाकौषीतकं पैंग्यं महापैंग्यं सुयज्ञं सांख्यायनमैतरेयं महैतरेयं शाकलं बाष्कलं सुजातवक्त्र मौदवाहिं महौदवाहिं सौजामिं शौनकमाश्वलायनं ये चान्ये आचार्यास्ते सर्वे तृप्यंत्विति प्रतिपुरुषं पितॄंस्तर्पयित्वा गृहानेत्य यद्ददाति सा दक्षिणाथाऽपि विज्ञायते स यदि तिष्ठन्व्रजन्नासीनः शयानो वा यं यं क्रतुमधीते तेन तेन हास्यक्रतुनेष्टं भवतीति विज्ञायते तस्य द्वावनध्यायौ यदात्माशुचिर्यद्देश इति ॥ १२ ॥

चालतांना, बसल्यानें, निजल्यानें, अशा कोणत्याही स्थितीनें तरी ब्रह्मयज्ञसंबंधी अध्ययन करावें. जें जें अध्ययन करावें त्या त्या अध्ययनानें अध्ययनकर्त्या ब्राह्मणास अभीष्टच प्राप्त होतें. ह्या अध्ययनास केवळ दोनच अनध्याय आहेत. सूतकादिकानें देह अशुचि असणें हा एक आणि म्लेंच्छादिसंसर्गानें स्थल अशुचि असणें हा दुसरा १२.

हारीतः—पितृभ्यस्तर्पणं कुर्यात्ततो मातृभ्य एव च । ततो मातामहानां च क्रम एष च तर्पणे ॥ १३ ॥ जीवमानः पिता यस्य माता यदि न विद्यते । मातुः श्राद्धं सुतः कुर्यान्न कुर्यात्तिलतर्पणमिति ॥ १४ ॥

हारीत—पितृत्रयीचें, मातृत्रयीचें व मातामहत्रयीचें क्रमानें तर्पण करावें. १३. ज्याचा पिता जिवंत असून माता मृत आहे त्या पुत्रानें मातेचें केवळ श्राद्ध मात्र करावें तर्पण करूं नये. १४.

शाकलः--कुर्योन्मातरि जीवन्त्यां पितामह्या न तर्पणम् । पितृपत्न्यः प्रमीताः स्युस्तर्पयेत्केवलाश्च ता इति ॥ १५ ॥ संग्रहे--तातांबात्रितयं सपत्नजननी मातामहादित्रयं साह्नि स्त्रीतनयादि तातजननीस्वभ्रातरः सस्त्रियः । तातांबात्मभगिन्यपत्यधवयुग्जायापिता सद्गुरुः शिष्याप्ताः पितरो महालयविधौ तीर्थे तथा तर्पण इति ॥ १६ ॥ याज्ञवल्क्यः--सवर्णेभ्यो जलं देयं नान्यवर्णेभ्य एव चेति ॥१७॥ वसिष्ठः--संबंधमनुकीर्त्यैव नाम गोत्रमनंतरम् । वस्वादिरूपं संकीर्त्य स्वधाकारेण तर्पयेदिति ॥ १८ ॥ संग्रहे--संबंधनामगोत्रेण स्वधांते च नमो नमः । वसुरुद्रादित्यरूपैस्तर्पयेत्पितृपूर्वकमिति ॥ १९ ॥ बौधायनः--शर्मांतं ब्राह्मणस्योक्तं वर्मांतं क्षत्रियस्य तु । गुप्तांतं चैव वैश्यस्य दासांतं शूद्रजन्मनः ॥ २० ॥

**शाकल**--माता जिवंत असतां पितामहीचें तर्पण करूं नये. सावत्र माता मेल्या असल्यास त्यांचें मात्र तर्पण करावें १५. **संग्रहांत**--पितृत्रयी(बाप,आजा व पणजा ही पितृत्रयी), मातृत्रयी (आई, बापाची आई, व आजी), सावत्र माता, सपत्नीक अशी मातामहत्रयी ( आईचा बाप, आजा व पणजा हे आपल्या स्त्रीसह म्हणजे आईची आई, आजी व पणजी यांसह ), भार्या ( स्वतांची बायको ), सत्पनीक ससुत पुत्र, सभर्तृक ससुत कन्या, सपत्नीक ससुत पितृव्य ( चुलता ), मातुल ( मामा ) व आपला भाऊ, सभर्तृक ससुत पितृभगिनी ( आते ), मातृभगिनी ( मावशी ) व स्वभगिनी ( आपली बहीण ), सपत्नीक ससुत श्वशुर ( सासरा ), ब्रह्मोपदेष्टा गुरु, शिष्य व मित्र ह्यांपैकीं जे जे मृत असतील त्या त्या पितरांचें ह्या क्रमानें महालयश्राद्धांत व नवीन तीर्थ प्राप्त झालें असतां पिंडदान करावें आणि ह्याच क्रमानें ब्रह्मयज्ञांगतर्पण करावें १६ **याज्ञवल्क्य**--समान ज्ञातीयसंबंधी जनाचेंच तर्पण करावें, अन्य ज्ञातीयसंबंधी जनाचें तर्पण करूं नये. **वसिष्ठ**--ज्या पितरांचें तर्पण करावयाचें त्यांचा व आपला संबंध ( नातें ), त्यांचें नाव, गोत्र व शास्त्रीय रीतीनें प्राप्त झालेलें वस्वादिरूप, आणि स्वधा एतद्वाचक शद्बांचें उच्चारण करून तर्पण करावें. १८. **संग्रहांत**--संबंध, नाम, गोत्र, स्वधा, नमः आणि क्रमप्राप्त वसुरूप, रुद्ररूप अथवा आदित्यरूप एतद्वाचक शद्बांचें उच्चारण करून पिता, पितामह इत्यादि क्रमानें पितरांचें तर्पण करावें. १९. **बौधायन**--ब्राह्मणव्यक्तिवाचक नामाचें शर्मशद्ब अंतीं लावून उच्चारण

करावें. क्षत्रिय व्यक्तिवाचक नामास वर्मशब्द, वैश्य व्यक्तिवाचक नांवास गुप्तशब्द आणि शूद्र व्यक्तिवाचक नांवास दासशब्द शेवटीं लावून उच्चारण करावें. २०.

चतुर्णामपि वर्णानां गोत्रत्वे पितृगोत्रता। पितृगोत्रं कुमारीणामूढानां भर्तृगोत्रतेति ॥ २१ ॥ गोभिलसूत्रम्---स्त्रीणां दांतं नाम निर्दिशेदिति ॥ २२ ॥ याज्ञवल्क्यः---अन्वारब्धेन सव्येन पाणिना दक्षिणेन तु। सव्योत्तराभ्यां पाणिभ्यामथवा तर्पणं भवेदिति ॥ २३ ॥ व्यासः---एकमेवामंजलिं देवा द्वौ द्वौ तु सनकादयः। अर्हंति पितरस्त्रींस्त्रीन्स्त्रिय एकैकमंजलिमिति ॥ २४ ॥ सांख्यायनः---मातृमुख्यास्तु यास्तिस्रस्तासां त्रींस्त्रीञ्जलांजलीन्। सपत्न्याचार्यपत्नीनां द्वौ द्वौ दद्याज्जलांजली इति ॥ २५ ॥ हारीतः---वसित्वा वसनं शुष्कं स्थले विस्तीर्णबर्हिषि। विधिज्ञस्तर्पणं कुर्यान्न पात्रेषु कदाचन। पात्राद्वा जलमादाय शुभे पात्रांतरे क्षिपेत्। जलपूर्णेथवा गर्ते न स्थले तु विबर्हिषीति ॥ २६ ॥

चारही वर्णांविषयीं गोत्राचा विचार केला असतां पुरुषरूप संततीस पित्याचेंच गोत्र होय. स्त्रीरूप संततीमध्यें अविवाहित कन्येस पित्याचें गोत्र व विवाहित कन्येस तिच्या पतीचें गोत्र होय. २१. गोभिलसूत्रांत---स्त्रीरूप व्यक्तिवाचक नांवाच्या शेवटीं दाशब्दाचें उच्चारण करावें. २२. याज्ञवल्क्य---उजव्या हातास डावा हात लावून त्या उजव्या हातानें तर्पण करावें, अथवा दोन्ही हातांचा अंजलि ( ओंजळ ) करून त्या अंजलीनें तर्पण करावें. २३. व्यास---तर्पणाविषयीं देवांस उदकाचा एक एक अंजलि द्यावी. ऋषींस दोन दोन अंजलि आणि पितरांस तीन तीन अंजलि द्यावे. परंतु स्त्रीरूप पितरांस एक एकच अंजलि द्यावा. २४. " स्त्रीरूप पितरांमध्येंही कांहीं पितरांस अंजलि देण्याचा पहिल्यापेक्षां विशेष नियम सांगतो ". सांख्यायन---तर्पणाविषयीं मातृत्रयीस उदकाचे तीन तीन अंजलि द्यावे, आणि सापत्न मातरांस ( सावत्र आयांस ) दोन दोन अंजलि द्यावे. २५. हारीत---शास्त्रमार्गवेत्त्या ब्राह्मणानें शुष्क वस्त्र नेसून शुद्ध स्थळीं दर्भांच्या मोठ्या आसनावर बसावें, आणि नदीत--डाबादि अकृत्रिम उदकांत तर्पण करावें. कधींही पात्रामध्यें उदक घेऊन करूं नये,

परंतु कदाचित अकृत्रिम उदकामध्यें तर्पण करण्यास असमर्थ असल्यास त्यानें पात्रांत उदक घेऊन त्यांतून घेतलेलें तर्पणसंबंधी अंजलिस्थ उदक दुसऱ्या स्वच्छ पात्रांत सोडावें, अथवा उदकानें भरलेल्या भूमीच्या खाचेंत सोडावें, किंवा भूमीवर दर्भ हांतरून त्यांवर सोडावें, परंतु केवळ जमिनीवर सोडूं नये. २६.

पितामहः--हेमरौप्यमयं पात्रं ताम्रकांस्यसमुद्भवम् । पितॄणां तर्पणे पात्रं मृन्मयं तु परित्यजेदिति ॥२७॥ याज्ञवल्क्यः--यद्युध्दृतं निषिंचेत्तु तिलान्संमिश्रयेज्जले । अतोऽन्यथा तु सव्येन तिला ग्राह्या विचक्षणैरिति ॥ २८ ॥ अंगिराः--मार्जनं तर्पणं श्राद्धं न कुर्या द्वारिधारयेति ॥ २९ ॥ याज्ञवल्क्यः--वस्त्रनिष्पीडितं तोयं स्नातस्योच्छिष्टभागिनाम् । भागधेयं श्रुतिः प्राह तस्मान्निष्पीडयेत्स्थले । अन्नप्रकीरवत्तस्याप्यपसव्येन पीडनमिति ॥ ३० ॥ पुराणसङ्ग्रहे--देवताश्च मुनींश्चैव पितॄंश्चैव न तर्पयेत् । देवादीना मृणीभूत्वा नरकं स व्रजेदथेति ॥ ३१ ॥

**पितामह**--पितरांच्या तर्पणाविषयीं सोन्याचें, रुप्याचें, तांब्याचें किंवा काशाचें पात्र योग्य होय. समयविशेषीं ह्यांहीपेक्षां अन्य धातु, काष्ठ (लाकूड) इत्यादिकांचें पात्र घ्यावें, परंतु मातीचें पात्र मात्र घेऊं नये. २७. **याज्ञवल्क्य**--विद्वान ब्राह्मणानें जर पात्रांत पाणी घेऊन तर्पण कर्तव्य असेल तर त्या पात्रांतील पाण्यांतच तीळ टाकावे, आणि जर अकृत्रिम जलानें तर्पण करावयाचें असल्यास डाव्या हातानें प्रत्येक वेळीं तीळ घ्यावे. २८. **अंगिरस्**--मार्जनसंबंधी, तर्पणसंबंधी आणि श्राद्धसंबंधी उदकाची धार न धरतां त्याचा एकेच वेळीं प्रक्षेप करावा. २९. **याज्ञवल्क्य**--मध्यान्हस्नानाच्या वेळीं परिधान केलेल्या वस्त्राच्या निष्पीडनानें निघालेलें उदक हा उच्छिष्ट भाग ग्रहण करणाऱ्या असंस्कृत मृत पितरांचा भाग आहे असें श्रुति म्हणते, म्हणून तर्पणाच्या शेवटीं असंस्कृत मृत पितरांच्या तृप्तीकरितां विकिरान्नासारखें अपसव्यानेंच त्या वस्त्राचें भूमीवर निष्पीडन करावें. ३०. **पुराणसमुच्चयांत**--ज्यांच्या प्रसादानें आपल्यास उत्तम जन्म प्राप्त झालें त्या देव, ऋषि व पितर यांचें जो ब्राह्मण तर्पण करीत नाहीं तो त्यांच्या ऋणानें बद्ध होऊन नरकास जाईल. ३१.

शाकलः—तर्पणं नैत्यिकं कुर्याद्ब्रह्मयज्ञपुरस्सरम् । ग्रहणादिनिमित्तेषु ब्रह्मयज्ञं विना भवेदिति ॥ ३२ ॥

इति ब्रह्मयज्ञतर्पणविधिः

---

शाकल—दररोज ब्राह्मणानें ब्रह्मयज्ञसंबंधी स्वाध्यायपूर्वक तर्पण करावें, आणि ग्रहणादिक निमित्त प्राप्त झालें असतां ब्रह्मयज्ञांतील स्वाध्यायाशिवाय ( केवल ) तर्पण करावें. ३२.

याप्रमाणें ब्रह्मयज्ञतर्पणविधि [ सांगितला ].

---

## अथ ब्रह्मयज्ञतर्पणम्.

॥ वेदपुरुषाय नमः ॥ ॐ श्रीकेशवाय नमः० ॐ श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञेन यक्ष्ये ॥ विद्युदसि विद्यमे पाप्मानमृतात्सत्यमुपैमि ॥ १ ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ तत्सवितुर्वरेण्यम् ॥ भर्गो देवस्य धीमहि । धियोयोनः प्रचोदयात् ॥ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियोयोनः प्रचोदयात् ॥ २ ॥

### ब्रह्मयज्ञतर्पण.

वेदपुरुषास नमस्कार असो. ओंश्री–अर्थ लिहिला. ममोपात्त—मी ब्रह्मयज्ञ नांवाच्या कर्मानें माझ्या संचित पापाचा विनाशपुरस्सर परमेश्वरप्रीतिरूप अभीष्टाचें संपादन करतों. विद्युदसि—हे देवा तूं वियोग करण्याविषयीं कारणभूत आहेस म्हणून माझ्या पापाचा वियोग (नाश) कर, कीं मी मोक्षाकरितां परमात्मसाक्षात्कारसाधनभूत ब्रह्मयज्ञाख्य कर्मास आरंभ करतों. १. अर्थ लिहिला. २.

अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ।। अग्निः पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत । स देवाँऽएह वक्षति ।। अग्निना रयिमश्नवत्पोषमेव दिवेदिवे । यशसं वीरवत्तमम् ।। अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परिभूरसि । स इद्देवेषु गच्छति ।। अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रवस्तमः । देवो देवेभिरागमत् ।। ३ ।। यदङ्ग दाशुषे त्वमग्ने भद्रं करिष्यसि । तवेत्तत्सत्यमङ्गिरः ।। उप त्वाग्ने दिवेदिवे दोषावस्तर्धिया वयम् । नमो भरन्त एमसि ।। राजन्तमध्वराणां गोपामृतस्य दीदिविम् । वर्धमानं स्वे दमे ।। स नः पितेव सूनवेऽग्ने सूपायनो भव । सचस्वा नः स्वस्तये ।। ४ ।।

अग्निमीळे—अग्रभागीं आहवनीय रूपानें स्थापन केलेला, ऋत्विजासारखें यज्ञाचें निष्पादन करून प्रकाशन करणारा, देवांचें आव्हान करणारा अथवा त्यांस हविर्भाग पोंचविणारा आणि उत्तम धन देणारा अशा अग्नीचें मी स्तवन करतों. अग्निः पूर्वेभिः—भृगु, अंगिरा इत्यादि पुरातन ऋषींनीं जो हा अग्नि स्तुत्य आहे आणि नवीनांनींही ( आह्मीही ) स्तुत्य आहे, तो अग्नि येथें आमच्या यज्ञांत देवांस प्राप्त करो. अग्निना—प्रतिदिवशीं वृद्धिंगतच होणारें दानादिकांनीं यश वाढविणारें व पुत्र भृत्यादि वीर पुरुषांनीं संपन्न करणारें असें धन होत्यानें यज्ञामध्यें स्तुत केलेल्या अग्नीच्या निमित्तानें यजमानास प्राप्त होतें. अग्ने यं—हे अग्नि, तूं ज्या यज्ञाचें राक्षसादिक हिंसा करण्यास समर्थ होत नाहींत असें चहूंकडून संरक्षण करतोस तोच यज्ञ ( यज्ञसंबंधी हविर्भाग ) देवांची उपजीविका होण्याकरितां स्वर्गावर गमन करतो. अग्निर्होता—होमाचें निष्पादन करणारा, नियमित बुद्धि, अनुष्ठानाचें यथार्थ फळ देणारा, व अतिशयित आश्चर्यकारक कीर्तीनें युक्त असा हा अग्निदेव हविर्भाग ग्रहण करणाऱ्या देवांसहवर्तमान आमच्या यज्ञांत येवो. ३. यदंग—हे अंगिरस् नांवाच्या अग्नि, तूं हविर्भाग देणाऱ्या यजमानाचें त्याच्या प्रीतीकरितां जें धन--घर--प्रजा--पशुरूप कल्याण करतोस तें कल्याण तुझ्याच सुखाविषयीं कारणभूत होय. यजमानास धनादि संपत्ति प्राप्त झाली असतां त्यानें पुन्हा यज्ञ केल्यानें हविर्भागजन्य सुख अग्नीसच प्राप्त होतें म्हणून मी बोलतों हें सत्य आहे. उपत्वाग्ने—राजंतं—हे अग्नि, देदीप्यमान यज्ञांचें रक्षण करणारा अवश्य प्राप्त होणाऱ्या कर्मफलाचें पुनः पुनः द्योतन करणारा व स्वकीय गृहांत ( यज्ञशाळेंत ) हविर्भाग देऊन वृद्धिंगत केलेला

अग्निर्वै देवानामवमोविष्णुःपरमः ॥५॥ अथ महाव्रतम्॥६॥ एष पंथा एतत्कर्म ॥ ७ ॥ अथातः संहिताया उपनिषत् ॥८॥ विदामघवन्विदा ॥९॥ महाव्रतस्य पंचविंशतिसामिधेन्यः॥१०॥ इषेत्वोर्जेत्वा ॥ ११ ॥ अग्नआयाहिवीतये ॥ १२ ॥ शन्नोदेवी-रभीष्टये ॥ १३ ॥ अथैतस्य समाम्नायस्य ॥ १४ ॥ समा-म्नायः समाम्नातः ॥ १५ ॥ वृद्धिरादैच् ॥ १६ ॥ अथ शिक्षां प्रवक्ष्यामि ॥ १७ ॥ पंचसंवत्सरमयं ॥ १८ ॥ मयरसतजभन-लगसंमितम् ॥ १९ ॥ गौःग्मा ॥ २० ॥ यदिंद्रोदाशराज्ञे मानुषं व्यगाहथाः ॥ २१ ॥ इदं जना उपश्रुत ॥ २२ ॥ योगीश्वरं याज्ञवल्क्यं ॥ २३ ॥ नारायणं नमस्कृत्य ॥ २४ ॥ अथातो-धर्मजिज्ञासा ॥ २५ ॥ अथातो ब्रह्मजिज्ञासा ॥ २६ ॥ तच्छं-

अशा तुला आम्ही दररोज रात्रंदिवस अंतःकरणपुरस्सर नमस्कार करीत असतां तुझ्या समीप येतों. सनःपितेव—जसें पिता पुत्राकरितां उत्तम धन संपादन करून त्याच्या कल्याणाविषयीं यत्न करतो तसें हे अग्नि तूं आमच्याकरितां उत्तम प्राप्ति-युक्त हो आणि आमच्या कल्याणाविषयीं यत्न कर. हे ऋग्वेदसंहितेचे पहिले दोन वर्ग झाले ४.

अग्निर्वै—हें ऋग्वेदाचें ब्राह्मण ५. अथमहा—हीं चार उपनिषदें आहेत. ६, ७, ८, ९. महाव्रतस्य—हें करभ्य सूत्र आहे, परंतु ह्यासहि उपनिषद असें म्हणतात. १०. इषे—यजुर्वेद. ११. अग्नआ—सामवेद. १२. शंनो—अथर्वणवेद. १३ अथैतस्य—कल्पसूत्र. १४. समाम्नाय—निरुक्त. १५ वृद्धि—व्याकरण. १६ अथ—शिक्षा. १७. पंच—ज्योतिष. १८ मयरस—छंद. १९. गौ—निघंट. २० यदिंद्रो—इंद्रगाथा. २१. इदं जना—नाराशंसी. २२. योगी—धर्मशास्त्र. २३ नारायणं—इतिहास पुराणें. २४. अथातोधर्म—जैमिनीसूत्र ( पूर्वमीमांसा ). २५. अथातोब्रह्म—ब्रह्मसूत्र ( उत्तरमीमांसा ). २६. तच्छंयोः—हे अग्नि, कल्याण करणाऱ्या तुझ्यापाशीं आम्ही तें कल्याण मागतों, कीं जेणें करून आम्ही यज्ञ करा-वयांस आणि यज्ञामध्यें यज्ञपति विष्णूची स्तुति करावयास समर्थ होऊं. तुझ्या प्रसादानें देवांपासून आम्हांस कल्याण प्राप्त होवो, आणि आमच्या पुत्र भृत्यादि मनुष्यांस कल्याण प्राप्त होवो. आमचा यज्ञ होईपर्यंत यज्ञामध्यें आम्ही वृत केलेला

योरावृणीमहे गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये दैवीस्वस्तिरस्तुनः स्वस्तिर्मानुषेभ्यः । ऊर्ध्वं जिगातुभेषजं शन्नो अस्तुद्विपदेशं चतुष्पदे ॥२७॥ नमो ब्रह्मणे नमोऽअस्त्वग्नये नमः पृथिव्यै नम ओषधीभ्यः । नमो वाचे नमो वाचस्पतये नमो विष्णवे महते करोमि ॥ २८ ॥ नमो ब्रह्मणे० करोमि ॥ नमो ब्रह्मणे० करोमि ॥ २९ ॥ वृष्टि रसिवृश्चमे पाप्मानमृतात्सत्यमुपागामाम् ॥ ३० ॥ प्रजापतिस्तृप्यतु ॥ ब्रह्मा तृप्यतु ॥ वेदास्तृप्यंतु ॥ देवास्तृप्यंतु ॥ ऋषयस्तृप्यंतु ॥ सर्वाणि च्छंदांसि तृप्यंतु ॥ ओंकारस्तृप्यतु ॥ वषट्कारस्तृप्यतु ॥ व्याहृतयस्तृप्यंतु ॥ सावित्रीतृप्यतु ॥ यज्ञास्तृप्यंतु ॥ द्यावापृथिवी तृप्यताम् ॥ अंतरिक्षं तृप्यतु ॥ अहोरात्राणि तृप्यंतु ॥ सांख्यास्तृप्यंतु ॥ सिद्धास्तृप्यंतु ॥ समुद्रास्तृप्यंतु ॥ नद्यस्तृप्यंतु ॥ गिरयस्तृप्यंतु ॥ क्षेत्रौषधिवनस्पतिगंधर्वाप्सरसस्तृप्यंतु॥ नागास्तृप्यंतु॥ वयांसि तृप्यंतु ॥ गावस्तृप्यंतु ॥ साध्यास्तृप्यंतु ॥ विप्रास्तृप्यंतु ॥ यक्षास्तृप्यंतु ॥ रक्षांसि तृप्यंतु ॥ भूतानि तृप्यंतु ॥ एवमंतानि तृप्यंतु ॥ ३१ ॥ ( निवीती ) शतर्चिनस्तृप्यंतु ॥ माध्यमास्तृप्यंतु ॥ गृत्समदस्तृप्यतु ॥ विश्वामित्रस्तृप्यतु ॥ वामदेवस्तृप्यतु ॥ अत्रिस्तृप्यतु ॥ भरद्वाजस्तृप्यतु ॥ वसिष्ठस्तृप्यतु ॥ प्रगाथास्तृप्यंतु ॥ पावमान्यस्तृप्यंतु ॥ क्षुद्रसूक्तास्तृप्यंतु ॥ महासूक्तास्तृप्यंतु ॥ ३२ ॥ ( प्राचीनावीती ) सुमंतुजैमिनि-

( वर्णन दिलेला ) होता ( ऋत्विज ) देवतांचें तृतीय सवनानें ( शंयुवाकानें ) स्तवन करो. आणखी आमच्या मनुष्यव्यतिरिक्त द्विपद प्राण्यांसही सुख प्राप्त होवो, आणि गवाश्वादि चतुष्पद प्राण्यास सुख प्राप्त होवो. २७. **नमोब्रह्मणे**--प्रातःसंध्येंत अर्थ लिहिला. ही ऋचा त्रिवार पठन करून ओंकाराचें उच्चारण करावें २८, २९. **वृष्टिरसि**--हे देवा, तूं छेदन करण्याविषयीं हेतुभूत आहेस ह्याकरितां माझ्या पातकाचें छेदन ( नाशन ) कर. तूं पापाचें नाशन करतोस म्हणून मी अमृताच्या हेतूनें ब्रह्मयज्ञात्मककर्म करण्यास समर्थ होतों. ३०. **प्रजापतिः**--मीं दिलेल्या उदकानें प्रजापति तृप्त होवो इत्यादि. ३१. **निवीती**--माळेसारखें जानवें करून ' शतर्चिन ' इत्यादिकांचें तर्पण करावें. ३२

वैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्यास्तृप्यंतु ॥ जानंतिबाहविगा[illegible]मशाकल्यबाभ्रव्यमांडव्यमांडूकेयास्तृप्यंतु॥ गर्गीवाच[illegible] प्यतु ॥ वडवा प्रातिथेयी तृप्यतु ॥ सुलभामैत्रेयी तृप्यतु॥ [illegible] तर्पयामि ॥ कौषीतकं तर्पयामि ॥ महाकौषीतकं तर्पयामि [illegible] यं तर्पयामि ॥ महापैंग्यं तर्पयामि ॥ सुयज्ञं तर्पयामि ॥ सां[illegible] अनं तर्पयामि ॥ ऐतरेयं तर्पयामि ॥ महैतरेयं तर्पयामि ॥ शा[illegible] तर्पयामि ॥ बाष्कलं तर्पयामि ॥ सुजातवक्त्रं तर्पयामि ॥ [illegible]हिं तर्पयामि ॥ महौदवाहिं तर्पयामि ॥ सौजामिं तर्पय[illegible] ॥ शौनकं तर्पयामि ॥ आश्वलायनं तर्पयामि ॥ येचान्ये आच[illegible]स्ते सर्वे तृप्यंतु ॥ ३३ ॥ अस्मत्पितरममुकशर्माणममुक[illegible] वसुरूपं स्वधानमस्तर्पयामि ॥ अस्मत्पितामहममुकशर्म[illegible]ममुकगोत्रं रुद्ररूपं स्वधानमस्तर्पयामि ॥ अस्मत्प्रपित[illegible]ममुकशर्माणममुकगोत्रं आदित्यरूपं स्वधानमस्तर्पयामि [illegible]३४ ॥ अस्मत्मातरममुकदाममुकगोत्रां वसुरूपां स्वधानम[illegible]यामि ॥ अस्मत्पितामहीममुकदाममुकगोत्रां रुद्ररूपां [illegible]धानमस्तर्पयामि ॥ अस्मत्प्रपितामहीममुकदाममुकगोत्राममा[illegible]यरूपां स्वधानमस्तर्पयामि ॥ ३५ ॥ अस्मत्सापत्नमातर[illegible]मुकदाममुकगोत्रां वसुरूपां स्वधानमस्तर्पयामि ॥ ३६ ॥ अस्मन्मा[illegible]महममुकशर्माणममुकगोत्रं सपत्नीकं वसुरूपं स्वधानमस्तर्[illegible]मि ॥ अस्मन्मातुः पितामहममुकशर्माणममुकगोत्रं सपत्नी[illegible] रुद्ररूपं स्वधा० मि ॥ अस्मन्मातुः प्रपितामहममुकशर्मा[illegible]मुकगोत्रं सपत्नीकमादित्यरूपं स्वधा० मि ॥ ३७ ॥ अस्म[illegible]त्नीममुकदाममुकगोत्रां वसुरूपां स्वधा० मि ॥ अस्मत्तनयममु[illegible]शर्माणममुकगोत्रं सपत्नीकं ससुतं वसुरूपं स्वधान० मि ॥ अस्मत्तनयाममुकदाममुकगोत्रां सभर्तृकां वसुरूपां स्वधा० मि ॥ अस्मत्पितृव्यममुक० तर्पयामि ॥ अस्मन्मातुल-

प्राचीना—उपोद्घातांत सांगितल्या प्रमाणें अपसव्य करून ' सुमंतुजैमिनि इत्यादि- कर्चे [illegible]व पिता इत्यादिकांचें तर्पण करावें. ३३, ३४, ३५, ३६, ३७, ३८.

मसुक० तर्पयामि ॥ अस्मद्भ्रातरं० तर्पयामि ॥ अस्मत्पितुर्भगिनीममुकदाममुकगोत्रां स्वां ससुतां वसुरूपां स्वधा० मि ॥ अस्मन्मातुर्भगिनीं० यामि ॥ अस्मद्भगिनीममुक० यामि ॥ अस्मच्छ्वशुरममुक० यामि ॥ अस्मद्गुरुममुक० यामि ॥ अस्मीममुक० यामि ॥ अस्मदाप्तममुक० यामि ॥ ३८ ॥ आब्रह्मपर्यंतं देवर्षि-पितृमानवाः ॥ तृप्यंतु पितरः सर्वे मातृमातादयः । अतीत-कुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनाम् ॥ आब्रह्मनाल्लोकानिद-मस्तु तिलोदकम् ॥३९॥ ये के चास्मात्कुले ५अपुत्रा गोत्रि-णोमृताः ॥ ते गृण्हंतु मया दत्तं वस्त्रनिष्पीडकम् ॥ ४० ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः वं द्विः ॥४१॥

इति ब्रह्मयज्ञतर्पणम्.

---

आब्रह्म—परमेश्वराच्या त्रिपादात्मक ब्रह्मस्वरूपापर्यंत ब्रह्मरूप संसारजालामध्यें देव, ऋषि, पितर, मनुष्य इत्यादि रूपांनीं स्थित असणारे जे ते मातचे मातामह इत्यादि ( ज्यांस नाम–गोत्रादि–उच्चारण–पुरस्सर पृथक् पृथक् उदकांजलि पोहोंचत नाहींत असे ) पितर असतील ते सर्व ह्या मी दिलेल्या तिलमिश्रित उदकानें तृप्त होवोत. अतीतकुल—मी पूर्वीं अनेक स्थानीं उपभुक्त केलेर अनेक जन्मांतर संबंधी जे माझे यावत्संसारामध्यें पितृसमुदाय असतील त्यांस तृप्ती करितां हें मीं दिलेलें तिलोदक प्राप्त होवो. ३९. ये के चास्मत्—जे कोणी जीं माझ्या मातृकुळांत व पितृकुळांत उत्पन्न होऊन उपनयनादि संस्काराशिवाय मृत झाले म्हणून शुद्धोदक ग्रहण करण्याविषयीं अनधिकारी यासाठीं मी त्यांस तृप्तीच्या उद्देशनें वस्त्र निष्पीडन करून ( पिळून ) उदक देतों तें उदक ते ग्रहण करोत. ४०. ओंश्री—द्विवार आचमन करावें. ४१

याप्रमाणें ब्रह्मयज्ञतर्पण [ सांगितलें. ]

---

## अथ वैश्वदेवबलिहरणविधिः

शातातपः—वैश्वदेवः प्रकर्तव्यः पंचसूनापनुत्तये । पंचसूना गृहस्थस्य वर्ततेऽहरहः सदेति ॥१॥ आश्वलायनः—सायंप्रातर्वैश्वदेवौ कर्तव्यौ बलिकर्म च । अनश्नतापि कर्तव्या वन्यथा किल्बिषी भवेत् ॥ २ ॥ वैश्वदेवो दिवानक्तं न भवेच्चेत्पृथक्पृथक् । प्रातरेव द्विरावृत्त्या कुर्याद्वा सहितौ द्विजः ॥ ३ ॥ वसतामेकपाकेन विभक्तानामपि प्रभुः । एकस्तु चतुरोयज्ञान्कुर्याद्वाग्यज्ञपूर्वकान् ॥ ४ ॥ पृथगप्येकपाकानां ब्रह्मयज्ञो

## वैश्वदेवबलिहरणविधि.

ज्या कर्मामध्यें देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, व मनुष्ययज्ञ असे चार महायज्ञ होतात त्या कर्मास वैश्वदेव असें म्हणतात. बलिहरण हें वैश्वदेवांतर्गतच कर्म आहे, अथवा श्वचांडालवायसादिकांस जो अन्नप्रक्षेप करणें हेंहि बलिहरण होय. शातातप—गृहस्थास नेहमीं पंचसूना ( ब्रह्मयज्ञ प्रकरणांत सांगितलेल्या ) संबंधी दोष प्राप्त होतो, ह्यासाठीं त्या पंचसूनासंबंधी दोषाच्या निवृत्तीकरितां त्यानें दररोज वैश्वदेव अवश्य करावा. १. आश्वलायन—प्रतिदिवशीं गृहस्थानें आपल्यास भोजन करावयाचें असो अथवा एकादश्यादि निमित्तक उपास असो, परंतु सायंकाळीं व प्रातःकाळीं वैश्वदेव केला पाहिजे, आणि प्रातःकाळीं वायसादिकांस बलि प्रक्षेप केला पाहिजे. जर तो असें न करील तर पंचसूनाजन्य दोषाचा अधिकारी होईल. २ जो द्विज प्रातःकाळीं व सायंकाळीं वैश्वदेव करण्याविषयीं समर्थ नसेल त्यानें प्रातःकाळींच द्विवार वैश्वदेव करावा अथवा उभयकालसंबंधी आहुत्यादिकांच्या तंत्रानें एकवारच करावा. ३ पित्रादि प्राप्त रिक्थाच्या विभागानें विभक्तही झालेले अनेक गृहस्थ जर अभिन्न पाकानें सिद्ध झालेल्या अन्नाचें भक्षण करून राहतात तर, त्यांतील मुख्य एक गृहस्थानेंच वाग्यज्ञ ( ब्रह्मयज्ञ ) आहे प्रथम ज्यांत असे वाग्यज्ञ शिवाय करून देवयज्ञादि चार यज्ञ ( वैश्वदेवरूप ) करावेत. एकानेंच वैश्वदेव केला असतां त्या वैश्वदेवानेंच सर्व पाकाचा व त्या पाकाचा भोजन करून राहणाऱ्या सर्व गृहस्थांच्या शरीराचा संस्कार होतो. ‘ वाग्यज्ञपूर्वकान् ’ हा अतद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि समास आहे. ४ एक पाकाचें भोजन करून राहणाऱ्याहि अनेक

द्विजन्मनां। अग्निहोत्रं सुरार्चा च संध्या नित्या पृथक् पृथक् ॥५॥ अविभक्ता विभक्ताश्च पृथक्पाका द्विजातयः। कुर्युः पृथक् पृथक् यज्ञान्भोजनात्प्राक्दिने दिन इति ॥ ६ ॥ स्मृतिरत्नाकरे—सूर्यः प्रजापतिश्चैव अग्निश्चैव प्रजापतिः। चतस्त्रआहुतीर्हुत्वा शेषं तंत्रं समापयेदिति ॥ ७॥ प्रतिष्ठातिलके—षडंगुलमथोच्छ्राये खाते च चतुरंगुलम्। द्वादशांगुलदीर्घं स्यात्कुंडं तद्वैश्वदेविकम् ॥ अष्टांगुलं वितस्तिर्वा स्थंडिलं वैश्वदेविकमिति॥८॥ स्मृतिसारे—मेखलात्रयसंयुक्तं द्विमेखलमथापि वा। स्यादेकमेखलं वापि चतुरस्रं समंततः। अपि ताम्रमयं प्रोक्तं कुंडमत्र मनीषिभिरिति ॥ ९ ॥ शौनकः—वैश्वदेवमिति प्रोक्तं पूर्वैरेवं मनीषिभिः। अन्नस्य चात्मनश्चैव संस्कारार्थंतदिष्यत इति॥१०॥

गृहस्थांमध्यें प्रत्येकानें ब्रह्मयज्ञ, देवपूजा व संध्या हीं नित्यकर्में आणि अग्निहोत्र हीं सर्व कर्में पृथक् पृथक् केलीं पाहिजेत ५. अनेक गृहस्थ विभक्त असतां अथवा दायप्राप्त रिक्थाच्या अविभागानें अविभक्तहि असतां जर ते भिन्न पाकाचें भोजन करून राहतील तर त्यांनीं प्रतिदिवशीं भोजनापूर्वीं पृथक् पृथक् पंच महायज्ञ केले पाहिजेत. ६ **स्मृतिरत्नाकरांत**—दोन्ही कालांत (सकाळीं व संध्याकाळीं) करण्यांत येणारा वैश्वदेव जर एकदाच तंत्रानें करावयाचा असल्यास ‘ सूर्य, प्रजापति, अग्नि व प्रजापति ’ ह्या चार मंत्रांनीं चार आहुति पृथक् पृथक् देऊन शेष राहिलेलें सर्व कर्म एकवार आवृत्तीनें समाप्त करावें. ७ **प्रतिष्ठातिलकांत**—सहा अंगुळें ऊंच चार अंगुळें खोल ‘ अर्थात् ’ दोन अंगुळें पिंडानें ( जाडीनें ) युक्त, आणि बारा अंगुळें लांब रुंद असें मातीचें कुंड वैश्वदेव संबंधी अग्नीचें स्थापन करण्यास प्रशस्त होय; अथवा आठ अंगुळें किंवा एकवीत लांब, रुंद व दोन अंगुळें जाड असें मातीचें स्थंडिल प्रशस्त आहे. ८ **स्मृतिसारांत**—तीन मेखलांनीं ( गलथ्यांनीं–पायऱ्यांनीं ) युक्त, दोन मेखलांनीं युक्त अथवा एक मेखलेनें युक्त व भोंवताळून चतुष्कोण असें तांब्याचेंहि कुंड वैश्वदेवाकरितां घ्यावें असें तत्ववेत्ते म्हणतात. ९. **शौनक**—गृहस्थानें अन्नाच्या व स्वकीय शरीराच्या संस्काराकरितां वैश्वदेवाख्य कर्म केलें पाहिजे असें पुरातन ऋषि म्हणतात. १० **कारिका**—‘ जुष्टोदमूना, एह्यग्न इह ’ ह्या दोन ऋचांनीं रुक्मकसंज्ञक वैश्वदेवाग्नीचें आवाहन करून त्याची समस्त व्याहृतिमंत्रानें

कारिका--जुष्टोदमूना एह्यग्ने अग्निपावाह्य रुक्मकम् । समस्ताभिर्व्याहृतिभिः प्रतिष्ठाप्येंधनं क्षिपेदिति ॥ ११ ॥ शाकलः--अग्नेर्ध्यानं ततः कुर्यान्मंत्रेणाग्निं समिंधयेदिति॥१२॥ संग्रहे--धमनीमंतरा कृत्वा तृणं वा काष्ठमेव च । मुखेनाग्निं समिंधीत मुखादग्निरजायतेति ॥ १३ ॥ गृह्यपरिशिष्टे—अथ वैश्वदेवोदिवास्य प्रारंभोनात्र पाकयज्ञतंत्रमौपासनं पचनं वा परिसमुह्य पर्युक्ष्यायतनमलंकृत्य सिद्धं हविष्यमधिश्रित्याद्भिः प्रोक्ष्योदगुद्वास्याग्नेः प्रत्यग्दर्भेषु निधाय सर्पिषाभ्यज्य सव्यं पाणितलं हृदये न्यस्य सकृदवदानेन पाणिना जुहुयादन्नाभावे तंडुलादिभिः कुर्यादंते च परिसमुह्य पर्युक्षेदिति ॥ १४ ॥

कुंडामध्यें स्थापना करावी, आणि त्यास प्रदीप्त होण्याकरितां शुचिर्भूत काष्ठादि इंधनें घालावीं. ११. शाकल—नंतर 'चत्वारिशृंगा' ह्या मंत्रानें अग्नीचें ध्यान करून त्यास प्रदीप्त करावा. १२. संग्रहांत—फुंकणीचा, फुंकणी नसेल तर तृणाचा अथवा काष्ठाचा मुखसंबंधी तुषार अग्नीवर न जाण्याकरितां अंतराय ( आडोसा ) करून मुखानें फुंकून अग्नीचें प्रदीपन करावें, कारण ईश्वराच्या मुखापासून अग्नि उत्पन्न झाला, जीवात्मा आणि परमात्मा ह्यांच्या अभेद भावनेनें स्वकीय मुखहि अग्नीचें प्रदीपक होय. १३. गृह्यपरिशिष्टांत—आतां वैश्वदेवकर्म सांगतों, वैश्वदेवाचा प्रथम दिवसास आरंभ करावा, वैश्वदेवाचें गृह्याग्निहोमा बराबर तंत्र ( उभय कर्मे एक आवृत्तीनें करणें ) करूं नये, गृह्याग्नीच्या अथवा लौकिकाग्नीच्या सभोंवतीं उदकानें सिंचन व अभ्युक्षण करून, अग्नीच्या कुंडादि स्थानाची पूजा करून, पात्रांत सिद्ध केलेलें ओदनादि हविष्यान्न कुंडामध्यें अग्नीच्या उत्तरभागीं निखाऱ्यांवर किंचित उष्ण करून, प्रोक्षण करून, तें पात्र अग्निकुंडाच्या पश्चिमभागीं दर्भांवर ठेवून, हविष्यान्नास तूप लावून, डावा हात पालथा हृदयावर ठेवून, उजव्या हातानें प्रत्येक आहुतीस एकवेळां अवदान घेऊन सूर्यादिमंत्रांनीं होम करावा. पक्व केलेलें अन्न नसल्यास तांदुळ वगैरेंनीं होम करावा. होम झाल्यावर पुन्हा पहिल्यासारखें अग्नीच्या सभोंवतीं उदकानें सिंचन आणि अभ्युक्षण करावें. 'जुष्टोदमूना' इत्यादि मंत्रांनीं आवाहन व स्थापन हीं कर्मे लौकिकाग्निपक्षीं होत. १४.

शाकलः--प्रागादीशानपर्यंतं समंतादग्निमर्चयेत् । विश्वानी-त्यष्टभिः पादैः संस्तुत्यांत्यऋचा त्वथेति ॥ १९ ॥ शौनकः--सिद्धान्नं कुरुते यस्तु त्रिःप्रोक्ष्य पुरतः स्थितम् । हविर्यदेक पात्रस्थं मध्ये दैवं तथोत्तरे । भौतिकं पैतृकं याम्ये मानुष्यं चान्यपात्रके । देवभूतपितॄणां च तत्तद्भागेन वै क्रमात् । उत्तानेन तु हस्तेन त्वंगुष्ठाग्रेण पीडितम् । संहतांगुलिपाणिस्तु वाग्यतोजुहुयाद्धविः । यत्किंचिज्जुहुयादग्नौ तत्सर्वं त्यागपूर्वकम् । हुत्वा हस्तेन सूर्यायेत्यादिभिर्दशभिस्ततः। हुत्वा व्याहृतिभिश्चात्र हरेद्भूतबलीनथ । भूतयज्ञं प्रकुर्वीत ह्यग्नेरुत्तरदेशतः । एभिर्भूतबलीन्कृत्वा प्राक्संस्थान्ताश्निरंतरानिति ॥ १६ ॥

“अग्निकुंडाची पूजा करावी असें सांगितलें तिचा विशेष प्रकार सांगतो.” शाकल--‘ विश्वानिनो ’ इत्यादि आठ चरणांनीं पूर्वेपासून ऐशानीपर्यंत क्रमानें आठ दिशांस अग्निकुंडाच्या आसमंतभागीं गंधाक्षत पुष्पादि उपचारांनीं अग्नीची पूजा करून ‘ यस्मैत्वं ’ ह्या ऋचेनें स्तुति करावी. १५. शौनक--अग्निसंस्कार करून आपल्या पुढें ठेवलेलें सिद्धान्न ( शिजलेलें अन्न भात इत्यादि ) पुन्हा तिनदां उदकानें प्रोक्षण करावें, आणि त्या अन्नाचे चार भाग करावे ते असे, एका पात्रांत मध्यें देवयज्ञाचा भाग, उत्तरेस भूतयज्ञाचा भाग, दक्षिणेस पितृयज्ञाचा भाग आणि दुसऱ्या पात्रांत मनुष्ययज्ञाचा भाग. नंतर क्रमानें देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ व मनुष्ययज्ञ त्या त्या भागांतल्या अन्नानें करावे. “आहुति देण्याचा विशेष प्रकार सांगतो.” लौकिक भाषणा विषयीं मौनव्रती असतां अंगुलि सलग्न केलेल्या उताण्या हातावर अंगठ्यानें आहुति द्यावयाचें हविष्यान्न धरून त्याचा आचमन प्रकरणांत सांगितलेल्या हातावरच्या प्रजापति तीर्थानें ( आचमनविधि पृष्ठ ३७ पहा ) होम करावा. कोणत्याही हविर्द्रव्याचा मंत्रानें अग्नींत प्रक्षेप केल्यावर त्या द्रव्यावरची ‘ न मम ’ ह्या शब्दानें स्वकीयसत्ता निवृत्त करावी. याप्रमाणें हातानें अग्नीवर ‘ सूर्याय ’ इत्यादि दहा मंत्रांनीं हवन करून, व्यस्त व समस्त व्याहृतिरूप चार मंत्रांनीं हवन करावें; नंतर भूतयज्ञ ( बलिहरण ) करावा. तो भूतयज्ञ अग्निकुंडाच्या उत्तरप्रदेशीं ‘ सूर्याय ’ इत्यादि मंत्रांनीं यथाक्रम प्राप्त प्राक्संस्थ किंवा उदक्संस्थ ( पहिल्या आहुतीहून दुसऱ्या पूर्वेस देणें यास प्राक्संस्थ अथवा पहिलीच्या उत्तरेस दुसरी तिसरी वगैरे

विष्णुः—मंत्रेणोंकारपूर्वेण स्वाहांतेन विचक्षणः। स्वाहावसाने जुहुयाद्वामहस्तं हृदि न्यसन्निति॥१७॥ व्यासः--जुहुयात्स-र्पिषाभ्यक्तं तैलक्षारविवर्जितं। दध्याक्तंपायसाभ्यक्तं तदभावें-भसा पिवेति॥१८॥ शाकलः—मध्यांगुलित्रयेणैव धारयेद्धो-मभस्म च। ललाटे हृदये बाव्होर्मस्तके मंत्रपूर्वकम्। मानस्तोके थवा चैव बृहत्सामेत्यृचाथवा ॥ १९ ॥ सर्वत्रोंचमइत्यग्निमु-पस्थायाभिवादयेदिति ॥ २० ॥ आश्वलायनसूत्रम्–अथ सायं प्रातः सिद्धस्य हविष्यस्य जुहुयादग्निहोत्रदेवताभ्यः सोमाय वनस्पतयेऽग्नीषोमाभ्यामिंद्राग्निभ्यां द्यावापृथिवीभ्यां धन्वंतरय इंद्राय विश्वेभ्योदेवेभ्यो ब्रह्मणे स्वाहेत्यथ बलि-हरणमेताभ्यश्चैव देवताभ्योऽद्भ्य ओषधिवनस्पतिभ्यो गृहाय गृहदेवताभ्यो वास्तुदेवताभ्य इंद्रायेंद्रपुरुषेभ्यो वरुणाय वरुणपुरुषेभ्यः सोमाय सोमपुरुषेभ्य इति प्रतिदिशं ब्रह्मणे

देणें यास उदक्संस्थ म्हणतात ) परस्परांत अंतर पडणार नाहीं अशा आहुति देऊन करावा. १६. विष्णु—धर्मवेत्त्यानें हृदयावर डावा हात पालथा ठेवून प्रणवादि व स्वाहाशद्बांत मंत्रानें स्वाहाशद्बोचारणाच्या शेवटीं आहुतिदान करावें. १७. व्यास—तेल लवणमिश्रित वर्ज्य करून इतर हविष्यान्नास घृताचा, दह्याचा, दुधाचा अथवा हे पदार्थ नसल्यास उदकाचाही संस्कार करून त्याचा होम करावा. १८. शाकल—मधल्या तीन अंगुलींनीं होमाग्नीचें भस्म ‘ मानस्तोके ’ ह्या ऋचेनें ललाटावर, हृदयावर, दोन भुजांवर व मस्तकावर धारण करावें. अथवा ‘ त्र्यायुषं ’ ह्या ऋचेनें धारण करावें. १९. कोणताही होम झाल्यानंतर ‘ ओंचमे ’ ह्या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करून त्यास नमस्कार करावा. २०. आश्वलायनसूत्रांत-- आतां वैश्वदेव विधि सांगतों. प्रातःकाळीं व सायंकाळीं सिद्ध केलेल्या हविष्यान्नाचा सूर्य, प्रजापति, अग्नि, प्रजापति, सोम वनस्पति इत्यादि देवतांच्या उद्देशानें होम करावा. हा देवयज्ञ होय. आतां बलिहरण—पूर्वोक्त सूर्यादिदेवता व आप्, ओषधि-वनस्पति, गृह, गृहदेवता आणि वास्तुदेवता ह्या देवतांस भूमीवर प्रदक्षिण क्रमानें चक्राकार आहुति देऊन चक्राच्या बाहेर चार दिशांकडे इंद्रादि चार दिक्पालांस व त्यांच्या अनुचरांस आहुति द्याव्या, आणि चक्राच्यामध्यें ब्रह्मा व त्याच्या सभोंवतीं

ब्रह्मपुरुषेभ्य इति मध्ये विश्वेभ्योदेवेभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्यो दिवाचारिभ्य इति दिवा नक्तंचारिभ्य इति नक्तं रक्षोभ्य इत्युत्तरतः स्वधापितृभ्य इति प्राचीनावीती शेषं दक्षिणानिनयेदिति ॥ २१ ॥ विश्वदीपे—पितृयज्ञान्नशेषेण तथा नैर्ऋत्यकोणके । वायव्यकोणे तु तथा शुनोबलिमथाहरेदिति ॥ २२ ॥ शौनकः—भूतयज्ञेपि मंत्राणां स्वाहाकारोभवेदिह । चक्राकारमथाष्टारं कुर्यादग्निसमीपतः । चक्राकारेणयो विप्रः सप्तभूतबलिंहरेत् । सर्वपापविनिर्मुक्तो विष्णुसायुज्यमाप्नुयादिति

चक्राच्यामध्यें प्रदक्षिणक्रमानें ब्रह्मपुरुष, विश्वेदेव, सर्वभूतें, दिवाचारी व नक्तंचारी ह्या देवतांस आहुति देऊन, चक्राच्या उत्तरप्रदेशांत ऐशानी दिशेकडे रक्षोदेवतांस व चक्राच्या दक्षिणप्रदेशीं आग्नेयी दिशेकडे अपसव्य करून पितरांस आहुति द्यावी. २१. विश्वदीपग्रंथांत—पितृयज्ञ करून शेष राहिलेल्या अन्नाच्या नैर्ऋती दिशेकडे व वायवी दिशेकडे श्यामसंज्ञक आणि सबलसंज्ञक श्वानांस आहुति द्याव्या. ह्या सूर्यादिशबलांत देवतांच्या बलिहरणानें भूतयज्ञ व पितृयज्ञ होतात. २२. शौनक—भूतयज्ञांतही सूर्यादिदेवतावाचक शद्बांच्या शेवटीं स्वाहाशद्बाचा प्रयोग करावा, आणि पितृयज्ञामध्यें पितृ शद्बाच्या शेवटीं स्वधा शद्बाचा प्रयोग करावा. “ बलिहरणाची आकृति सांगतो. ” जसें–एखाद्या यंत्राचें चक्र नेमि ( धाव=पाठ्यांचा घेर ), नेमीच्या बाह्यभागास योजनापरत्वें मोठ्या लहान अरा ( दांते ), कीलक ( आस ) व नाभि ( तुंब, तुंबा ) ह्या अवयवांनीं युक्त असतें त्या चक्रासारखें आठ अरांनीं युक्त अग्निकुंडाच्या समीप उत्तरभागीं बलिहरण करावें तें असें–सूर्याय स्वाहा इत्यादि सतरा मंत्रांनीं सतरा आहुतींचा नेमी सारखा संनिवेश ( रचना ) करावा. ‘ इंद्राय, इंद्रपुरुषेभ्यः ’ ह्या मंत्रांनीं पूर्वेस, ‘ यमाय, यमपुरुषेभ्यः ’ ह्यांनीं दक्षिणेस, ‘ वरुणाय, वरुण पुरुषेभ्यः ’ ह्यांनीं पश्चिमेस व ‘ सोमाय, सोमपुरुषेभ्यः ’ ह्यांनीं उत्तरेस असा दोन दोन आहुतींचा मोठ्या अरांसारखा; ‘ ब्रह्मणे ’ ह्या मंत्रानें एक आहुतीचा मध्यें कीलकासारखा; ‘ ब्रह्मपुरुषेभ्यः ’ इत्यादि पांच मंत्रांनीं पांच आहुतींचा कीलकासभोंवतीं नाभीसारखा, आणि ‘ रक्षोभ्यः ’ इत्यादि चार मंत्रांनीं एक एक आहुतीचा ऐशान्यादि चार उपदिशांस लहान अरांसारखा संनिवेश करावा. जो ब्राह्मण प्रत्यहीं असें चक्राकार बलिहरण करील तो पंचसूनादि सर्व पापापासून मुक्त

॥२३॥ याज्ञवल्क्यः–देवेभ्यस्तु हुतादन्नाच्छेषाद्भूतबलिं हरेत्। भूतयज्ञः स वै प्रोक्तोभूतिदः सर्वदेहिनामिति ॥ २४ ॥ आश्वलायनः––यज्ञे मानुष्यके चैव हंतकारोविधीयते। अतो मनुष्य-यज्ञार्थं दद्याद्विप्राय वानले। सनकादिभ्यइत्युक्त्वा हंतकारेण वै हविः। कृत्वामनुष्ययज्ञांतमुपस्थायोंचमे स्वरः। हविर्भुजं नमस्कृत्य गोत्रनामपुरस्सरः। स्मृत्वा यज्ञपतिं देवं हुतं तस्मै निवेदयेदिति ॥ २५ ॥ मनुः––शुनां च पतितानां च श्वपचां पापरोगिणाम्। वायसानां कृमीणां च शनकैर्निक्षिपेद्भुवीति ॥ २६ ॥ शाकलः—सायं स्यात्पितृयज्ञांतं ब्रह्मयज्ञविवर्जितमिति ॥ २७ ॥

## इति वैश्वदेवबलिहरणविधिः

---

होऊन विष्णुसायुज्यरूप मोक्षास प्राप्त होईल. २३. **याज्ञवल्क्य**—वैश्वदेवाकरितां घेतलेल्या सर्व अन्नामध्यें देवयज्ञाच्या भागाचा देवयज्ञ केल्यावर, भूतयज्ञसंबंधी शेषरूपानें राहिलेल्या भागाचा भूतयज्ञ करावा. कर्त्यास व त्याच्या पुत्रपौत्रादि प्रजास बल, वीर्य, धन इत्यादि संपत्ति देणारें म्हणून ह्या कर्मास भूतयज्ञ असें म्हणतात. २४. **आश्वलायन**—मनुष्ययज्ञामध्यें मंत्राच्या अंतीं हंतशब्दाचें उच्चारण करावें असा शास्त्रानियम आहे, म्हणून मनुष्ययज्ञाच्या सिद्धीकरितां ‘ सनकादिमनुष्येभ्योहंत ’ असा मंत्र म्हणून हविष्यान्न ब्राह्मणास द्यावें, अथवा अग्नींत टाकावें. इतकें मनुष्ययज्ञांत कर्म करून ‘ ओंचमे स्वरश्चमे ’ इत्यादि मंत्रानें अग्नीचें उपस्थान करून त्यास स्वकीयगोत्रनामोच्चारणपूर्वक नमस्कार करावा, आणि यज्ञपति विष्णुपरमात्म्याचें चिंतन करून वैश्वदेवकर्म त्यास समर्पण करावें. २५. **मनु**—श्वान, बहिष्कृत मनुष्य, चांडाळ, महारोगी, कावळा आणि कीट या जीवांच्या क्षुधाशांतीकरितां शक्त्यनुसार अन्न भूमीवर हळूंच टाकावें. २६. **शाकल**—वैश्वदेवाच्या प्रातः सायं द्विरावृत्तिपक्षीं सायंकाळीं पंचमहायज्ञांपैकीं देवयज्ञ, भूतयज्ञ व पितृयज्ञ हीं तीन कर्में मात्र करावीं. २७.

**याप्रमाणें वैश्वदेवबलिहरणविधि [ सांगितला. ]**

---

## अथ वैश्वदेवबलिहरणम्

ओं श्रीकेशवाय नमः ॥ ओं श्रीकृष्णाय नमः ॥ एवं द्विः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमात्मसंस्कारार्थमन्नसंस्कारार्थं च प्रातःसायंवैश्वदेवौ बलिहरणे च तंत्रेण करिष्ये ॥ १ ॥ जुष्टोदमूना आत्रेयोवसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ एह्यग्नेराहुगणो गौतमोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ अग्न्यावाहने विनियोगः ॥ २ ॥ ओंजुष्टोदमूनाऽअतिथिर्दुरोणऽइमंनो यज्ञमुपयाहि विद्वान् ॥ विश्वाऽअग्नेऽअभियुजो विहत्या शत्रूयता माभरा भोजनानि ॥ ३ ॥ ओमेह्यग्न इह होतानिषीदादब्धः सुपुरऽएताभवानः ॥ अवतां त्वारोदसी विश्वमिन्वे यजामहेसौमनसाय देवान् ॥ ४ ॥ समस्तव्याहृतीनां परमेष्ठी

### वैश्वदेवबलिहरण.

ओं श्री--द्विवार आचमन व प्राणायाम करावा. ममोपात्त--माझ्या संचित पापाच्या नाशरूप मार्गानें शास्त्रोक्तशरीरसंस्कारान्नसंस्कारपुरस्सर श्रीपरमेश्वराची प्रीति व्हावयाकरितां प्रातःसायंकाळ संबंधी वैश्वदेव आणि बलिहरणें तंत्रानें (स्मृत्युक्तभिन्नदेवताग्रहणपूर्वक एकावृत्तीनें ) करतों. ' बलिहरण हें वैश्वदेवांतर्गतच कर्म असतां शिष्टसंप्रदायानुसार गोबलीवर्दन्यायानें संकल्पामध्यें ह्याचें पुन्हा ग्रहण केलें आहे. १. ह्या ऋचेचा अत्रिपुत्र वसुश्रुत नांवाचा ऋषि, अग्निदेवता व त्रिष्टुप्छंद आणि ' एह्यग्नइह ' ह्या ऋचेचा राहुगणपुत्र गौतम नांवाचा ऋषि, अग्निदेवता व त्रिष्टुप्छंद आणि ह्या दोन्ही मंत्रांचा अग्नीच्या आवाहनाकडे उपयोग. २. प्रहर्षित, निगृहीतांतःकरण, अतिथीसारखा अवश्य पूज्य व ज्ञाता अशा हे अग्नि, तूं आमच्या घरीं ह्या यज्ञामध्यें समीपभागीं ये, आणि आम्हांवर अनुचित कर्माचा मिथ्या आरोप करणाऱ्या सर्व मनुष्यांचें हनन करून आम्हांविषयीं शत्रूंसारखें आचरण करणाऱ्या मनुष्यांचीं अन्न धनादि उपभोग साहित्यें अगदीं हरण कर.३. हे अग्नि, तूं ये, आणि ह्या यज्ञांत देवांचा आव्हान करणारा असा बैस. ज्या अर्थीं तूं राक्षसादिकांनीं अहिंस्य आहेस त्याअर्थीं आमच्या सर्वथा पुरोभागीं प्राप्त हो, आणखी सर्वव्यापक स्वर्ग पृथिवी तुझें रक्षण करोत. तूं आमच्या मनाच्या स्वस्थते करितां देवांची हवि-

प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ अग्निप्रतिष्ठापने विनियोगः ॥
ओं भूर्भुवः स्वः ॥ रुक्मकनामानमग्निं प्रतिष्ठापयामि ॥ ५ ॥
चत्वारिशृंगेति गौतमो वामदेवोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ अग्निमूर्तिध्याने
विनियोगः ॥ ६ ॥ ओंचत्वारिशृंगात्रयो अस्य पादा द्वे शीर्षे
सप्तहस्तासोऽअस्य ॥ त्रिधाबद्धो वृषभो रोरवीति महोदेवो
मर्त्याँ आविवेश ॥७॥ सप्तहस्तश्चतुःशृंगः सप्तजिह्वो द्विशीर्षकः ।
त्रिपात्प्रसन्नवदनः सुखासीनः शुचिस्मितः ॥ स्वाहां तु दक्षिणे
पार्श्वे देवीं वामे स्वधां तथा ॥ विभ्रद्दक्षिणहस्तैस्तु शक्तिमन्नं
स्रुचं स्रुवम् ॥ तोमरं व्यजनं वामैर्घृतपात्रं च धारयन् ॥
आत्माभिमुखमासीन एवंरूपोहुताशनः ॥ मेषारूढोजटाबद्धो

भागांनीं पूजा कर. ४. व्याहृतींचा ऋष्यादिकां सुद्धां अर्थ पूर्वीं लिहिला आहे. येथें या मंत्रांचा अग्निस्थापनाकडे उपयोग. रुक्मक नांवाच्या अग्नीचें स्थापन करतों. ५ ह्या मंत्राचा गौतमपुत्र वामदेवऋषि, अग्निदेवता, त्रिष्टुपछंद व अग्नीच्या मूर्तीचें ध्यान करण्याकडे उपयोग. ६. ज्याचीं ऋग्वेदादि चार वेद हींच शृंगें ( शिंगें ) होत, प्रातःसवन, मध्यान्हसवन व तृतीयसवन हेच तीन चरण होत, इष्टींतील ब्रह्मौदन व सोमांतील प्रवर्ग्य हींच दोन मस्तकें होत, गायत्र्यादि सात छंद हेच सात हात होत, आणि मंत्र ( संहिता ), ब्राह्मण व कल्पसूत्र ह्या तीन ग्रंथांनीं तीन प्रकारचा ( तीन ठिकाणीं ) बांधलेला, असा अनुष्ठान फलांचें वर्षण करणारा वृषभ (वृषभाकारानें उत्प्रेक्षित केलेला ) होत्रादि ऋत्विजांनीं निष्पादित केलेल्या शस्त्रयागस्तुत्यात्मक ऋग्यजुःसामध्वनिरूपांनीं अत्यंत शब्द करतो; अशा प्रकारचा हा महानुभाव यज्ञात्मक अग्निदेव यज्ञविषयक प्रेरणाकर्तृत्वरूपानें मनुष्यांमध्यें (यज्ञ करणारांमध्यें) प्रवेश करतो. ७. सात हात, चार शिंगें, सात जिव्हा, दोन मस्तकें व तीन चरण ह्या अवयवांनीं युक्त, प्रसन्न मुख, सुखानें रहाणारा, सुंदर हास्य करणारा, स्वाहा संज्ञकभार्येस दक्षिणभागीं व स्वधासंज्ञक भार्येस वामभागीं घेणारा, शक्तिनामक आयुध, अन्न, स्रुचा व स्रुवा हे पदार्थ उजव्या अंगाकडील चार हातांनीं आणि तोमर ( भाला ), व्यजन ( वायु घेण्याचें साधन=पंखा ), व घृतपात्र हे पदार्थ डाव्या अंगाच्या तीन हातांनीं धारण करणारा, मेषावर बसलेला, जटाबंध धारण करणारा, पीतवर्ण, महापराक्रमी, धूम्रवर्णध्वजानें व सात मुख्य किरणांनीं युक्त, रक्तनेत्र आणि सर्व मनोरथ पूर्ण करणारा

गौरवर्णोमहौजसः ॥ धूम्रध्वजोलोहिताक्षः सप्तार्चिः सर्व कामदः ॥ ८ ॥ अग्ने वैश्वानर शांडिल्यगोत्र मेषध्वज प्राङ्मुखः सन्मम सम्मुखोवरदोभव ॥९॥ परिसमूहनम् ॥ परिसमूहनम् ॥ परिसमूहनम् ॥ पर्युक्षणम् ॥ पर्युक्षणम् ॥ पर्युक्षणम् ॥ विश्वानिन इति तिसृणामात्रेयो वसुश्रुतोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ द्वाभ्यामर्चनेंत्ययोप-स्थाने विनियोगः ॥११॥ ओं विश्वानिनो दुर्गहा जातवेदः ॥ ओं सिंधुनन्नावादुरितातिपर्षि ॥ ओमग्नेअत्रिवन्नमसागृणानः ॥ ओमस्माकंबोध्यवितातनूनाम् ॥ १२ ॥ ओंयस्त्वाहृदा कीरि-णामन्यमानः ॥ ओममर्त्यंमर्त्योजो हवीमि ॥ ओंजातवेदोयशो अस्मासुधेहि ॥ ओं प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम् ॥ १३ ॥

अशा प्रकारचा यज्ञियाग्नि आपल्या समोर स्थित आहे असें ध्यान करावें. ८. सर्व मनुष्यांच्या जठरांत राहणारा, शांडिल्य गोत्रांत उत्पन्न झालेला व मेषांकित ध्वजानें युक्त अशा हे अग्नि, तूं पूर्वाभिमुख असतोस परंतु, सांप्रत माझ्या सम्मुख होऊन अभीष्ट देणारा हो. ९. अग्नीच्या सभोंवतीं पूर्वेपासून ईशानीपर्यंत प्रदक्षिण क्रमानें पालथा हात भूमीस लावीत त्रिवार उदक शिंपडावें, आणि उताणा हात भूमीस न लावतां तीनदां उदक शिंपडावें. १०. विश्वानिन इत्यादि तीन ऋचांचा अत्रीचा पुत्र वसुश्रुत नांवाचा ऋषि, अग्निदेवता, त्रिष्टुप छंद आणि पहिल्या दोन ऋचांनीं पूजेविषयीं व तिसरीनें स्तवनाविषयीं ( हीं कर्मे करणें हा ) उपयोग. ११. हे सकल प्राणिगोचर अग्ने, जसें-नौका समुद्रापासून लोकांस पार नेते तसें, दुःखाचें नाशन करणारा तूं जीं परिणामीं दुःखानेंच भोगावयास योग्य अशा सर्व पापांपासून आम्हांस अत्यंत पार नेतोस. तसेंच जसें-तूं अत्रिऋषीचें संरक्षण करतोस तसें, आमच्या स्तोत्रानें स्तुत असतां आमच्या शरीरांचें संरक्षण करीत होत्साता जागृत ( सावधान ) ऐस. १२. हे धनवंत अग्ने, अविनाशी असा जो तूं त्या तुझें मृत्युलोकांत राहणारा मी स्तवनामध्यें अत्यंत संनिवेशित अंतःकरणानें स्तवन करीत असतां अतिशयित

ओंयस्मैत्वं सुकृते जातवेद उलोकमग्ने कृणवस्योनम् ॥ अश्विनं सपुत्रिणं वीरवंतं गोमंतं रयिं नशते स्वस्ति ॥ १४ ॥ ओं सूर्याय स्वाहा ॥ सूर्यायेदं न मम ॥ ओं प्रजापतये स्वाहा ॥ प्रजापतय इदं न मम ॥ ओमग्नये स्वाहा ॥ अग्नय इदं न मम ॥ ओं प्रजापतये स्वाहा ॥ प्रजापतय इदं न मम ॥ ओं सोमाय वनस्पतये स्वाहा ॥ सोमाय वनस्पतय इदं न मम ॥ ओम-ग्नीषोमाभ्यां स्वाहा ॥ अग्नीषोमाभ्यामिदं न मम ॥ ओमिंद्रा-ग्निभ्यां स्वाहा ॥ इंद्राग्निभ्यामिदं न मम ॥ ओं द्यावापृथि-वीभ्यां स्वाहा ॥ द्यावापृथिवीभ्यामिदं न मम ॥ ओं धन्वं-तरये स्वाहा ॥ धन्वंतरय इदं न मम ॥ ओमिंद्राय स्वाहा ॥ इंद्रायेदं न मम ॥ ओं विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥ विश्वेभ्यो देवेभ्य इदं न मम ॥ ओं ब्रह्मणे स्वाहा ॥ ब्रह्मण इदं न मम ॥ ओं भूः स्वाहा ॥ अग्नय इदं न मम ॥ ओं भुवः स्वाहा वायव इदं न मम ॥ ओं स्वः स्वाहा ॥ सूर्यायेदं न मम ॥ ओं भूर्भुवः स्वः स्वाहा ॥ प्रजापतय इदं न मम ॥१५॥ परिसमूहनम् ३ ॥ पर्युक्षणम् ३ ॥ ओं विश्वानिनो० शते

आव्हान करतों म्हणून तूं मला धन व प्रजा दे कीं, तूं दिलेल्या प्रजेनें मी अविच्छिन्न संतानास प्राप्त होईन. १३. हे बुद्धिमान् अग्ने, तूं ज्या उत्तम आचरण करणाऱ्या पुरुषास सुखकारक लोक देतोस, तेथें तो पुरुष पुष्कळ अश्वांनींयुक्त, बहुत पुत्रांनीं-युक्त, बहुत वीरपुरुषांनीं युक्त आणि बहुत गायींनीं युक्त अशा कधींही नाहीशी न होणाऱ्या संपत्तीस प्राप्त होतो. १४

मी सूर्यास हविर्द्रव्य देतों, हें सूर्यासच प्राप्त असो, त्यावर माझी सत्ता नाहीं. इत्यादि. भूः, भुवः, आणि स्वः, ह्या व्यस्त व्याहृत्यात्मक तीन मंत्रांनीं दिलेल्या आहु-तींच्या त्यागाविषयीं अग्नि, वायु व सूर्य ह्या त्याच मंत्रांच्या देवता वृद्धपराशर—

स्वस्ति ॥ १६ ॥ मानस्तोकेति कुत्सोरुद्रो जगती ॥ विभूतिग्रहणे विनियोगः ॥ ओं मानस्तोके तनये मान आयौ मानो गोषुमानोऽअश्वेषुरीरिषः ॥ वीरान्मानो रुद्र भामितोवधीर्हविष्मंतः सदमित्वा हवामहे ॥१७॥ त्र्यायुषं जमदग्नेरिति ललाटे ॥ कश्यपस्य त्र्यायुषमितिकंठे ॥ अगस्त्यस्य त्र्यायुषमितिनाभौ॥ यद्देवानां त्र्यायुषमिति दक्षिणस्कंधे ॥ तन्मेऽअस्तु त्र्यायुषमिति वामस्कंधे ॥ सर्वमस्तु शतायुषमिति शिरसि ॥ १८ ॥ बलिहरणं चक्राकारमष्टारं दर्शितक्रमेण कृत्वा ॥ १९ ॥

स्मृतीच्या अनुसंधानानें घेतलेल्या आहेत. १५. पूर्वीप्रमाणें १६. ह्या ऋचेचा कुत्स-ऋषि, रुद्रदेवता, जंगती छंद आणि भस्मग्रहणाकडे उपयोग. हे रुद्रा, आम्ही सदैव ( सर्वदाच ) हविर्द्रव्य युक्त होऊन तुझें आव्हान करतों, म्हणून तूं आमच्या पुत्रांवर व पौत्रांवर प्रहार करूं नको, आमच्या पुत्रपौत्रव्यतिरिक्त अशा दुसऱ्या मनुष्यांवरही प्रहार करूं नको, आमच्या गायींवर प्रहार करूं नको, आणि आमच्या अश्वांवर प्रहार करूं नको. आणखी तूं क्रोधाच्या स्वाधीन होऊन आमच्या शूर पुरुषांस मारूं नको. १७ बालावस्था, तरुणावस्था आणि वृद्धावस्था हीं तीन आयुष्यें होत. एकच आयुष्याच्या धर्मभेदानें आयुष्यच पृथक् पृथक् अशी विवक्षा. ‘ त्र्यायुषं ’ म्हणजे तीन आयुष्यांचा समुदाय; हा समाहारद्वंद्व समास आहे. जमदग्नि, कश्यप, अगस्त्य आणि देव ह्यांचें जें ( जसें ) त्र्यायुष आहे तें ( तसें ) मला प्राप्त होवो. “ अल्प कालांतच असें त्र्यायुष जाईल ह्या शंकेनें यज्ञकर्ता पुनः प्रार्थना करतो. ” जें मनुष्याचें शतवर्षात्मक आयुष्यप्रमाण आहे तें सर्व मला प्राप्त असो. ‘ त्र्यायुषं ’ इत्यादि सहा वाक्यांमध्यें इतिकरणापर्यंत बृहत्साम ऋचात्मक मंत्र होय. अशा प्रकारानें मंत्रोच्चारण करून भस्मधारण करण्याविषयीं आपस्तंबसूत्रांत व्यवस्था केली आहे. १८. पृष्ठ ( २०१ ) त दाखविलेल्या आठ अरांनींयुक्त चक्रासारखें बलिहरण करून प्रार्थना करावी. १९.

पूर्वा.

ओमिन्द्रपुरुषेभ्यःस्वाहा

१९

ओमिन्द्रायस्वाहा

१८

आग्नेयी.

दक्षिणा.

ओंसोमायवन-
स्पतयेस्वाहा

ओंब्रह्मणे
२६
स्वाहा

उत्तरा.

ओंसोमपुरुषेभ्यःस्वाहा

२५

ओंसोमाय स्वाहा

२४

ऐशानी.

नैर्ऋती.

वायवी.

पश्चिमा.

( अग्नौ ) ३६ ओं सनकादिमनुष्येभ्योहंत ॥

ओं चमे स्वरश्चमे यज्ञोपचते नमश्च ॥ यत्ते न्यूनं तस्मैत उपयत्ते-
तिरिक्तं तस्मै ते नमः ॥२०॥ स्वस्ति श्रद्धां मेधां यशः प्रज्ञां विद्यां

‘ यज्ञ ’ म्हणजे यज्ञात्मक अग्ने, ‘ ते ’ तुला ‘ नमश्च ’ वारंवार नमस्कार असो. तुझ्या प्रसादानें ‘ मे ’ मला ‘ ओं ’ पुत्रजन्मादिनिमित्तानें मंगलात्मक जातकर्म-संस्कारादिकर्तृत्व व सोमादियज्ञकर्तृत्व प्राप्त असो; ‘ च ’ आणि ‘ मे ’ मला ‘ स्वरः ’ नित्यपूजादिनिमित्तानें सुस्वर स्तुतिकर्तृत्व प्राप्त असो, ‘ च ’ आणखी ‘ उप ’ हीं तीन्हीं कर्मे करण्याविषयीं सामर्थ्य प्राप्त असो. हे अग्ने, ‘ ते ’ तुझ्या

बुद्धिं श्रियम् बलम् ॥ आयुष्यं तेज आरोग्यं देहि मे हव्य-
वाहन ॥ अमुकप्रवरान्वितामुकगोत्रोत्पन्नोऽमुकशर्माहमग्ने त्वाम-
भिवादयामि ॥ २१ ॥ अनेन वैश्वदेवबलिहरणाख्येन कर्मणा
श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ २२ ॥ ये भूताः प्रचरंति दिवानक्तं
बलिमिच्छंतो वितुदस्य प्रेष्यास्तेभ्योबलिं पुष्टिकामो हरामि
मयि पुष्टिं पुष्टिपतिर्ददातु स्वाहा ॥ २३ ॥ ऐंद्रवारुणवायव्यां

प्रीती करितां मीं जें कर्म केलें तें ' यत् ' जर ' न्यूनं ' मंत्रतंत्रादिकानें हीन असेल तर ' उप ' त्याच्या पूर्णतेकरितां ' तस्मै ' यज्ञकर्त्यास अन्नधनपुत्रादिसंपत्ति-रूपानें सुख देणाऱ्या प्रसिद्ध अशा त्या ' ते ' तुला ' नमः ' नमस्कार असो. अथवा ' ते ' तुझ्या प्रीतीकरितां मीं जें कर्म केलें तें ' यत् ' जर ' अतिरिक्तं ' शास्त्रविहित मंत्रतंत्रद्रव्यपरिमाणादिकांपेक्षां वर्णक्रियापरिमाणांनीं अधिक असेल तर ' उप ' त्याच्या हीनतेकरितां ' तस्मै ' यज्ञकर्त्याच्या धननाशादि दुःखाचें हरण करणाऱ्या प्रसिद्ध अशा ' ते ' तुला ' नमः ' नमस्कार असो. ' उप ' हें अव्यय व्याप्तिवाचक आहे. व्याप्ति म्हणजे न्यूनातिरिक्तरूप अव्याप्त्यतिव्याप्तींची शून्यता. अशा अर्थाच्या विवक्षेनें ह्या उपशद्बाच्या एकवार प्रयोगानें उभयार्थांची सिद्धि होते. ह्या प्रार्थनेनें न्यूनातिरिक्तजन्यदोषनिवृत्त्यात्मक फल मागावयाचें. ' तस्मै तस्मै ' हे शद्ब साभिप्रायानें अग्नीच्या सर्वपदार्थदातृत्वहरणकर्तृत्वरूप विशेषणीभूत सर्व प्रसिद्ध अर्थांचें वाचक आहेत. ' ओंचमें ' इत्यादि हा सौत्र मंत्र आहे. २० हे देवा-दिकांस हविर्भागप्रापकरणाऱ्या अग्ने, पुत्रादिसंततिरूप कल्याण, धर्माविषयीं आस्तिक्यबुद्धि, अनुभूत पदार्थविषयक ज्ञानाची धारणाशक्ति, कीर्ति, सदसत्पदार्थां-विषयीं विचारशक्ति, ब्रह्मसाक्षात्कारोपायात्मक उपनिषदादिजन्य ज्ञानशक्ति, पदार्थ-मात्रांचें ज्ञान, धनादि संपत्ति, शरीरशक्ति, शतवर्षप्रमाण जीवनसत्ता, शरीरकांति आणि नीरोगता ( रोगरहितत्व ) हे पदार्थ मला दे. हे पदार्थ प्राप्त करून घेण्या-करितां हे अग्ने, तुला अमुक ( अमुक शद्बाच्या ठिकाणीं जसें जसें प्रवरादिक असेल तसें तसें म्हणावें ) प्रवरयुक्त अमुक गोत्रांत उत्पन्न झालेला अमुक नांवाचा मी नमस्कार करतों. २१. ह्या वैश्वदेव बलिहरणकर्मानें परमात्मा प्रीति करो. २२. जीं यमाचीं किंकरभूतें दिवसरात्र बलिहरण करण्याच्या इच्छेनें सर्वत्र संचार करतात त्यांस पुष्टतेची इच्छा करणारा मी बलिदान करतों, तेणें करून पुष्टि देणारा यम

यास्यां नैर्ऋतिकाश्च ये ॥ ते काकाःप्रतिगृण्हंतु भूम्यां पिंडं मयार्पितम् ॥ २४ ॥ वैवस्वतकुले जातौ द्वौ श्यामशबलौ शुनौ ॥ ताभ्यां पिंडोमयादत्तो रक्षेतां पथि मां सदा ॥ २५ ॥ ओं श्री-केशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी-गायत्री ॥ व्याहृतीनां प्राणायामे विनियोगः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ विष्णवे नमो विष्णवे नमो विष्णवे नमः ॥ २६ ॥

## इति वैश्वदेवबलिहरणम्.

---

माझ्या शरीरांत पुष्टतेची स्थापना करो. 'स्वाहा' म्हणजे हें बलिदान भूतांस उत्तम प्रकारानें प्राप्त असो. २३. पूर्व, पश्चिम, वायव्य, दक्षिण, नैर्ऋती इत्यादि सर्व दिशांस जे काक (कावळे) असतील ते सर्व मीं भूतांच्या उद्देशानें भूमीवर दिलेला हविर्द्रव्याचा बलिरूप पिंड ग्रहण करोत. २४. यमाच्या गृहांत उत्पन्न झालेले जे श्याम व शबल नावाचे दोन कुत्रे आहेत त्यांस मीं पूर्वी बलि दिला आहे म्हणून ते माझें वैतरण्यादियुक्त मार्गांत सर्वदा रक्षण करोत. २५. आचमन व प्राणायाम करून विष्णूस नमस्कार करावा. २६.

यांप्रमाणें वैश्वदेवबलिहरण [ सांगितलें ].

---

## अथ भिक्षादानविधिः

पराशरः—नृयज्ञसिद्धये दद्याद्भिक्षां संकल्पपूर्विकामिति ॥ १ ॥ कूर्मपुराणे—हंतकारमथाग्रं वा भिक्षां वा; शक्तितो

## भिक्षादानविधि.

" जसें,—वैश्वदेवामध्यें 'पितृभ्यः स्वधा नमः' ह्या आहुतीनें पितृयज्ञ होत असतां सामर्थ्य असल्यास पितरांचा संतोष होऊन आपला अधिक अभ्युदय व्हावया-करितां गृहस्थानें पुन्हा नित्य श्राद्ध करावें, तसें,–'सनकादिमनुष्येभ्योहंत' ह्या आहुतीनें नृयज्ञ होत असतां आणखीही सनकादिकांच्या उद्देशानेंच ब्राह्मणांस भिक्षा-

द्विजः ॥ दद्यादतिथये नित्यं बुध्वा तं परमेश्वरमिति ॥ २ ॥
मार्कंडेयपुराणे—अज्ञातकुलनामानं तत्काले समुपस्थितम् ॥
बुभुक्षमागतं श्रांतं याचमानमकिंचनम् ॥ ब्राह्मणं प्राहुरतिथिं
संपूज्यः शक्तितोबुधैरिति ॥ ३ ॥ मनुः--ग्रासमात्रा भवे-
द्भिक्षा अग्रं ग्रासचतुष्टयम् ॥ अग्रं चतुर्गुणीकृत्य हंतकारो
विधीयत इति ॥ ४ ॥ यमः--सत्कृत्य भिक्षवे भिक्षां यः
प्रयच्छति मानवः ॥ गोप्रदानसमं पुण्यं तस्याह भगवान्यम
इति ॥ ५ ॥ चतुर्विंशतिमते--यतिश्च ब्रह्मचारी च विद्यार्थी
गुरुपोषकः ॥ अध्वगः क्षीणवृत्तिश्च षडेते भिक्षुकाः स्मृता इति
॥ ६ ॥ व्यासः—यतिहस्ते जलं दद्याद्भैक्षं दद्यात्पुनर्जलम् ॥

दान करावें, असें सांगतो ". पराशर—मनुष्य यज्ञाच्या सिद्धीकरितां सनकादि मनुष्योद्देशरूप संकल्पानें ब्राह्मणास भिक्षा द्यावी. १ कूर्मपुराणांत—गृहस्थ द्विजानें प्रत्यहीं अतिथि हा परमेश्वर आहे अशा भावनेनें त्यास स्वशक्त्यनुरूप हंतकार, अग्र अथवा भिक्षा तरी द्यावी. २. " आतां अतिथीचें व हंतकारादिकांचें लक्षण सांगतों. " मार्कंडेयपुराणांत—ज्याचें कुळ व नांव माहीत नाहीं, मध्यान्हकाळीं दृष्टिगोचर झालेला, निर्धन, भुकेला, थकलेला आणि स्वतांच येऊन ‘ भवान् भिक्षां देहि ’ इत्यादि वाक्यांनीं अन्नाची याचना करणारा अशा ब्राह्मणास अतिथि असें म्हणतात. ह्या अतिथीचा शास्त्रसंपन्न गृहस्थानें आसनपाद्यादि उपचारांनीं प्रथमतः सत्कार करावा. ३. मनु—एक घासा एवढ्या अन्नास भिक्षा, चार घासां एवढ्या अन्नास अग्र आणि सोळा घासां एवढ्या अन्नास हंतकार असें म्हणतात. ४. यम—जो गृहस्थ भिक्षुकास सत्कार करून भिक्षा देतो त्यास गाईच्या दानाच्या पुण्या एवढें पुण्य प्राप्त होतें असें भगवान यम म्हणतो. ५ " भिक्षुकाचें लक्षण सांगतो " चतुर्विंशतिमतांत—सन्यासी, ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमांत असूनहि वेदादि चौदा विद्यांतील विद्या शिकणारा, मातापितरादि वृद्धांचें पोषण करण्याविषयीं आसक्त, यात्रेकरू आणि धान्यादि जीविकेनें हीन अशा सहा प्रकारच्या ब्राह्मणास भिक्षुक असें म्हणतात. ६. " यतीस भिक्षा देण्याचा विशेष प्रकार सांगतों. " व्यास—गृहस्थानें प्रथम यतीची पूजा करून त्याच्या हातावर उदक द्यावें आणि भिक्षा देऊन पुन्हा उदक द्यावें. अशा विधीनें यतीस भिक्षादान केलें असतां त्यास त्या भिक्षेनें पर्वतप्राय अन्न

भैक्षं पर्वतमानं स्यात्तज्जलं सागरोपममिति ॥ ७ ॥ गौतमः--
वैश्वदेवे तु संप्राप्ते भिक्षुके गृहमागते ॥ उध्दृत्य वैश्वदेवार्थं भिक्षां
दत्वा विसर्जयेत् ॥ वैश्वदेवाकृतं पापं शक्तोभिक्षुर्व्यपोहितुम् ॥
न हि भिक्षुकृतान्दोषान्वैश्वदेवोव्यपोहतीति ॥८॥ व्यासः—
पंचयज्ञान्महायज्ञान्नकरोति गृहाश्रमी ॥ तस्य नायं न च परो·
लोकोभवति धर्मत इति ॥ ९ ॥

॥ इति भिक्षादानविधिः ॥

---

दिल्याचें व त्या उदकानें समुद्रा एवढें उदक दिल्याचें फळ प्राप्त होईल. ७. गौतम—
गृहस्थानें आपल्या घरीं मध्यान्हकाळीं वैश्वदेव करण्याच्या पूर्वीं भिक्षेसाठीं भिक्षुक
प्राप्त झाला असतां, सिद्ध केलेल्या पाकांतून वैश्वदेवासाठीं अन्न काढून ठेवावें आणि
त्यास भिक्षा देऊन त्वरित मार्गस्थ करावें. कारण वैश्वदेवाचा समय प्राप्त झाला असतां
तो केल्यावाचून भिक्षुकास भिक्षा दिल्यानें वैश्वदेवसंबंधी कालातिक्रमणादिकानें प्राप्त
झालेल्या दोषाचें निवारण करण्यास भिक्षादानजन्य पुण्य समर्थ होतें, परंतु वैश्व-
देवाच्या कालातिक्रमणादि निमित्तानें योग्यकाळीं भिक्षेसाठीं आलेला भिक्षुक भिक्षे-
वाचून सर्वथा पराङ्मुख झाला असतां तज्जन्य दोषाचें निवारण करण्यास प्राप्तकाळीं
अनुष्ठानमात्रानें वैश्वदेव समर्थ होत नाहीं. भिक्षादान कर्माची सर्वथा हानि करण्या-
पेक्षां वैश्वदेवाच्या प्राप्त समयादिरूप अंगाची अगतिक निमित्तानें हानि करावी हें न्याय्य
आहे. ८ व्यास—जो गृहस्थ प्रतिदिवशीं पंचमहायज्ञ करीत नाहीं त्यास धर्माचर-
णाच्या कीर्तीनेंयुक्त असा हा लोक प्राप्त होत नाहीं, आणि पंचमहायज्ञजन्य पुण्या-
चाच अभाव असल्यानें परलोकहि प्राप्त होत नाहीं. ९.

याप्रमाणें भिक्षादानविधि [ सांगितला ].

---

## अथ देवतानैवेद्यविधिः[1]

आश्वलायनः—वैश्वदेवं पुरा कृत्वा नित्ये चाभ्युदये तथा ॥ स्वाभीष्टदेवतादिभ्यो नैवेद्यं विनिवेदयेत् ॥ १ ॥ अकृत्वा वैश्वदेवं तु नैवेद्यं योनिवेदयेत् ॥ तदन्नं न च गृण्हंति देवा विष्ण्वादयो ध्रुवमिति ॥ २ ॥ स्कांदे—नानाव्यंजनसंयुक्तं रसषट्कैस्तु संस्कृतम् ॥ निवेद्यान्नं समाप्नोति फलं यज्ञाधिकं द्विज इति ॥ ३ ॥ ब्रह्मसंहितायाम्—तुलसीगंधपुष्पैश्च संपूज्यान्नं हरेः प्रियम् ॥ संप्रोक्ष्यार्घ्यजलेनैव संरक्ष्यास्त्रेण सर्वतः ॥ धेनुमुद्रां प्रदर्श्याथ ततोदेवं निवेदयेदिति ॥ ४ ॥ गौतमः—अथामृतोपस्तरणमसि स्वाहार्पयेज्जलम् ॥ स्पृशेत्कनिष्ठोपकनिष्ठिके द्वे स्वांगुष्ठमूर्ध्नी प्रथमेह मुद्रा ॥ तथा परातर्ज-

## देवतानैवेद्यविधि.

आश्वलायन—प्रतिदिवशीं नैवेद्य समर्पणाच्या पूर्वीं आणि गर्भाधानादि अभ्युदययुक्त दिवशीं अभ्युदय कर्मसंबंधी नांदीश्राद्धाच्याहि पूर्वीं वैश्वदेव ( उपलक्षणानें पंचमहायज्ञ) करून स्वाभीष्ट विष्ण्वादि सर्व देवांस नैवेद्य समर्पण करावा. १. जो ब्राह्मण वैश्वदेव केल्यावाचून नैवेद्य समर्पण करील तें त्यानें समर्पण केलेलें नैवेद्यान्न विष्ण्वादि देव कधींहि ग्रहण करीतच नाहींत. २. स्कंदपुराणांत—जो द्विज मधुर लवणादि षड्रसांनीं संस्कृत केलेलें व भाज्या, कोशिंबिरी, चटण्या इत्यादि नाना प्रकारच्या जिव्हेस व्यंजन करणाऱ्या ( स्वाद आणणाऱ्या ) पदार्थांनीं युक्त असें खाद्य, चोष्य, लेह्य आणि पेय अशा रूपानें निवेदन करावयास योग्य असें अन्न देवांस अर्पण करील तो यज्ञफळापेक्षांहि अधिक फळास प्राप्त होईल. ३. ब्रह्मसंहितेंत—विष्णु वगैरे देवांची गंधपुष्पादि उपचारांनीं पूजा करून त्यांस प्रिय अशा अन्नाचें शुद्धोदकानें प्रोक्षण करून सर्व दिशांस करतलमुद्रा प्रदर्शनरूप अस्त्रस्थापनानें भूतपिशाच्यादि दृष्टिदोषापासून संरक्षण करावें, आणि त्या अन्नावर धेनुमुद्रा करून तें देवांस निवेदन करावें. ४. गौतम—प्रथम 'अमृतोपस्तरणमसि स्वाहा' असा मंत्र म्हणून जल अर्पण करावें, आणखी कनिष्ठिका (करंगळी) व अनामिका (करंगळी जवळचें बोट) ह्या दोन

---

१ देवास नैवेद्य दाखविण्याचा विधि.

निमध्यमे स्यादनामिकामध्यमिके च मध्या ॥ अनामिकातर्जनि-मध्यमे स्याच्चद्वचतुर्थी सकनिष्ठिकास्ताः ॥ स्यात्पंचमी तद्वदादि-प्रदिष्टाः प्राणादिमुद्रा निजमंत्रयुक्ता इति ॥५॥ चंद्रिकायाम्—प्राणापानव्यानोदानसमानास्तारपूर्वकाः ॥ चतुर्थ्याग्निवधू-युक्ताः प्राणमंत्राः स्मृता अमीति ॥ ६ ॥ भविष्ये—पानीयं चामृतीकृत्य परेशाय निवेदयेत् ॥ मूलमंत्रं जपेदत्र ततोनारा-यणात्मकम् ॥ अष्टोत्तरशतं चैव अष्टाविंशतिमेव वा ॥ क्षणं विमृश्य मतिमान् दद्यादाचमनं ततः अमृतापिधानमसि स्वाहेति मनुना मुने ॥ ७॥ मुकुंदाशनशिष्टं तु भुंक्ते यस्तु दिने दिने ॥ सिक्थे सिक्थे भवेत्पुण्यं चांद्रायणशताधिकमिति ॥ ८ ॥

## इति देवतानैवेद्यविधिः

---

बोटांच्या अग्रांस अंगठ्याचें अग्र लावलें असतां प्रथम मुद्रा होते, तर्जनी (अंगठ्याजवळचें बोट) व मध्यमा (मधलें बोट) यांच्या अग्रांस अंगठ्याचें अग्र लावलें असतां दुसरी मुद्रा, अनामिका व मध्यमा यांच्या अग्रांस अंगठ्याचें अग्र लावलें असतां चवथी मुद्रा आणि अंगठ्यासहित सर्व बोटांचीं अग्रें एकत्र केलीं असतां पांचवी मुद्रा होते. ह्या प्राणादि पांच वायूंच्या पांच मुद्रा, त्यांच्या मंत्रांच्या उच्चारणाच्या वेळीं कराव्या असें पूर्वाचार्यांनीं सांगितलें आहे. ५. चंद्रिकाग्रंथांत—प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे चतुर्थीविभक्तियुक्त शब्द प्रणवादिस्वाहाशब्दांत केले असतां ह्यांस प्राणमंत्र असें म्हणतात. ६. भविष्यपुराणांत—हे मुने, देवांस पांच प्राणाहुति निवेदन केल्या-वर वाळ्यानें सुवासित केलेलें उदक निवेदन करून एकशेंआठ वेळां अथवा अठ्ठावीस वेळां नारायणाच्या मूलमंत्राचा जप करावा, आणि क्षणभर विराम करून ‘अमृतापि-धानमसि स्वाहा’ ह्या मंत्रानें आचमन निवेदन करावें. ७. जो मनुष्य विष्णूचा नैवेद्यप्रसाद प्रतिदिवशीं भक्षण करील त्यास प्रत्येक शिताच्या भक्षणानें शेंकडो चांद्रा-यणांच्या फळापेक्षां अधिक फळ मिळेल. ८.

याप्रमाणें देवतानैवेद्याचाविधि [ सांगितला ].

---

## अथ देवतानैवेद्यः

ओं श्रीकेशवाय नमः०॥ ओं श्रीकृष्णाय नमः॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ओं श्रीविष्णुशंकरगणेशसूर्यदेवीभ्यो नमः ॥ चंदनं समर्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्योनमः तुलसीपत्रपुष्पं समर्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्योनमः धूपं समर्पयामि ॥ ओं श्रीविष्णु० भ्योनमः दीपं समर्पयामि॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः सोपस्करपक्वान्नमहानैवेद्यं समर्पयामि ॥ १ ॥ अमृतोपस्तरणमसि स्वाहा ॥ ओं प्राणाय स्वाहा ॥ ओमपानाय स्वाहा॥ ओं व्यानाय स्वाहा॥ ओमुदानाय स्वाहा॥ ओं समानाय स्वाहा ॥ ओं ब्रह्मणे स्वाहा ॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः पानीयं समर्पयामि ॥२॥ ओं नमोनारायणाय ॥३॥ अमृतापिधानमसि स्वाहा ॥ ४ ॥ ओं श्रीविष्णु० भ्यो नमः हस्तप्रक्षालनं मुखप्रक्षालनं करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि ॥५॥

इति देवतानैवेद्यः

---

## देवतानैवेद्य.

ओं श्री० पूर्वीप्रमाणें. ओं श्रीविष्णु० विष्णु, शंकर इत्यादि देवांस चंदन, तुलसीपत्र, पुष्प, धूप व दीप मी भक्तीनें अर्पण करतों; आणि मीठ, तिखट, केशर, वेलदोडे इत्यादि मसाल्यांनीं पक्व केलेल्या अन्नांचा महानैवेद्य समर्पण करतों. १ अमृतोप—या मंत्रांचा अर्थ भोजन प्रकरणांत लिहावयाचा आहे. ओंश्री–देवांस नैवेद्यभक्षणाच्यामध्यें उदक देतों. २. नारायणास नमस्कार असो. हा जप्य मंत्र आहे. ३. अर्थ भोजनांत लिहावयाचा आहे. ४. मी देवांस हस्ताच्या व मुखाच्या प्रक्षालनाकरितां उदक आणि हस्ताचा ओषटपणा जावयाकरितां चंदन समर्पण करतों. ५.

याप्रमाणें देवतानैवेद्य [ सांगितला ].

---

## अथ ब्राह्मणभोजनविधिः

दक्षः—एकोहि भक्षयत्यन्नमपरोन्नेन भक्ष्यते ॥ न भुज्यते स एवैको योऽन्नं भुंक्ते ससाक्षिकमिति ॥१॥ याज्ञवल्क्यः—अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः श्रोत्रियो वेदपारगः । मान्यावेतौ गृहस्थस्य ब्रह्मलोकमभीप्सितः । भोजयेच्चागतान्काले सखिसंबंधि बांधवानिति ॥ २ ॥

## इति ब्राह्मणभोजनविधिः

---

## ब्राह्मणभोजनविधि.

**दक्ष**—जो द्विज एकटाच अन्नभक्षण करतो त्यास हा ' ब्राह्मणांची उपलब्धि असतां केवळ आपल्यासाठींच पाक करूं नये ' अशा स्मृत्युक्त निषेधाचें उल्लंघन करणारा म्हणून शत्रूसारखा मानून अन्नदेवता भक्षण (शास्त्रोल्लंघनजन्य दोष परिणामात्मक दुःख उत्पन्न ) करते, परंतु जो द्विज सामर्थ्यानुसार निरपेक्ष ब्राह्मण, आप्त, मित्र इत्यादिकांस पंक्तीला घेऊन भोजन करतो त्यास मात्र अन्नदेवता भक्षण (दोषाधिकारी) करीत नाहीं. १. **याज्ञवल्क्य**—गृहस्थानें आपल्या घरीं प्रवास करणारा असा साधारण ब्राह्मण प्राप्त होईल तो अतिथि आहे असें समजून त्याचा सत्कार करावा, आणि तसाच जो ब्राह्मण वेदाध्ययन करणारा आहे त्याची व जो ब्राह्मण सार्थ वेदांत पारंगत आहे त्याची अर्घ्यपाद्यादि उपचारांनीं पूजा ब्रह्मलोकाच्या प्राप्तीकरितां करावी, आणि ह्यांस व भोजनकालीं प्राप्त झालेल्या मित्र, आप्त, बंधुजन इत्यादिकांसहि भोजन घालावें.

याप्रमाणें ब्राह्मणभोजनाचा विधि [ सांगितला ].

---

## अथ ब्राह्मणभोजनम्.

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ तिथिर्विष्णुस्तथा वारो नक्षत्रं विष्णुरेव च ॥ योगश्च करणं चैव सर्वं विष्णुमयं जगत् ॥ १ ॥ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्राह्मणान्सदक्षिणं भोजयिष्ये ॥ २ ॥ तदंगब्राह्मणपूजनं करिष्ये ॥ ३ ॥ प्रयंतपाणिः शरणं प्रपद्ये स्वस्ति संबाधेष्वभयं नोअस्तु ॥ चरणं पवित्रंविततं पुराणं येनपूतस्तरंति दुष्कृतानि ॥ तेन पवित्रेण शुद्धेन पूताः अतिपाप्मानमरातिं तरेम ॥ लोकस्य द्वारमर्चिवत्पवित्रम् ॥ ज्योतिष्मद्भ्राजमानं महस्वत् । अमृतस्य धारा बहुधा दोहमानम् ॥ चरणं नोलोके सुधितां दधातु ॥ ४ ॥ ब्राह्मणेभ्यः भूर्भुवः स्वः इदमासनम् ॥

### ब्राह्मणभोजन.

ओंश्री-पूर्वीप्रमाणें. तिथि—तिथि, वार, नक्षत्र, योग, करण इत्यादि कालदेशादि भेदानें दृश्यमान सर्व जगत विष्णुरूपात्मक आहे. म्हणून मी संकल्पामध्यें देशकालांचा प्रतिनिधि विष्णूचें स्मरण केल्यानें कर्माविषयीं अधिकारी होतों. १ मी परमेश्वराच्या प्रीतिकरितां ब्राह्मणांस दक्षिणादानपुरस्सर भोजन घालतों. २. आणि भोजनाच्या निमित्तानें ब्राह्मणांची पूजा करतों. ३. " पूजाकर्ता अतिथ्यादि रूपांनीं प्राप्त झालेल्या श्रोत्रियवेदपारगादि ब्राह्मणांच्या चरणांची चरण हेंच पूजित केलें असतां उत्तम लोकांस गमनाविषयीं द्वारभूत आहे अशा मंत्रबद्ध प्रशंसेनें प्रथम स्तुति करतो. " अहो विप्रांनो, मी तुमच्या चरणास हस्त जोडून शरणागत झालों आहे म्हणून आम्हांस प्राप्त झालेल्या दुःखांचा नाश होणें हेंच कल्याण व पुढें प्राप्त होणाऱ्या दुःखाविषयीं अभय हे दोन पदार्थ चरणकृपेनें प्राप्त असोत. ' चरण ' म्हणजे चरणावयव (पाय) अथवा सशास्त्र आचरण. अहो विप्रांनो, तुमचें चरण हें सर्वांस पवित्र करण्याविषयीं सृष्टिक्रमा पासून प्रवृत्त होत असतां विस्तृत झालें आहे. ज्या चरणानें शुद्ध झालेला पुरुष पापांपासून तरतो, इतरांस पवित्र करणारें व स्वतां पवित्र अशा त्या चरणानें आम्हीं शुद्ध होऊन पातकरूप शत्रूचें उल्लंघन करूं. पूजित केलें असतां पूजा करणारास शुद्ध करून ज्ञानात्मक प्रकाश देणारें, स्वतां देदीप्यमान, स्वर्गादि लोकांस जाण्याविषयीं

स्वासनम् ॥ आवाहने अर्घ्यस्थाने संकल्पात्तिसिद्धिरस्त्विति भवंतो ब्रुवंतु ॥ अस्तु संकल्पसिद्धिः ॥ गंधाः पांतु ॥ सुमंगलयं चास्तु ॥ अक्षताः पांतु ॥ आयुष्यमस्तु ॥ पुष्पाणि पांतु ॥ सौश्रे-यसमस्तु ॥ तांबूलानि पांतु ॥ ऐश्वर्यमस्तु ॥ दक्षिणाः पांतु ॥ बहुधेयं चास्तु ॥ नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षि शिरोरुबाहुवे ॥ सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधा-रिणे नमः ॥ सकलाराधनैः स्वर्चितमस्तु ॥ अस्तु सकलारा-धनैः स्वर्चितम् ॥ ५ ॥ प्रजापते हिरण्यगर्भः प्रजापतिस्त्रिष्टुप् ॥ अन्नसमर्पणे विनियोगः ॥ ओं प्रजापते नत्वदेतान्यन्योवि-श्वाजातानि परितावभूव ॥ यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तुवयं स्यामपतयोरयीणाम् ॥ ६ ॥ एकोविष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्य-नेकशः । त्रीन्लोकान्व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ॥७॥

द्वारा सारखें साधनभूत, अमृताच्या धारांनीं अनेक प्रकारांनीं वृष्टि करणारें आणि माहात्म्य-युक्त असे चरण आह्मांस स्वर्गादि लोकांमध्यें सुखरूप अवस्था प्राप्त करो. ४. ब्राह्मणांस हें आसन देतों. ' प्रतिवचन ' उत्तम आसन आहे. पूजेच्या पूर्वीं केलेल्या आवाहना ( आमंत्रणा ) विषयीं व पादप्रक्षालनादिकांस पूजोदकप्रतिनिधिरूपानें दिलेल्या उदकाविषयीं ह्या पूजेमध्यें मत्कर्तृक स्मरणमात्रानें त्या त्या उपचारांची सिद्धि होवो असें आपण कृपा करून बोला कीं, आपल्या वचनानें सिद्धि होईल. ' प्रत्युत्तर ' स्मरणानें सिद्धि होवो. गंधाःपातु० नित्यदान प्रकरणांत अर्थ लिहिला आहे. ५. प्रातर्होमप्रकरणांत अर्थ लिहिला आहे. ६. " ब्राह्मण हे विष्णुरूपच आहेत अशा भावनेनें पूजाकर्ता विष्णूचें स्मरण करतो. " स्थावरजंगमात्मक सर्वभूतांस उपादान कारणरूपानें उत्पन्न करणारा असा विष्णु आहे म्हणून हाच एक महाभूत होय असा हा निमित्तमात्रानें महाभूतसंज्ञक, प्राणिमात्रांमध्यें जीवरूपानें स्थित असणारा, सकलजीवात्मरूपानें जन्ममरणसुखदुःखादिकांचा उपभोग करणारा आणि असाहि असून स्वतां अविनश्वर असा विष्णु भिन्न भिन्न रूपांनीं व्यक्त होणाऱ्या अनेकानेक भूतांस ( सर्व प्राण्यांस ) व त्यांच्या आधारभूत पृथिव्यादि तीन लोकांस व्यापून अन्नोदकादि सकलवस्तूंचा उपभोग करतो. म्हणूनच मी ब्राह्मणांची केलेली पूजा आणि त्यांस द्यावयाचें भोजनहि विष्णूसच प्राप्त आहे. ७. ह्या ब्राह्मणभोजनानें व

अनेन ब्राह्मणभोजनेन तेन श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ ८ ॥
यंतु नदयो वर्षंतु पर्जन्याः ॥ सुपिप्पला ओषधयो भवंतु ॥
अन्नवता मोदनवता मामिक्षवताम् ॥ एषा राजा भूयासम् ॥ ९ ॥
ओदनमुद्रुवते ॥ परमेष्ठी वा एषः ॥ यदोदनः ॥ परमामेवैन
श्रियं गमयति ॥ १० ॥

॥ इति ब्राह्मणभोजनम् ॥

---

त्याच्या अंगभूत पूजेनें परमात्मा प्रीति करो. ८. " यजमान यथाविधि शक्त्यनुसार ब्राह्मणांची पूजा करून प्रार्थना करतो. " सर्व नद्या परिपूर्ण वाहोत. मेघ स्वस्वकालीं वृष्टि करोत. व्रीहि, यव, गोधूमादिक औषधि उत्तम फलयुक्त होवोत. पोळी लाडु इत्यादि प्रशस्त भक्ष्यानेंयुक्त, अतिशयित व्रीह्यादिकांच्या ओदनानेंयुक्त आणि दधि-दुग्धादिरसांनीं युक्त अशा ह्या ग्रामांमध्यें मी सर्व पदार्थांच्या उपभोगजन्य सुखानें वास करणारा श्रेष्ठ होवों. ९. " यजमानास ब्राह्मण आशीर्वाद करतात " ज्याअर्थीं यजमान आसनपाद्यादि उपचारपूर्वक उत्कर्षानें अतिथींस ओदन ( भोजन ) देतो त्याअर्थीं, ओदन हा प्राण्यांमध्यें बलवीर्यादिक उत्पन्न करणारा परमेष्ठी ( ब्रह्मदेव ) होय, हा ओदनात्मक परमेष्ठीच ह्या यजमानास उत्तम संपत्ति प्राप्तकरो. १०. ' यंतु नदयो ' इत्यादि मंत्र शिष्टसंप्रदायानुसार येथें लिहिले आहेत.

याप्रमाणें ब्राह्मणभोजन [ सांगितलें. ]

---

## अथ भोजनविधिः

मनुः—देवानृषीन्मनुष्यांश्च पितॄन्गृह्याश्च देवताः ॥ पूजयित्वा ततः पश्चाद्गृहस्थः शेषभुग्भवेदिति ॥ १ ॥ याज्ञवल्क्यः—पर-

## भोजनविधि.

मनु—गृहस्थानें देव, ऋषि, पितर व सनकादिक मनुष्य ह्यांची पंचमहायज्ञा-दिरूप पूजा करून आणखी देवासारखे मान्य व घरांत विद्यमान असे माता, पिता

पाकरुचिर्न स्यादनिंद्यामंत्रणादृते । वाक्पादपाणिचापल्यं वर्जयेच्चातिभोजनमिति ॥ २ ॥ मनुः—सायंप्रातर्द्विजातीना मशनं श्रुतिचोदितम् । नांतरा भोजनं कार्यमग्निहोत्रसमो विधि रिति ॥ ३ ॥ कात्यायनः—दिवसस्य पंचमे तु भागे भोजन-माचरेदिति ॥ ४ ॥ व्यासः—पंचार्द्रोभोजनं कुर्यात्प्राङ्मुखो मौनमास्थितः ॥ हस्तौ पादौ तथैवास्यमेषु पंचार्द्रता मतेति ॥५॥ अश्वमेधिके—आर्द्रपादस्तु भुंजीयात्प्राङ्मुख श्वासने शुचौ ॥ पादाभ्यां धरणिं स्पृष्ट्वा पादेनैकेन वा पुनरिति ॥६॥ मनुः—

इत्यादि वृद्ध जन आणि अतिथि प्रभृतिरूपांनीं प्राप्त झालेले ब्राह्मण ह्यांची आसनादि उपचारपूर्वक भोजनात्मक पूजा करून नंतर अवशिष्ट अन्नाचें भोजन करावें. १. **याज्ञवल्क्य**—गृहस्थानें ज्ञातिकुलादि गुणांनीं अनिंद्य अशा मनुष्याकडे व अशा मनुष्यद्वारानें आमंत्रण आल्या शिवाय दुसऱ्याच्या अन्नाचें भोजन करण्याची इच्छाहि करूं नये. आणखी खोटें बोलणें इत्यादि वाक्चापल्य ( वाणीचा चंचळपणा ), फोडणें, फाडणें इत्यादि हस्तचापल्य व उडणें, ओलांडणें इत्यादि पादचापल्य इत्यादि निरर्थक कर्मे आणि शरीरास परिणामीं विकार होईल असें पचनशक्तीपेक्षां अधिक भोजन करूं नये. २. **मनु**—जसा अग्निहोत्राचा अदृष्टाकरितां दोनवेळां अवश्य होम करावा असा वेदानें सांगितलेला विधि आहे तसा, द्विजातीय गृहस्थानें एकादश्यादि उपवासाचें निमित्त नसतां नियमीतकालीं दिवसां एकदा व रात्रीं एकदा असें दोनदा अवश्य भोजन करावें, मध्यें तिसऱ्यानें भोजन करूं नये ही देखील वेदानें सांगितलेली आज्ञा आहे. ३. **कात्यायन**—दिवसाच्या पांचव्या[१] अष्टमांशांत भोजन करावें. ४. **व्यास**—गृहस्थानें दोन हात, दोन पाय व तोंड अशी पांच धुऊन पूर्वेकडे तोंड करून कोणाशीं भाषण न करतां भोजन करावें. ५. **आश्वमेधिक-ग्रंथांत**—दोन पाय धुऊन लाकूड वगैरेंच्या स्वच्छ आसनावर दोन पाय टेकून ( उकेडवें ) अथवा एक पाय टेकून ( एक मांडी घालून ) पूर्वेकडे तोंड करून बसून भोजन करावें. ६. " कामनापरत्वें दिशाभेद सांगतो. " **मनु**—पूर्वेकडे तोंड करून

---

१. दिनमानाचे आठ भाग करून त्यावरून जो पांचवा भाग येईल तो भाग. उदाहरण–दिनमान घटी ३२ याचा आठवा भाग ४ घटिका येतात म्हणून पांचव्या भागास आरंभ १६ घटिकांपासून होतो व समाप्ति २० घटिकांस होते म्हणून या पांचव्या भागांत भोजन करावें.

आयुष्यं प्राङ्मुखो भुंक्ते यशस्यं दक्षिणामुखः ॥ श्रियं प्रत्यङ्मुखो भुंक्ते ऋतं भुंक्ते ह्युदङ्मुख इति ॥ ७ ॥ ब्रह्मपुराणे—चतुरस्रं त्रिकोणं च वर्तुलं चार्धचंद्रकं ॥ कर्तव्यमानुपूर्व्येण ब्राह्मणादिषु मंडलमिति ॥ ८ ॥ पैठीनसिः—सौवर्णे राजते ताम्रे पद्मपत्रपलाशयोः । भाजने भोजनं कुर्यात्त्रिरात्रफलमश्नुत इति ॥ ९ ॥ मनुः—उपस्पृश्य द्विजोनित्यमन्नमद्यात्समाहितः । भुक्त्वा चोपस्पृशेत्सम्यगद्भिः खानि च संस्पृशेत् ॥ १० ॥ पूजयेदशनं नित्यमद्याच्चैतदकुत्सयन् । दृष्ट्वा हृष्येत्प्रसीदेच्च प्रतिनंदेच्च सर्वशः ॥ पूजितं ह्यशनं नित्यं बलमूर्जं च यच्छति ॥ अपूजितं तु तद्भुक्तमुभयं नाशयेदिदमिति ॥ ११ ॥ संग्रहे—

बसून भोजन केलें असतां उत्तम आयुष्य प्राप्त होतें, दक्षिणेकडे तोंड करून बसून भोजन केलें तर कीर्ति, पश्चिमाभिमुख बसून केलें असतां संपत्ति, आणि उत्तरेकडे तोंड करून बसून भोजन केलें असतां मानसादिनिष्ठ सत्यता प्राप्त होते. ७. **ब्रह्मपुराणांत**—भोजन पात्राखालीं ब्राह्मणानें चौकोन, क्षत्रियानें त्रिकोण, वैश्यानें वाटोळें आणि शूद्रानें अर्धचंद्राकार असें पाण्यानें मंडळ करावें. ८. **पैठीनसि**—सोनें, रुपें, तांबें, कमळ किंवा पळस यांच्या पात्रांत नियमानें भोजन केलें असतां, एक दिवस नक्त एक दिवस अयाचित व एक दिवस उपास अशा त्रिदिनात्मक व्रताचें फळ प्राप्त होतें. ९. **मनु**—द्विजानें प्रत्यहीं आचमन करून स्वस्थ अंतःकरणानें भोजन करावें, आणि भोजन झाल्यावर पुन्हा आचमन करून नाक, डोळे व दोन कान यांस पाण्यानें स्पर्श करावा. १०. प्रतिदिवशीं अन्न हें नित्य नैमित्तिक कर्में करण्याविषयीं अत्यंत साधनभूत शरीरास परम सुखानें शक्ति देणारें आहे अशा भावनेनें प्रतिदिवशीं तें पाहिल्याबरोबर प्रसन्नतेनें आनंदित होऊन समाधानयुक्त व्हावें आणि त्या अन्नास वंदन करून आपल्यास अप्रिय अशा कडु तिखट इत्यादि अन्न गुणांवर दोषाच्या आरोपानें त्याची निंदा न करतां तें भक्षण करावें, कारण अशा प्रकारानें निरंतर अन्नाचें पूजन करून भक्षण केलें असतां तें भक्षणकर्त्यास बल व वीर्य देतें, आणि जर अन्नाच्या आपल्या न आवडणाऱ्या कडु इत्यादि गुणांवर दोषरूपात्मक अपूजन करीत तें भक्षण केलें असतां मनाच्या असमाधानानें प्राप्त झालेल्या बलवीर्यांचाहि नाश करतें. ११. "पात्रावर अन्न वाढण्याचा प्रकार सांगतो." **संग्रहांत**—व्यक्त

शाकादि पुरतः स्थाप्यं भक्ष्यं भोज्यं च वामतः ॥ अन्नं मध्ये प्रतिष्ठाप्यं दक्षिणे घृतपायसमिति ॥ १२ ॥ पैठीनसिः--लवणं व्यंजनं चैव घृतं तैलं तथैव च ॥ लेह्यं पेयं च विविधं हस्तदत्तं न भक्षयेदिति ॥ १३ ॥ व्यासः--यस्त्वेकपंक्त्यां विषमं ददाति स्नेहेन लोभेन भयेन वापि ॥ दैवेन दष्टं मुनिभिश्च गीतं तद्ब्रह्महत्यां मुनयो वदंतीति ॥ १४ ॥

रीतीनें पात्राच्या पुढच्या भागांत भाज्या व कोशिंबिरी परंतु त्यांतहि भाज्यांस महत्त्व आहे म्हणून त्या उजव्या बाजूस व कोशिंबिरी डाव्या बाजूस वाढाव्या हें योग्य आहे. डाव्या बाजूस वडे, पापड इत्यादि भक्ष्य व लाडू, पोळ्या इत्यादि भोज्य वाढावें. मध्यभागीं भात, वरण, केशरीभात, मसालेभात इत्यादि अन्न वाढावें, आणि उजव्या बाजूस तूप, खीर, दहि इत्यादि पदार्थ वाढावे. १२. पैठीनसि--मीठ, आंबटी, भाजी, कढी इत्यादि व्यंजन वस्तु, तूप, तेल, श्रीखंड, खीर, पंचामृत इत्यादि लेह्य ( चाटावयास योग्य ) वस्तु आणि दूध, रस इत्यादि पेय ( पिण्यास योग्य ) वस्तु हे सर्व पदार्थ पात्रा शिवाय ( पळी वगैरे शिवाय ) केवळ हातानें वाढले असतां ते भक्षण करूं नयेत. १३. व्यास--जो मनुष्य एका पंक्तींत पुत्रादिकांस ममतेनें, धनिकादिकांस लोभानें अथवा भाऊ वगैरे यांस भयानेंहि अन्न उदक, आसन इत्यादि पदार्थ देण्याविषयीं एकास अधिक, चांगलें, एकास कमी, वाईट इत्यादि प्रकारची तारतम्य बुद्धिपुरस्पर प्रतारणा ( प्रपंच ) करील तर त्यानें केवळ ही प्रतारणारूप ब्रह्महत्त्याच केली असें धर्मशास्त्रप्रवर्तक मन्वादि ऋषि म्हणतात. अशा प्रतारणेनें ब्रह्महत्त्याजन्य दोषासारखा दोष प्राप्त होतो असें प्रसिद्ध व सशास्त्र असतां अन्नोदकादिकांच्या अल्प लाभाकरितां परिणामीं महादुःखकारक प्रतारणात्मक कर्म करण्यास मंदगति मनुष्यानेंहि प्रवृत्त होऊं नये, परंतु जो प्रवृत्त होईल त्यास केवळ हा प्रवृत्त्यात्मदैवरूप उन्मत्त श्वानानेंच निष्कारण दंश केला आणि त्यावर प्रतारणा ही ब्रह्महत्त्या सत्य आहे अशी अबाधित वचनार्थ ऋषिरूप मेघांनीं गर्जना केली असेंच होय. कारण तो दंशपरिणामदुःखासारखें प्रतारणापरिणामदुःख भोगण्यास पात्र झाला, आणि जसें, उन्मत्त श्वानानें दंश केल्यावर मेघांनीं गर्जना केली असतां दंशजन्य वेदनेचा औषधादिकांनींहि प्रतिकार होत नाहीं तसें, त्रैकालव्यापक ऋषिवचनानें प्रतारणा ही ब्रह्महत्त्या सत्य आहे असें वर्णन केलें म्हणून प्रतारणाजन्य दुःखाचा प्राय-

ब्रह्मपुराणे—पात्राद्ग्रासं समुध्दृत्य सम्यक्पात्रांतरे क्षिपेत् ॥ जलमादाय मंत्रेण गोग्रासं विनिवेदयेत् ॥ सौरभेय्यः सर्व-हिताः पवित्राः पुण्यराशयः ॥ प्रतिगृण्हंतु मे ग्रासं गावस्त्रै-लोक्यमातरः ॥ दद्यादनेन मंत्रेण गवां ग्रासं सदैव हीति ॥१९॥ गृह्यपरिशिष्टे—पात्रस्थमन्नं प्रणवव्याहृतिपूर्वया सावित्र्या-भुक्ष्य स्वादोपितोमधोपितावित्यभिमंत्र्य सत्यंत्वर्तेन परि-षिंचामीति दिवा परिषिंचेदृतंत्वा सत्येन परिषिंचामीति रात्रा-वथ दक्षिणतो भुवि भूपतये भुवनपतये भूतानां पतयइति नमोंतैः प्राक्संस्थं प्रत्यक्संस्थं वा बलीन्विकीर्य समुध्दृत्य हस्तं प्रक्षाल्य समाहितोऽमृतोपस्तरणमसीत्यपः प्राश्य सव्येन पाणिना पात्र-मालभ्य तर्जनीमध्यमांगुष्ठैः प्राणाय मध्यमानामिकांगुष्ठैरपाना-यानामिकाकनिष्ठांगुष्ठै र्व्यानाय कनिष्ठातर्जन्यंगुष्ठैरुदानाय सर्वांगुलिभिः समानाय स्वाहेति मुखे जुहुयात्सर्वाभिरेव वा

श्चित्तादिकांनींहि प्रतिकार व्हावयाचा नाहीं. १४. ब्रह्मपुराणांत—वाढलेल्या पात्रां-तून सर्व पदार्थांचा एक घासा एवढा भाग काढून दुसऱ्या पात्रांत ठेवावा, आणि हातांत उदक घेऊन मंत्रपूर्वक संकल्पानें तो गायीस अर्पण करावा. तो मंत्र असा—सौरभेय्यः सर्वहिताः पवित्राः पुण्यराशयः । प्रतिगृण्हंतु मे ग्रासं गावस्त्रैलोक्यमातरः ॥ या मंत्रानें प्रत्यहीं गाईस घास द्यावा. १५. गृह्यपरिशिष्टांत—पात्रांत वाढलेलें अन्न प्रणवव्याहृतिपूर्वक गायत्रीमंत्रानें प्रोक्षण करून 'स्वादोपितो' इत्यादि मंत्रानें अभिमंत्रित करून पात्राच्या सभोंवतीं प्रदक्षिण क्रमानें 'सत्यं त्वर्तेन परिषिंचामि' ह्या मंत्रानें दिवसां व रात्रीं 'ऋतंत्वा सत्येन परिषिंचामि' ह्या मंत्रानें उदक शिंप-डावें, आणि पात्राच्या उजव्या बाजूस जमिनीवर 'भूपतये नमः, भुवनपतये नमः, भूतानां पतये नमः' ह्या तीन मंत्रांनीं पूर्वेकडून पश्चिमेकडे अथवा पश्चिमेकडून पूर्वेकडे अशा क्रमानें तीन आहुति देऊन, त्या एकीकडे काढून हात धुऊन स्वस्थ मनानें 'अमृतोपस्तरणमसि' ह्या मंत्रानें उदकाचें आचमन करून डाव्या हातानें पात्रास स्पर्श करून तोंडांत उजव्या हाताच्या तर्जनी (अंगठ्या जवळचें बोट), मधलें बोट व अंगठा या तीन बोटांनीं प्राणवायूस, मधलें बोट, करंगळी जवळचें बोट व अंगठा ह्यांनीं अपानवायूस; करंगळी जवळचें बोट, करंगळी व अंगठा ह्यांनीं व्यान-

सर्वेभ्यो जुहुयादेवं प्रतिग्रासं ब्रह्मणे स्वाहेत्यातृप्ति वाग्यतो भुक्त्वामृतापिधानमसीत्यपिधानं प्राश्य शोधितमुखपादपाणि र्द्विराचामेदेवं भुंजानोग्निहोत्रफलमश्नुते बलपुष्टिमान्भवति सर्वमायुरिति ॥ १६ ॥ शौनकः—स्वाहांताः प्रणवाद्याश्च नाममंत्राश्च वायवा इति ॥ १७ ॥ अत्रिः—मधुपर्के च सोमे च अप्सु प्राणाहुतीषु च । नोच्छिष्टस्य भवेद्दोष स्त्वत्रेश्च वचनं यथेति ॥ १८ ॥ विष्णुपुराणे—प्राग्द्रवं पुरुषोश्नीयान्मध्ये च कठिनाशनः । अंते पुनर्द्रवाशी तु बल्यारोग्यैर्न मुंचति ॥ १९ ॥ जठरं पूरयेदर्धमन्नैर्भागं जलस्य च । वायोः संचरणार्थाय चतुर्थमवशेषयेदिति ॥ २० ॥ वृद्धमनुः —भोजनं तु न निःशेषं

वायूस; करंगळी, अंगठ्याजवळचें बोट व अंगठा ह्यांनीं उदानवायूस; व सर्व बोटांनीं समानवायूस त्या वायूच्या मंत्रानें आहुति द्यावी; अथवा सगळ्या बोटांनीं प्राणादि सर्व वायूंस आहुति द्यावी. असेंच लौकिक भाषणाविषयीं मौनव्रती होत्साता सर्व बोटांनीं 'ओं ब्रह्मणे स्वाहा' ह्या मंत्रानें प्रत्येक घास घेत असतां तृप्ति होईपर्यंत भोजन करून ' अमृतापिधानमसि ' ह्या मंत्रानें अन्नाच्या आवरणाकरितां उदकाचें आचमन करून हात धुऊन तोंड, पाय व पुन्हा हात धुऊन दोनदां विधीप्रमाणें आचमन करावें. अशा लक्षणानेंच भोजन करीत असणारा ब्राह्मण बलवान्, पुष्ट व शतायु होऊन अग्निहोत्रफळास प्राप्त होतो. १६. **शौनक**—प्रणवादि स्वाहाशद्बांत प्राणादिवायुवाचक नामांस त्या त्या वायूंचे मंत्र असें म्हणतात. १७. **अत्रि**—मधुपर्क ( दह्यानें मिश्रित मध ), सोम व आचमनादि उदक ह्यांचें प्राशन आणि प्राणाहुत्यादि ग्रासांचें भक्षण कर्तव्य असतां प्रथमादि प्राशनानें किंवा भक्षणानें उच्छिष्ट झालेल्या हस्तादिकांचा द्वितीयादि प्राशनास अथवा भक्षणास दोष नाहीं असें अत्रिऋषीचें वचन आहे. १८. **विष्णुपुराणांत**—पुरुषानें भोजनकर्मामध्यें पूर्वीं द्रवीभूत (पातळ, नरम) अन्नाचें, मध्यें कठिन अन्नाचें आणि शेवटीं पुन्हा द्रवीभूत अन्नाचें भक्षण करावें, असें भोजन केलें असतां त्याचें बळ व आरोग्य नष्ट होणार नाहीं. १९. उदराचा अर्धा भाग अन्नानें व चवथा भाग उदकानें भरावा, आणि चवथा भाग जीवनवायूच्या संचाराकरितां अवशिष्ट ठेवावा. २०. **वृद्धमनु**--विद्वान गृहस्थानें दहि, जव गहू इत्यादिकांच्या पिठांचे केलेले पदार्थ, तूप, तिलयुक्त पदार्थ, दुध, मध व पाणि ह्या पदार्थां-

कुर्यात्प्राज्ञः कथंचन । अन्यत्र दधिसक्त्वाज्यपललक्षीरमध्वप इति ॥ २१ ॥ बृहस्पतिः—न स्पृशेद्वामहस्तेन भुंजानोऽन्नं कदाचन । न पादौ न शिरोबस्तिं न पदा भोजनं स्पृशेदिति ॥ २२ ॥ पराशरः--एक पंक्त्युपविष्टानां विप्राणां सहभोजनं । यद्येकोऽपि त्यज्येत्पात्रं शेषमन्नं न भोजयेदिति ॥ २३ ॥ बृहस्पतिः—अग्निना भस्मना चैव स्तंभेन सलिलेन वा । द्वारेणैव च मार्गेण पंक्तिच्छेदो बुधैः स्मृत इति ॥ २४ ॥ संग्रहे--नृणां भोजनकाले तु यदि दीपोविनश्यति । तदन्नं पाणिना स्पृष्ट्वा सावित्रीं मनसा स्मरेत् ॥ पुनर्दीपं ततोलब्ध्वा शेषं भुंजीतकामत इति ॥ २५ ॥ देवलः--भुक्त्वोच्छिष्टं समाघ्राय सर्वेभ्यो घृतवर्जितम् । उच्छिष्टभागधेयेभ्यः सोदकं निर्वपेद्भुवि । अमृतापिधानमसीत्यपः प्राश्य भुवि क्षिपेत् ॥ २६ ॥

शिवाय इतर अन्नाचा थोडातरी अवशेष ठेवून भोजन करावें. २१. **बृहस्पति**--भोजन करीत असतां कधींहि डाव्या हातानें अन्नास, पायांस, मस्तकास व बेंबीच्या खालच्या भागास स्पर्श करूं नये, आणि पायानें भोजनाच्या पात्रास व अन्नास स्पर्श करूं नये. 'डाव्या हातानें प्राणाहुतीपर्यंतच भोजनपात्रास स्पर्श करावा अशा पक्षीं हा पादादिकांविषयीं हस्तस्पर्शाचा निषेध आहे. २२. **पराशर**--ब्राह्मण एक पंक्तीनें भोजनास बसले असतां तेंच त्यांचें सहभोजन होय. त्यांतून एखादाहि ब्राह्मण जर भोजनपात्र टाकून उठेल तर अन्य ब्राह्मणांनींहि भोजन करतांना शेष राहिलेलें अन्न भक्षण करूं नये. २३. **बृहस्पति**—अग्नि, भस्म, घराचा खांब, जल, द्वार व मार्ग हे पदार्थ मध्यें असल्यास भिन्न पंक्ति ( पंक्तिभेद ) होते, असें स्मृतिकार म्हणतात. २४. **संग्रहांत**—द्विज भोजन करीत असतां जर दिवा जाईल तर त्यानें पात्रांतील अन्नास हातानें स्पर्श करून अतःकरणांत गायत्रीचें चिंतन करावें, आणि पुन्हा दिवा लावल्यानंतर पात्रांतील बाकी राहिलेलें अथवा ध्यावयाचें अन्न यथेष्ट भक्षण करावें. २५. **देवल**—ज्याचा बाप मेला असेल त्या गृहस्थानें भोजन झाल्यानंतर तुपाशिवाय उष्टया अन्नाचें अवघ्राण करून उच्छिष्ट भागाचें ग्रहण करणाऱ्या सर्व असंस्कृत ( जातकर्मादि संस्कार न झालेल्या ) मृत पितरांच्या उद्देशानें तें अन्न उदकासहित भूमीवर टाकावें तें असें--प्रथमतः तें अन्न 'अस्मत्कुले' इत्यादि मंत्रानें

उत्थाय बहिरागत्य मुखहस्तादि शोधयेत् । आचम्य च ततः कुर्याद्दंतकाष्ठस्य भक्षणम् । भोजने दंतलग्नानि निर्हृत्याचमनं चरेत् । दंतलग्नमसंहार्यं लेपं मन्येत दंतवत् । न तत्र बहुशः कुर्याद्यत्नमुद्धरणं प्रतीति ॥ २७ ॥ कौर्मे—आचांतः पुनराचामेदायंगौरितिमंत्रतः । द्रुपदां वा त्रिरावृत्य सर्वपापप्रणाशिनीम् ॥ २८ ॥ प्राणानां ग्रंथिरसीत्यालभेत हृदं ततः ॥२९॥ आचम्यांगुष्ठमानीय पादांगुष्ठे तु दक्षिणे । निस्रावयेद्धस्तजलमूर्ध्वहस्तः समाहितः । हुतानुमंत्रणं कुर्याच्छ्रद्धया इति मंत्रतः ॥ ३० ॥ अष्टाक्षरेण स्वात्मानं योजयेद्ब्रम्हणेतिहि ।

भूमीवर टाकून नंतर हातावर उदक घेऊन त्यांतील अर्धें उदक ‘ अमृतापिधानमसि ’ ह्या मंत्रानें प्राशन करून अवशिष्ट राहिलेलें ‘ रौरवे ’ इत्यादि मंत्रानें त्या अन्नावर द्यावें. २६. गृहस्थानें भोजन झाल्यानंतर उठून भोजनघराच्या बाहेर येऊन तोंड, हात, पाय यांचें प्रक्षालन करून तोंड स्वच्छ होण्याकरितां चूळ भरून दांतांत अडकलेले अन्नाचे कण गवत इत्यादिकाच्या काडीनें काढून पुन्हा बारा चूळ भरावे. दातांत अडकलेलें अन्न त्यांस पीडा झाल्याशिवाय निघतच नाहीं असें असल्यास तें दांतांसारखेंच तोंडांत धारण करण्यास शुद्ध आहे असें मानून त्यास काढण्याचा फारसा यत्न करूं नये. २७. कूर्मपुराणांत—हें सर्व मुखप्रक्षालनादि कृत्य झाल्यावर विध्युक्त आचमन करून पुन्हा “ आयंगौः ’ या ऋचेची अथवा सर्व पापाचा नाश करणाऱ्या ‘ द्रुपदादिव ’ इत्यादि ऋचेची तीनदां आवृत्ति करून आचमन करावें. २८. असें उभयविध आचमन झाल्यावर ‘ प्राणानां ग्रंथि ’ इत्यादि मंत्रानें हृदयास स्पर्श करावा. २९. त्यानंतर उजव्या पायाच्या अंगठ्यावर उजवा हात वर धरून त्याच्या अंगठ्यानें उदक पाडावें, आणि भोजनरूप केलेल्या हवनाचें ‘ श्रद्धयाग्निः ’ ह्या सूक्तानें स्थिरीकरण करावें, कीं ज्याच्या योगानें वमनादि बाधा होऊं नये. ३०. ‘ ओं नमोनारायणाय ’ ह्या मंत्रानें स्वकीय जीवात्मा व परमात्मा हे एकच ( अभिन्न ) आहेत अशी भावना करावी. सर्व यज्ञांमध्यें आत्मार्थ ( जीवसंर-

सर्वेषामेव यागानामात्मयागः परः स्मृतः । योऽनेन विधिना कुर्यात्स याति ब्रह्मणः पदमिति ॥ ३१ ॥

इति भोजनविधिः

---

क्षणाकरितां ) भोजनात्मक यज्ञ करणें हा सर्व यज्ञांस निदानभूत असल्यानें श्रेष्ठ आहे, म्हणून जो ब्राह्मण ह्या विधीनें भोजन करील तो मोक्षास जाईल. ३१.

याप्रमाणें भोजनविधि [ सांगितला. ]

---

## अथ भोजनम्.

ओं श्रीकेशवाय नमः ओं श्रीकृष्णाय नमः ॥ इतिद्विः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ओं ब्रह्म मेतुमाम् ॥ मधुमेतुमाम् ॥ ब्रह्म-

### भोजन.

ओं श्री—दोनदां आचमन व प्राणायाम करावा " ब्रह्मसाक्षात्कारविषयक ज्ञानास प्रतिबंधक ब्रह्महत्यादि पापाच्या निवृत्तीविषयीं कारणीभूत सुपर्णनामक तीन मंत्र आहेत त्यांचा पापापासून मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या विप्रांनीं जप करावा असा त्रिसुपर्ण मंत्रांच्या अर्थावरूनच नियम प्राप्त होतो, आणि त्रिसुपर्ण मंत्रांचा जप करणारा ब्राह्मण स्वतां शुद्ध होऊन आपल्या सहस्र ब्राह्मणव्यक्तिपरिमित पंक्तींत भोजनासाठीं बसलेल्या निंद्य आचरण करणाऱ्या ब्राह्मणास शुद्ध करतो असाही त्रिसुपर्ण मंत्रांतच अर्थ आहे. अत एव आपणांस अविदित निंद्य आचरण करणारा ब्राह्मण पंक्तींत असल्यास तत्घटितपंक्तिनिविष्टस्वभोजनकर्तृत्वजन्य दोष प्राप्त न व्हावा ह्या हेतूनें पंक्तिभोजनाच्या पूर्वी आवश्यक त्रिसुपर्णमंत्रपठनाचा शिष्टाचार आहे म्हणून येथें हे मंत्र लिहिले आहेत ". ओं ब्रह्ममेतु—परब्रह्मतत्त्व मला प्राप्त होवो. आनंदरस मला प्राप्त होवो. जो ब्रह्मशब्दवाच्य पदार्थ तोच मधुशब्दवाच्यपदार्थ आहे, ह्यांत विशेषतः भेद नाहीं

मेवमधुंमेतुमाम् ॥ यास्ते सोमप्रजावत्सोभि सोअहम् ॥ दुष्वप्नहंदुरुःषह ॥ यास्ते सोमप्राणाःस्ताञ्जुहोमि ॥ त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् ॥ ब्रह्महत्यां वा एतेघ्नंति ॥ ये ब्राम्हणास्त्रिसुपर्णं पठंति ॥ ते सोमं प्राप्नुवंति ॥ आसहस्रात्पंक्तिं पुनंति ॥ ओं ब्रह्ममेधयां ॥ मधुमेधयां ॥ ब्रह्ममेव मधुमेधयां ॥ अद्यानोदेव सवितः प्रजावत्सावीः सौभगम् ॥ परादुष्वप्नियःसुव ॥ विश्वानिदेवसवितर्दुरितानि परासुव ॥ यद्भद्रं तन्म

म्हणून ब्रह्म व मधु ह्या उभयशब्दप्रतिपाद्य अखंडैकरसात्मक जें आनंदब्रह्मरूप वस्तु आहे तें मला प्राप्त होवो. **यास्ते**—हे ब्रह्मविद्यायुक्त परमेश्वरा, तुझ्या ज्या देवमनुष्यादिक प्रजा आहेत त्यांजकडे पाहिलें असतां त्यांमध्यें तुझा भक्त मी बालकासारखा करुणायोग्य आहे, म्हणूनच हे संसाररूप दुःस्वप्नाचा नाश करणाऱ्या परमेश्वरा, तूं माझ्या दुःखाचा नाश कर. **यास्ते सोम प्राणान्**—हे सोम परमात्म्या, जे माझें अंतःकरण, वाणी, चक्षु इत्यादि प्राण ( प्राणेंद्रियें, ज्ञानेंद्रियें ) आहेत ते तूं उत्पन्न केलेस म्हणून तुझेच आहेत. मी त्या प्राणांची सर्व विषयांपासून निवृत्ति करून ते तुला तुझें ध्यान, स्तवन, दर्शन इत्यादि कर्मकर्तृत्वरूपानें समर्पण करतों. **त्रिसुपर्ण**—अन्य विद्यांचा सच्छिष्यानें याचना केल्यावाचून उपदेश करूं नये असा शास्त्रनियम आहे. परंतु, त्रिसुपर्णमंत्रांचा याचनेशिवायहि ब्राम्हणास उपदेश करावा, असा उपदेश घेऊन जे ब्राह्मण त्रिसुपर्णाचा निरंतर जप करतात, ते ब्रह्महत्येचा ( तज्जन्य पापाचा ) नाश करतात; त्यानंतर निष्पाप होऊन सोमयज्ञास प्राप्त होतात, आणि ते ज्या ब्राह्मणपंक्तींत भोजनास बसतात त्या पंक्तीस हजार ब्राह्मणापर्यंत शुद्ध करतात. **ओं**—ज्या अर्थी त्रिसुपर्णमंत्रांचा एवढा महिमा आहे त्या अर्थी प्रणवप्रतिपाद्य परमात्माच त्रिसुपर्णमंत्रांची देवता होय. " दुसरा सुपर्णमंत्र सांगतो. " **ब्रह्ममेधया**—जें सर्व वेदांतविद्येनें जाणावयास योग्य व जगताचें उपादानकारण ब्रह्म आहे तें गुरूनें उपदेश केलेल्या शब्दार्थोभयात्मक महावाक्याच्या धारणाशक्तीनें मला प्राप्त असो, अशाच धारणाशक्तीनें आनंदरस मला प्राप्त होवो, आणि धारणाशक्तीनें अखंडैकरसरूप वस्तु ( आनंदब्रह्म ) मला प्राप्त होवो. **अद्य**—हे सर्वांतर्यामी परमेश्वरा, तूं आज आम्हां विद्यार्थ्यांत शिष्यादि प्रजांनीं युक्त असें आचार्यरूप भाग्य दे, (तूं आमचा गुरु हो), आणि आमच्या दुष्ट स्वप्नासारख्या द्वैतभासास घालीव. **विश्वानि**-

आप्नुंव ॥ मधुवाताऽऋतायते मधुंक्षरंति सिंधंवः ॥ माध्वीर्नः संत्वोषधीः ॥ मधुनक्तमुतोषसि मधुंमत्पार्थिवरजः ॥ मधुद्यौरस्तुनः पिता ॥ मधुंमान्नो वनस्पतिर्मधुंमाऽअस्तु सूर्यः ॥ माध्वीर्गावों भवंतु नः ॥ य इमं त्रिसुंपर्ण मयाचितं ब्राम्हणाय दद्यात् ॥ भ्रूणहत्यां वा एते घ्नंति ॥ ये ब्राम्हणास्त्रिसुंपर्ण पठंति ॥ ते सोमं प्राप्नुवंति ॥ आसहस्रात्पंक्तिं पुनंति ॥ ओं ब्रह्ममेधवा ॥ मधुमेधवा ॥ ब्रह्ममेव मधुमेधवा ॥ ब्रह्माहे-

हे प्राणिमात्रांस प्रेरणाकर्त्या देवा, तूं माझ्या ज्ञानास प्रतिबंध करणाऱ्या सर्व पापांस घालीव, आणि जें ब्रह्मविषयक असंभावनेनें व विपरीत भावनेनें रहित असें कल्याण आहे तें मला दे. **मधुवाताः**—हे परमेश्वरा, तुझ्याविषयीं आम्हांस प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त व्हावयाकरितां वायु मधुर सुखकारक ( मंद मंद ) वाहोत, नद्या आरोग्यकारक उदकानें वाहोत, व्रीहियवादि ओषधी हितकर होवोत. ' वायु, नद्या व औषधि ह्यांचें वैपरीत्य झाल्यानें शरीरास रोगोत्पत्ति होऊन ज्ञानास प्रतिबंध होईल, तो न व्हावा म्हणून ही प्रार्थना आहे. **मधुनक्तं**--हे परमेश्वरा, तुझ्या प्रसादानें आम्हां विद्यार्थ्यांस रात्रींत व दिवसांत रात्रिदिवसांनीं अनुकूल असें सुख प्राप्त होवो. आसनशयनादिगत पृथिवीसंबंधी धूळ कंटकादिरूपानें पीडा न करील अशी अनुकूल होवो, आणि आकाशहि पित्यासारखें सुख देणारें होवो. ' कालादिकांनींहि ज्ञानास प्रतिबंध न व्हावा ह्यासाठीं ही प्रार्थना आहे ' **मधुमान्**--आम्हांकरितां आंबे फणस इत्यादि वनस्पति मधुर फळयुक्त होवो, सूर्य अतिशयित ताप न करतां, सुंदर प्रकाश करो, आणि गायी मधुर दुग्धयुक्त होवोत. **यइमं**--जो ब्राह्मण त्या त्रिसुपर्णमंत्राचा ब्राह्मणास त्याच्या याचनेवाचूनहि उपदेश करील असा उपदेश घेऊन जे ब्राह्मण त्रिसुपर्णाचें पठण करतात ते ब्राह्मण गर्भहत्येचाहि नाश करतात, व शुद्ध होत्साते सोमास प्राप्त होतात, आणि भोजनपंक्तीमध्यें सहस्र ब्राह्मणांस पवित्र करतात. **ओं**—अशा उपदेशानें शिष्य पवित्र होऊन त्या द्वारानें पंक्तींत असलेले अनेक ब्राह्मण पवित्र होतात, ह्या पुण्यानें तो त्रिसुपर्णाचा उपदेष्टा ब्राह्मण मोक्षास प्राप्त होतो. ' तृतीय सुपर्णमंत्र सांगतो. ' **ब्रह्ममेधवा**—यज्ञजपदानादि नित्यनैमित्तिक कर्मांनीं चित्तशुद्धिद्वारा ज्ञानानें मला ब्रह्म प्राप्तहोवो, अशा यज्ञादिपूर्वक ज्ञानानें मला आनंदरस प्राप्त होवो. अशा यज्ञादिद्वारा ज्ञानानें मला आनंदात्मक ब्रह्म प्राप्त होवो. '' सर्वव्यापक परमात्मा कांहीं व्यक्ती-

वानां पदवीः कवीना मृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम् ॥
श्येनोगृध्राणा ऽऽस्वधितिर्वनाना ऽऽसोमः पवित्रमत्येतिरेभन् ॥
हऽऽसः शुचिषद्वसुरंतरिक्ष सद्धोतावेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥
नृषद्वरसदृत सद्व्योमसदब्जागोजा ऽऋतजा अद्रिजा ऋतं
बृहत् ॥ ऋचेत्वा रुचेत्वासमित्स्रवंति सरितो न धेनाः ॥

मध्यें विभूतीनें (अधिक अंशानें) वास करतो असें सांगतो." **ब्रह्मादेवानां**—परमात्मा इंद्राग्निवरुणादि देवांमध्ये ब्रह्मदेव होऊन श्रेष्ठरूपानें स्थित होतो, काव्य नाटकादि कर्त्या पुरुषांमध्यें व्याकरणरीतीनें शब्दसामर्थ्याभिज्ञ व्यासादिरूप, वैदिकमार्गवर्ती ब्राह्मणां-मध्ये अत्रिकश्यपादि गोत्ररूप, चतुष्पाद पशूंमध्ये महिष ( हेला ), गृध्रादि पक्ष्यांमध्यें श्येन, व अरण्यांमध्यें कुठाररूप होऊन श्रेष्ठत्वानें रहातो, आणि यज्ञसाधनभूत सोमरूप होऊन मंत्रात्मक शब्दयुक्त होत्साता गंगाजल दर्भादि शुद्धि करणाऱ्या सर्व पदार्थांपेक्षां अतिशय पवित्ररूपानें वर्ततो. " जो पुरुष विवेकानें मायेचा त्याग करतो त्यास सर्वहि जगत ब्रह्मस्वरूपानें भासमान होतें असें सांगतो. " **हंसःशुचि**—सर्वदा गमनशील, व स्वकीय शुद्ध मंडलांत राहणारा सूर्य, जीवमात्रांच्या शरीरांत प्राण-रूपानें रहात असतांहि आकाशांत केवळ वायुरूपानें संचार करणारा, होमनिष्पादक आहवनीयादि अग्निरूपानें सोमयागसंबंधी वेदीमध्यें राहणारा, अतिथिरूपानें अन्य गृहस्थाच्या घरांत भोजनाकरितां बसणारा, मनुष्यांमध्यें कर्मफलाधिकारी आत्मरूपानें राहणारा, आकाशांत नक्षत्रादिरूपानें राहणारा, नदीसमुद्रादि उदकांपासून मत्स्य-शंखमकरादिरूपानें उत्पन्न होणारा, गायींपासून दुग्धादिरूपानें उत्पन्न होणारा, भाषणादिगत सत्यापासून कीर्तिरूपानें उत्पन्न होणारा, पर्वतांपासून वृक्षादिरूपानें उत्पन्न होणारा इत्यादि रूपानें भासमान होणारा, जगदंतर्गत जो जो पदार्थ आहे तें सत्य ब्रह्मच होय. **ऋचेत्वा**--अशा नानाविधरूपांनीं भासमान होणाऱ्या हे परमेश्वरा, मी तुला तुझ्या स्तुतीकरितां हें त्रिसु-पर्णच म्हणतों ( पठन करतों ), आणि ज्याअर्थी त्रिसुपर्णाचें असें महात्म्य आहे त्याअर्थी तुला ( तुझ्यापाशीं ) तुझ्या कर्माच्या साक्षात्कारासाठीं हें त्रिसुपर्णच मागतों. " जसें, पिण्यास योग्य उदकाच्या नद्या गमनास योग्य अशा मार्गानें वाह-तात, व ज्या पदार्थांशीं संयुक्त होतात त्या पदार्थांस आपल्या पवित्र प्रवाहरूपधारांनीं शुद्ध करतात, त्या नदींत एखादा वेतसरूप ( वेताचा वृक्ष ) असतो, व त्या वेतस

अंतर्हृदा मनसा पूयमानाः ॥ घृतस्य धारा अभिचाकशीमि ॥ हिरण्ययोवेतसोमध्यं आसाम् ॥ तस्मिन्त्सुपर्णो मधुकृत्कुलायी भजन्नास्ते मधुदेवताभ्यः ॥ तस्यां सतेहरयः सप्ततीरे स्वधां दुहाना अमृतस्य धाराम् ॥ य इदं त्रिसुपर्णमयाचितं ब्राम्ह-

वृक्षावर खोपाकरून मधुररस संचय करणारा आपल्या अपत्यांसहवर्तमान एखादा पक्षी रहातो व तो स्वकीय इष्टमित्रांस मधुरस वाटणी करून देतो. अशा उत्प्रेक्षेनें त्रिसुप-र्णाचें महत्व करतो. " समित्स्रवंति—उपदेशरूपानें ग्रहण करावयास योग्य अशा, अनेकब्राह्मणकर्तृक त्रिसुपर्णोपदेशसंस्कारपरंपरात्मक नद्या उपदेशग्राहक ब्राह्मण रूप गमनार्ह मार्गानें वाहतात; त्या नद्या ब्राह्मणांनीं उपदेशश्रवणकर्तृत्वरूपानें ग्रहण केल्या असतां त्यांच्या शरीराच्या आभ्यंतरभागीं हृदयकमलांतर्गत अंतःकरणाशीं संयुक्त होऊन, त्या अंतःकरणास विषयमलापासून आपल्या तेजाच्या किरणांनीं शुद्ध करितात. अशा नद्यांचा मी ( त्रिसुपर्णाचा जप करणारा ) शद्बार्थोभयरूपानें अनुभव घेतों. ह्या उपदेशपरंपरारूपानें अनुभूत केलेल्या नद्यांच्या मध्यें उपदेशग्रहीत्याचा सुवर्णगोलकासारखा देदीप्यमान वेतसवृक्षस्थानापन्न जीवात्मा रहातो. त्या जीवात्म्या-वर त्याच जीवात्मरूपगृहानें गृहवान होणारा, जीवात्मनिष्ठ मायाजालाच्या परावर्त-नानें स्वयंप्रकाश आनंदात्मक मधुसंचयकरणारा पक्षिस्थानापन्न उपदेश संस्कारमूलक स्मरणरूपानें सुपर्णमंत्र इंद्रादि देवतांस भागशः मधु ( ब्राह्मण कर्तृक ब्रह्मयज्ञादिरूपानें देवादिकांस त्यांच्या ऋणमोचनार्थ जें दुग्धादि द्यावयाचें तें ) देत असतां रहातो, त्या ब्रह्मप्रकाशक सुपर्णमंत्राच्या समीप भागीं त्याचेच शुक्लपीतादि वर्णात्मक सात किरण स्वधाकारोपलक्षित पितरांस अमृताच्या धारेचें अभिस्रवण ( वर्षण ) करीत असतां राहतात. भावार्थ—त्रिसुपर्णमंत्रांचा ब्राह्मणापासून उपदेश घेऊन निरंतर तदर्थचिंतन-पुरःस्पर जप करणारा ब्राह्मण मंत्रसामर्थ्यानें परमानंदात्मक ब्रह्मसाक्षात्कारवान होऊन मंत्रजपरूपानें देवांस पितरांसहि त्यांच्या ऋणमोचनाकरितां दुग्धसोमामृतादि मधु प्राप्त करतो. य इदं—जो ब्राह्मण या त्रिसुपर्णाचा ब्राह्मणानें याचना केल्याशिवायहि त्यास उपदेश करील, असा उपदेश घेऊन जे ब्राह्मण त्रिसुपर्णाचा पाठ करतात, ते वेदशास्त्रांविषयीं पारंगत व वेदशास्त्रवेदित कर्माचें अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणाच्या हत्त्येचाहि विनाश करतात, व शुद्ध होत्साते सोमयज्ञकर्तृत्वास प्राप्त होतात, आणि भोजनपंक्तींत सहस्र ब्राह्मणांस शुद्ध करतात. ओं—अशा परंपरागत ब्राह्मणांच्या

**णार्य दद्यात् ॥ वीरहत्यां वा एतेघ्नन्ति ॥ ये ब्राम्हणास्त्रिसुपर्णं पठंति ॥ ते सोमं प्राप्नुवंति ॥ आसहस्रात्पंक्तिं पुनंति । ओम् ॥ तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानःश्रद्धापत्नी शरीरमिध्म**

शुद्धीविषयीं कारणभूत उपदेशकर्तृत्वानें उपदेष्टा ब्राह्मणहि चित्तशुद्धिद्वारा ज्ञानवान होऊन संसारापासून मुक्त होतो. ब्राह्मण त्रिसुपर्णमंत्रपठनानें ब्रह्महत्त्या, भ्रूणहत्त्या व वीरहत्या एतज्जन्य पापापासून मुक्त होऊन सोमादिकांस प्राप्त होतो असें म्हटल्यानेंहि ह्या सर्व अर्थांची उपलब्धि होत असतां असें पुनः पुनः त्रिवार कथन केल्यावरून ब्रह्महत्यादिकांपासून मुक्त होणाऱ्या विप्रानें त्रिसुपर्णमंत्रांचा अर्थचिंतनपूर्वक तदैक-चित्त होऊन यावज्जीवपर्यंत निरंतर जप केला पाहिजे असा विधि सिद्ध होतो. ब्रह्महत्या हें पंचमहापातकांमध्यें प्रबल पातक आहे, त्यापेक्षां अधिक भ्रूणहत्यापातक व त्यापेक्षां अधिक वीरहत्यापातक आहे, अशा घोर पातकांपासूनहि त्रिसुपर्णाचा जप करणारा ब्राह्मण मुक्त होऊन सोमयागादिकांस अधिकारी होतो. मग साधारण पापा-पासून तर सहज मुक्त होईल ह्यांत काय आश्चर्य ? म्हणूनच सर्व पापाविषयीं मुमुक्षु ब्राह्मणांनीं त्रिसुपर्णमंत्रांचा अवश्य जप करावा हें अर्थातच सिद्ध आहे. ' त्रिसुपर्णादि वेदांतार्थांच्या अत्यंत निदिध्यासानें ब्रह्मानंदामध्यें लीन होऊन जागृतीमध्येंहि सुषुप्ती-सारखा, पुत्रशत्रुदारधनादिक पदार्थ पाहत असतांहि तज्जन्य ममताक्रोधसुरत-लोभादिक विकारांनीं विकृत न होणारा व प्राशनभोजनादिकर्में करीत असतांहि त्यांविषयीं मानसिक प्रवृत्ति नसल्यानें केवळ निष्क्रियच अशा जीवन्मुक्त ब्राह्मणाच्या सोमयागादि क्रिया अर्थातच गलित झाल्या असतां, अवस्थानभोजनपानादि ज्या ज्या शरीर नैसर्गिक क्रिया तो करील त्या त्या क्रिया दीक्षाहविर्दानसोमपानादि-स्थानापन्न होऊन तद्द्वारा त्याचा यज्ञच सिद्ध होतो, असें सांगतो. " **तस्यैवं विदुषो यज्ञस्य**—त्या अंतःकरणपुरस्सर संसारिक विषयांचा त्याग करणाऱ्या व पूर्वोक्त प्रकारानें ब्रह्मज्ञानी होऊन जीवन्मुक्त झालेल्या ब्राह्मणाचा जो यज्ञ आहे त्या यज्ञाचा ( यज्ञामध्यें ) ब्राह्मणाचा जो देहेंद्रिय साक्षी आत्मा आहे हाच यजमान ( यजमाना-सारखा ) होय, जी अंतःकरणामध्यें आस्तिक्य बुद्धिरूप चित्तवृत्ति आहे हीच पत्नी होय; शरीर हेंच इंधन, उरःस्थल हीच यज्ञसंबंधी संस्कृतभूमि; शरीरगतलोमें हाच दर्भमुष्टि. आत्मज्ञान हीच अग्निज्वाळा, हृदय हाच यज्ञपशूंचें बंधन करण्याचा स्तंभ, कामना हेंच आज्य, क्रोध हाच पशु, आत्मचिन्तनरूप तप हाच अग्नि; जो सर्व

उरोवेदि र्लोमानि बर्हिर्वेदः शिखाहृदयं यूपः कामऽआज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निर्दमः शमयिता दक्षिणा वाग्घोता प्राणउद्‍गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रम्हा श्रोत्रमग्नीध्रावध्द्रियते सा दीक्षायदश्नाति तद्धविर्यत्पिबति तदस्य सोमपानं यद्रमते तदुपसदो यत्संचरत्युपविशत्युत्तिष्ठते च सप्रवर्ग्योयन्मुखं तदाहवनीयो या व्याहृति राहुतिर्यदस्य विज्ञानं तज्जुहोति यत्सायं प्रातरत्ति तत्समिधं यप्रातर्मध्यं दिनꣳसायं च तानि सवनानि ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ येर्धमासाश्च मासाश्चते चातुर्मा-

इंद्रियांचें शमन करणारा दमसंज्ञक चित्तवृत्तिविशेष हीच दक्षिणा, वाचा हाच होता ऋत्विज, प्राणवायु हाच उद्गाताऋत्विज, चक्षुरिंद्रिय हाच अध्वर्यु, मन हाच ब्रह्मा, श्रोत्रेंद्रिय हाच अग्नीद्दत्विक, यावत्कालपर्यंत भोजन केल्यावाचून जें राहणें हीच दीक्षाख्यसंस्कारात्मक वृत्ति, जें भोजन हें हविष्य, जें उदकादि प्राशन करणें हेंच जीवन्मुक्ताचें सोमपान करणें, जो हास्यशयनादि व्यापार हीच उपसदसंज्ञक इष्टि; जें चालणें, बसणें, उठणें हेंच यज्ञांतील धर्मसंज्ञककर्म; जें मुख हाच आहवनीयादि अग्नि, जें बोलणें हाच आहुतिप्रक्षेपमंत्र, जें जीवनमुक्ताचें लौकिकज्ञान हेंच हवन करणें; जें सायंप्रातर्भोजन हेंच अग्निहोत्र; जो प्रातःकाळ, मध्यान्हकाळ व सायंकाळ हेंच प्रातःसवन, मध्यंदिन सवन व तृतीय सवन; ज्या दिवसरात्रि हेच दर्शपूर्णमास; जे पक्ष व मास हींच चातुर्मास्यें; जे ऋतु हेच पशुयज्ञ; जो संवत्सर, परिवत्सर, इद्वत्सरादि वर्षात्मक व द्विरात्रत्रिरात्रादि दिवससमुदायात्मक इत्यादि प्रकारक कालोपलक्षित सर्व आयुष्य हेंच सर्वस्वदक्षिणाक सत्र; जें मरण हेंच अवभृथस्नान; इत्यादि प्रकारचें जीवन्मुक्ताचें जरामरणपर्यंत जें आचरण आहे हें सर्व अग्निहोत्रादि सर्वस्व दक्षिणाकसत्रांत कर्मस्वरूपच होय. जो जीवन्मुक्त ब्राह्मण अशा प्रकारची यज्ञात्मक उपासना करीत असतां उत्तरायणांत मरतो तो इंद्रादि देवांच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन नंतर सूर्याच्या सायुज्यमोक्षास प्राप्त होतो; आणि जो दक्षिणायनांत मरतो तो अग्निष्वात्तादि पितरांच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन नंतर भावनातारतम्यानें चंद्राच्या सायुज्यमोक्षास अथवा सालोक्यमोक्षास प्राप्त होतो. जीवन्मुक्त सूर्याच्या किंवा चंद्राच्या ऐश्वर्यांचा उपभोग करीत असतां सूर्यलोकचंद्रलोकवासिजनांच्या उपदेशानें हिरण्यगर्भ ब्रह्म ( ब्रह्मदेव ) विषयक साक्षात्कारि होऊन सूर्यलोकवासि देहाच्या अथवा चंद्रलोकवासि देहाच्या

स्याति यज्ञतवस्तेपशुबंधा ये संवत्सराश्च परिवत्सराश्चतेहर्गणाः सर्ववेद संवाणतत्सत्रं यन्मरणं तदवभृथणतद्वैजरामर्यमग्निहोत्र॰ सत्रं य एवं विद्वानुदगयने प्रमीयते देवानामेवमहिमानं गत्वा दित्यस्य सायुज्यं गच्छत्यथयो दक्षिणे प्रमीयते पितृणामेव महिमानं गत्वा चंद्रमसः सायुज्य॰सलोकतामाप्नोत्येतौवै सूर्या चंद्रमसोर्महिमानौ ब्राम्हणो विद्वानभिजयति तस्माद्ब्रह्मणो महिमानं माप्नोति तस्माद्ब्रह्मणो महिमानम् ॥ ओम् ॥ १ ॥ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गवे ग्रासं दास्ये ॥ २ ॥ सौरभ्येय्यः सर्वहिताः पवित्राः पुण्यराशयः ॥ प्रतिगृण्हंतु मे ग्रासं गावस्त्रै-लोक्य मातरः ॥३॥ ओं भूर्भुवःस्वः तत्सवितु॰ यात् ॥ ४ ॥ स्वादोपितो इत्यस्या अगस्त्यऋषिः ॥ अन्नंदेवता ॥ गायत्री छंदः ॥ अभिमंत्रणे विनियोगः ॥५॥ ओं स्वादो पितो मधो पितो वयंत्वावृमहे ॥ अस्माकमविताभव ॥६॥ सत्यं त्वर्तेन

त्यागानंतर हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाच्या लोकास जाऊन त्याच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो. तेथेंहि त्या लोकांत राहणाऱ्या लोकांच्या उपदेशानें परब्रह्मसाक्षात्कारवान होऊन ब्रह्मलोकवासि देहानंतर सत्य, ज्ञानमय व अनंत अशा परब्रह्माच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो. विद्याद्रव्यादि गुणांच्या न्यूनतेनें अग्निष्टोमादि यज्ञकर्तृत्वाविषयीं असमर्थ ब्राह्मणांनीं मंत्रशक्तीनें ‘ स्वकीय अवस्थानभोजनादिकक्रिया ह्याच दीक्षाहविर्दानादि-क्रियास्थानापन्न होवोत; ’ अशा भावनेनें ह्या अनुवाकाचें भोजनापूर्वी चिंतन करावें अशा शिष्टाचार आहे. १. परमेश्वराच्या प्रीती करितां गायीस अन्नाचा ग्रास देतों. २. दुग्धादिकांनीं सर्वांस हितकारक, आपण पुण्यवती ( शुद्ध ) असतां सेवकांस शुद्ध करणारी, सर्व त्रैलोक्यास मातेसारखी पूज्य आणि कामधेनूच्या वंशांत उत्पन्न झालेली अशी गाय मीं दिलेला अन्नग्रास ग्रहण करो. ३. अर्थ लिहिला. ४ या ऋचेचा अगस्त्य ऋषि, अन्नदेवता, गायत्रीछंद व पात्रांतील अन्नाच्या अभिमंत्रणाकडे उपयोग. ५ हे आस्वादनीया अत्यंतपालका माधुर्ययुक्तअन्ना, आम्ही तुझें सेवन ( भक्षण ) करतों, म्हणून तूं आमची तृप्ति करणारें हो. ६ हे सूर्या, सत्य शब्दानें विवक्षित अशा तुला ऋत शब्दानें विवक्षित अशा अग्नीनें आसमंतभागीं मी सिंचित करतों. हा केवळ मंत्रार्थ होय परंतु, ह्या मंत्रानें पात्राच्या सभोंवतीं उदकानेंच सिंचन करावें. कारण

परिषिञ्चामि ॥७॥ ओं भूपतये नमः ॥ ओं भुवनपतये नमः ॥
ओं भूतानां पतये नमः ॥ ८ ॥ अमृतोपस्तरणमसि ॥ ९ ॥
ओं प्राणाय स्वाहा ॥ ओमपानाय स्वाहा ॥ ओं व्यानाय
स्वाहा ॥ ओमुदानाय स्वाहा ॥ ओं समानाय स्वाहा ॥१०॥
ओं ब्रह्मणे स्वाहा ॥ ११ ॥ अस्मत्कुले मृता ये च पितृलोक
विवर्जिताः ॥ भुंजंतु मम चोच्छिष्टं पात्राच्चैवं भुवि क्षिपेत् ॥ १२॥
अमृतापिधानमसि ॥ १३ ॥ रौरवे पूयनिलये पद्मार्बुदनिवा-
सिनाम् ॥ अर्थिनामुदकं दत्तमक्षय्यमुपतिष्ठताम् ॥ १४ ॥
ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः०
स्वरोम् ॥ १५ ॥ अगस्तिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं
जरयत्वशेषं ॥ सुखं ममैतत्परिणामहेतुं यच्छत्वरोग्यं मम

मंत्राच्या विधिप्रमाणें विनियोगानें अग्निहोत्रादि फलप्राप्त होतें असें पृथक् फल श्रवण आहे, आणि मंत्रार्थाप्रमाणें कर्म होण्याचाही असंभव आहे व मंत्रलिंगापेक्षां विधिबोधक वाक्य बलवत्तर आहे. ७ भूपतीस नमस्कार असो इत्यादि. ८ हे अविनाशी आचमनीय उदका, तूं प्राणरूप अन्नदेवतेचें आस्तरण आहेस. ९ प्राणदेवतेसही आहुति प्राप्त असो इत्यादि. १० अंतर्यामी परमात्म्यास हा घास प्राप्त असो. ११ जे प्राणी माझ्या कुळांत उत्पन्न होऊन उपनयनादि संस्काराशिवाय मृत झाले, ह्मणून श्राद्धादि क्रिया न झाल्यानें पितृलोकांसहि न प्राप्त झालेले ते माझें उच्छिष्ट भक्षण करोत. ह्या मंत्रानें उच्छिष्ट अन्न पात्रांतून घेऊन भूमीवर टाकावें. ह्या श्लोकांतील तीन चरणांच्या शेवटपर्यंत मंत्र आहे, आणि चवथा चरण हें मंत्राच्या विनियोगाचें बोधक वाक्य आहे. १२ हे अविनाशी उदका, तूं अन्नदेवतेचें आच्छादन आहेस. १३ नरकामध्येंहि अत्यंत दुर्गंधयुक्त घरांत आपण केलेल्या दोषानें पद्मार्बुदसंख्या वर्षें निवास करीत असतां उदकाची याचना करणाऱ्या जीवांस मीं दिलेलें उदक सर्वदा प्राप्त असो. १४ १५ अगस्त्य, अग्नि व वडवाग्नि हे मीं भक्षण केलेल्या अन्नाचें निःशेष पाचन करोत, आणि जें माझें उदरगत अन्न आहे हाच अगस्त्यादिकांचा हविर्भाग होय, तो भाग माझी प्रार्थना श्रवण करून ते पाचन कर्तृत्वरूपानें ग्रहण करीत असतां हविर्भाग ग्रहणजन्य संतोषानें प्रसन्न होऊन ह्या अन्नाचा जो पाचनात्मक

चास्तु देहे ॥ १६ ॥ आयं गौरित्यस्य सर्पराज्ञी सूर्यो गायत्री ॥
आचमने विनियोगः ॥ ओमायंगौः पृश्नि० प्रतिवस्तोरह्नद्युभिः
॥१७॥ प्राणानां ग्रंथिरासि रुद्रोमा विशांतकः॥ तेनान्नेनाप्यायस्व
॥ १८ ॥ श्रद्धयाग्निरिति पंचर्चस्य सूक्तस्य ॥ श्रद्धानाम
ब्रह्मवादिनी ऋषिका ॥ श्रद्धादेवता अनुष्टुप् छंदः ॥ हुतानु-
मंत्रणे विनियोगः ॥ १९ ॥ श्रद्धयाग्निः समिध्यते श्रद्धया
हूयते हविः ॥ श्रद्धां भगस्य मूर्धनि वचसा वेदयामसि ॥२०॥
प्रियं श्रध्देददतः प्रियं श्रद्धे दिदासतः ॥ प्रियं भोजेषु यज्व-
स्विदं मऽउदितं कृधि ॥ २१ ॥ यथा देवाऽअसुरेषु श्रद्धामु-

परिणाम हाच ज्यास हेतु आहे असा रसरक्तमांसादि सात प्रकारचा धातु व सुख मला देवोत, आणखी अगस्त्यादिकांच्या प्रसादानें माझ्या देहांत सर्वदा आरोग्य असो १६ हा मंत्र अर्थासहित सौरांत लिहिला आहे. १७ हे हृदयांत राहणाऱ्या अहंकारा, तूं प्राणरूप इंद्रियांचा परस्पर वियोग न होण्याकरितां बंधनाविषयीं हेतु आहेस. असा अहंकाराभिमानि रुद्रदेवतात्मक तूं दुःखाचें निवारणकर्ता होऊन माझ्या शरीरांत प्रवेश कर, आणि मीं भक्षण केलेल्या अन्नानें मला वाढीव. १८ 'श्रद्धया,' इत्यादि पांच ऋचेंच्या सूक्ताची ब्रह्मप्रतिपादनकर्त्री श्रद्धा नावाची ऋषिका, श्रद्धादेवता, अनुष्टुभ-छंद व भक्षणरूपानें हुत केलेल्या अन्नाच्या स्थिरीकरणाकडे उपयोग. १९ यज्ञादि अमुक कर्म केलें असतां स्वर्गादि अमुक फळ प्राप्त होतें अशा निश्चयात्मक आस्तिक्य बुद्धीनें त्या फळाच्या प्राप्ती करितां तें कर्म करण्याविषयीं पुरुषाच्या अंतःकरणांत जो अभिलाषातिशय असतो त्यास श्रद्धा असें म्हणतात. पुरुष श्रद्धेनें गार्हपत्यादि अग्नीस प्रज्वलित करतो. पुरुष श्रद्धेनें पुरोडाशादि हविर्द्रव्याचा अग्नीवर होम करतो. उत्तम धनाच्या मुख्य स्थानांत स्थित असलेल्या ह्या श्रद्धाभिमानि देवतेस आह्मी स्तोत्रानें आसमंतभागीं प्रख्यात करतों. २० हे श्रद्धाभिमानि देवते, तूं हविर्भाग देणाऱ्या यजमानास अभीष्ट फल दे. हे श्रद्धे, तूं हविर्भाग देण्याची इच्छा करणारांचेंहि प्रिय कर आणि उपभोगाच्या इच्छेनें ज्यांनीं यज्ञ केले आहेत अशा माझ्या संबंधी जनांस हें सांगितलेलें अभीष्ट फल अवश्य दे. २१ हे श्रद्धाभिमानि देवते, तूं जसें—इंद्रादिदेवांनीं भयंकर बलवान् अशा असुरांविषयीं 'हे अवश्य मारावे' अशी केलेली श्रद्धा पूर्ण केलीस तसें,—उपभोगाची इच्छा करणारे व कृतयज्ञ असे जे माझे संबंधी

ग्रपुं चक्रिरे ॥ एवं भोजेषु यज्वस्वस्माकं मुदितं कृधि ॥ ॥ २२ ॥ श्रद्धां देवा यजमाना वायुगोपाऽउपासते ॥ श्रद्धां हृदय्यं १ याकूत्या श्रद्धया विंदते वसु ॥ २३ ॥ श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धां मध्यंदिनं परि ॥ श्रद्धां सूर्यस्य निम्नुचि श्रद्धे श्रद्धापयेहनः ॥ २४ ॥ ओं नमो नारायणाय ॥ २५ ॥

॥ इति भोजनम् ॥

---

जन आहेत त्यांविषयीं ' ह्यास उपभोगादि अभीष्ट प्राप्त होवो ' असें जें आमचें श्रद्धात्मक वचन आहे तें सफळ कर. २२ देव व यज्ञ करणारे द्विज हे वायूनें रक्षण केलेले होऊन श्रद्धाभिमानि देवतेची उपासना ( प्रार्थना ) करतात. किंबहुना सर्वच लोक हृदयांतर्गत संकल्पात्मक क्रियेनें श्रद्धादेवीची सेवा करतात. कारण श्रद्धावंत पुरुषास श्रद्धेनें द्रव्य प्राप्त होतें. २३ श्रद्धादेवीचें आह्मी प्रातःकाळीं आव्हान करतों, श्रद्धादेवीचें आह्मी मध्यान्हकाळीं आव्हान करतों आणि श्रद्धादेवीचें आह्मी सूर्याच्या अस्तमयकाळीं आव्हान करतों. अशा प्रकारची हे श्रद्धाभिमानि देवि, तूं आम्हांस ह्या वैदिककर्माविषयीं श्रद्धायुक्त कर. २४ नारायणास नमस्कार असो. २५

याप्रमाणें भोजन ( सांगितलें ).

---

## अथ तांबुलादिविधिः

वसिष्ठः—तांबूलं यश्च वै दद्यात्प्रत्यहं नियमान्वितः। देवेभ्योऽथ द्विजातिभ्यः स महाभाग्यमश्नुत इति॥ १॥मार्कंडेयः—

## तांबूल (विडा) वगैरेंचा विधि.

**वसिष्ठ**—जो मनुष्य दररोज नियमानें देवांस व ब्राह्मणांस तांबूल देईल तो महाभाग्यवान होईल. **मार्कंडेय**—जो मनुष्य तोंडास अलंकारासारखें असें तांबूल

नित्यं खादति तांबूलं वक्त्रभूषाकरं नरः ॥ न मुंचत्यच्युतस्येव तस्य मंदिरमिंदिरेति ॥ २ ॥ भरद्वाजः—चतुर्वारं दिवा भुक्त्वा तांबूलं खादयेत्सुधीः ॥ भुक्त्वा चैव द्विवारं तु रात्रौ षड्वारमुत्तममिति ॥ ३ ॥ संग्रहे--काश्मीरैलालवंगैश्च जातिक्रमुकचूर्णकैः ॥ तांबूलं खादयेन्नित्यं खादिरेण समन्वित मिति ॥ ४ ॥ वसिष्ठः—मूलमग्रं परित्याज्यं शिरां चैव विशेषतः ॥ सचूर्णं खादयेत्पर्णं मायुःश्रीकीर्तिमान्भवेदिति ॥ ५ ॥ वैद्यके—आद्यं विषोपमं पीकं द्वितीयं भेदि दुर्जरम् ॥ पश्चात्सुधोपमं विद्याद्रसं तांबूलचर्वण इति ॥ ६ ॥ दक्षः—इतिहास पुराणाद्यैः षष्ठसप्तमकौ नयेत् ॥ अष्टमे लोकयात्रा तु बहिः संध्या ततः पुनरिति ॥ ७ ॥ अत्रिः—इतिहासपुरा-

नित्य भक्षण करील तर जसें,-विष्णूच्या मंदिरास लक्ष्मी सोडीत नाहीं तसें,-त्याच्या मंदिरास संपत्ति सोडणार नाहीं. २ भरद्वाज—विद्वान मनुष्यानें दिवसां भोजन झाल्यावर चार वेळां आणि रात्रीं भोजन झाल्यावर दोन वेळां तांबूल भक्षण करावा, असा सहा वेळां तांबूल भक्षण करणें हें उत्तम होय. ३ संग्रहांत—केशर, वेलदोडा, लवंग, जायफळ, जायपत्री, सुपारी, चुना, काथ आणि नागवेलीचीं पानें ह्या पदार्थांच्या योग्य प्रमाणानें युक्त केलेला तांबूल भक्षणाविषयीं प्रशस्त आहे. ४ वसिष्ठ—नागवेलीच्या पानाचें मूळ, शेंडा व शिरा काढून त्यास चुना लावून त्यावर अवशिष्ट केशर, वेलदोडा इत्यादि पदार्थ घालून तयार केलेला विडा खावा. त्या योगानें आयुष्य, संपत्ति, व कीर्ति हीं वृद्धिंगत होतात. ५ वैद्यकग्रंथांत—तांबूल चावीत असतां तोंडामध्यें प्रथम उत्पन्न झालेला पीक विषासारखा विकार करणारा आणि दुसऱ्यानें उत्पन्न झालेला शरीरामध्यें अवयवांचा भेद करून दुःसह जरा उत्पन्न करणारा आहे, ह्मणून हे दोनही पीक वर्ज करून ( थुंकून ) त्यानंतर उत्पन्न झालेला तांबूलाचा पीक ( रस ) अमृतासारखा शरीरास हितकारक होय म्हणून तो भक्षण करावा. ६ दक्ष—दिवसाचा सहावा अष्टमांश व सातवा अष्टमांश भारतादि इतिहास, पुराणें इत्यादिकांच्या वाचनपूर्वक अर्थ विचारानें घालवावा आणि दिवसाच्या आठव्या अष्टमांशांत स्वकीय इष्ट, मित्र, आप्त इत्यादिकांस भेटणें, बोलणें इत्यादि सांसारिक कार्य करून योग्यकाळीं गांवाच्या बाहेर नदी तळाव इत्यादिकांवर सायंसंध्या करावयास जावें. ७ अत्रि--या कालांत इतिहास, पुराणें

णानि धर्मशास्त्राणि चाभ्यसेत् ॥ वृथा विवादवाक्यानि परिवादांश्च वर्जयेत् ॥ दिवा स्वापं न कुर्वीत स्त्रियं चैव विवर्जयेत् ॥ आयुःक्षीणं दिवा निद्रा दिवा स्त्री पुण्यनाशिनीति ॥ ८ ॥ धर्मतत्वप्रकाशे—धर्मोत्तराभिरर्थ्याभिः कथाभिस्त्रिगुणात्मभिः ॥ मध्यं दिनस्य गमयेदिष्टशिष्टसहायवान् । सुजनैः संगमं कुर्याद्धर्माय च सुखाय चेति ॥ ९ ॥

॥ इति तांबूलादिविधिः ॥

---

व धर्मशास्त्रें ह्यांचा अभ्यास करावा. निरर्थक विवाद करणें व कोणाची निंदा करणें हीं कर्में सर्वथा वर्ज्य करावीं. दिवसां निद्रा करूं नये व आपल्या स्त्रीशीं देखील दिवसां सुरत करूं नये. कारण दिवसां निद्रा केली असतां आयुष्याचा क्षय होतो आणि दिवसां सुरत केलें असतां पुण्याचा नाश होतो. ८ ‘ योगक्षेमाकरितां गृहस्थानें नित्य कर्मांचा बाकी राहिलेला काळ कोणाच्या सहाय्यानें व कशा गोष्टींनीं घालवावा हें सांगतो. ” धर्मतत्वप्रकाशग्रंथांत—कुटुंबाचें पोषण करणाऱ्या गृहस्थानें नित्य कर्म आटपल्यानंतर दिवसां अवशिष्ट भाग संभावित आपल्यास अनुकूल व कलाकौशल्यांत चतुर अशा पुरुषांच्या सहाय्यानें; ‘धर्मोत्तराभिः’ म्हणजे ज्यांत सत्यता, नीति, व्यवहार इत्यादिरूप धर्म मुख्य आहे अशा; ‘ त्रिगुणात्मभिः ’ म्हणजे सर्प, वाघ, राजादिकृत अतिशयित शुल्क ( कर ), चोर इत्यादिजन्य आधिभौतिक संज्ञक दुःख, धान्यादिकांची उत्पत्ति न होणें, उदकाचें न्यूनाधिकत्व, गृहादिकाचें दहन, वायूचें न्यूनाधिक्य, गृहादि संकोच मूलक अवकाशाभाव, इत्यादि प्रकारजन्य आधिदैविकसंज्ञक दुःख, लोकांचा निरुद्योग, अविद्वत्ता, असद् व्यवहार इत्यादिकांनीं भावीं प्राप्त होणाऱ्या अनर्थाची चिंता व ताप, खोकला, पडसें इत्यादि प्रकारचें मानसिक व शारीर आध्यात्मिकसंज्ञक दुःख, अशा त्रिविध दुःखाच्या परिहाराविषयीं हेतुभूत असे तीन गुण ज्यांमध्यें आहेत अशा आणि ‘अर्थ्याभिः’ म्हणजे शब्द व तदनुरूप प्रत्यक्ष अर्थ ह्या उभयरूपांनीं प्रवृत्त होणाऱ्या अशा गोष्टींनीं घालवावा. सर्वथा सर्वदा सज्जनाशीं समागम करावा तोच परिणामीं पुण्यास व सुखास कारण होतो. ९

**याप्रमाणें तांबूल (विडा) वगैरेंचा विधि ( सांगितला ).**

---

## ॥ अथ सायंसंध्याविधिः ॥

यमः--रवेरस्तमयात्पूर्वं घटिकैका यदा भवेत्॥ सायंसंध्यामुपासीत कुर्याद्धोमं च पूर्ववदिति॥ १॥ शौनकः--अग्निश्चेत्यनुवाकेन सायंसंध्या पिबेदपः ॥ पाणिभ्यां जलमादाय गायत्र्या चाभिमंत्रितम्॥ रवेरभिमुखं तिष्ठं स्त्रिरूर्ध्वं संध्ययोः क्षिपेदिति ॥ २ ॥ गृह्यपरिशिष्टे--जपश्चार्धास्तमिते मंडले आनक्षत्रदर्शनादिति ॥३॥ शौनकः--दिशोष्टधा विभक्तायाः प्रतीच्या भागसप्तकम् ॥ हित्वा दक्षिणतोन्यस्तु योष्टमोभाग उत्तरः॥ अस्याभिमुखतो विप्रोभूत्वा प्रयतमानसः॥ जपन्नासीत सावित्रीं संध्यां कृत्स्नामतंद्रितः ॥ इमं मे वरुणेत्यादि सायंकाले विशेष इति ॥ ४ ॥

### इति सायंसंध्याविधिः

---

## सायंसंध्येचा विधि.

**यम**—सूर्य अस्तास जाण्याच्या पूर्वी एक घटिका दिवस असतां सायंसंध्येस प्रारंभ करावा, आणि ती यथाविधीनें समाप्त झाल्यावर घरीं येऊन प्रातःकाळीं केलेल्या होमाप्रमाणें गृह्याग्नीवर होम करावा. १. **शौनक**—सायंसंध्या कर्तव्य असतां तिच्यांत ‘ अग्निश्च ’ इत्यादि मंत्रानें मंत्राचमन घ्यावें. प्रातसंध्या व सायंसंध्या यांमध्यें ओंजळींत पाणी घेऊन तें प्रणवव्याहृतिगायत्र्यादिमंत्रसमुदायानें सूर्याच्या समोर वर टाकावें. याप्रमाणें तीनदां करावें. २. **गृह्यपरिशिष्टांत**—सूर्यमंडळ अर्धें अस्तास गेल्यापासून नक्षत्रें दिसण्याचा काळ होईपर्यंत गायत्रीजप करावा. ३. **शौनक**—आठ ठिकाणीं विभागलेल्या दिशेच्या पश्चिम भागापासून पश्चिमभाग, नैर्ऋतभाग, अशा वामक्रमानें सात भाग सोडून बाकी राहिलेला जो आठवा भाग ( वायवीदिशी ) आहे त्या भागाच्या समोर ब्राह्मणानें बसून शुद्ध अंतःकरणानें सायंसंध्ये संबंधी गायत्रीजप करावा. सायंसंध्येंत मुख्यत्वेंकरून ‘ इमं मे वरुण ’ इत्यादि मंत्रांनीं उपस्थान करावें. आळस न करितां प्रातःसंध्येप्रमाणें अवशिष्ट अनुष्ठानानें सर्व संध्या करावी. ४.

**याप्रमाणें सायंसंध्येचा विधि ( सांगितला ).**

---

## अथ सायंसंध्या.

॥ ओं श्रीकेशवाय नमः ओं श्रीकृष्णाय नमः ॥ इतिद्विः ॥ प्रणवस्य० प्राणायामे विनियोगः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ इतित्रिः ॥ ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायंसंध्यामुपासिष्ये ॥ २ ॥ आपोहिष्ठेति० मार्जने विनियोगः ॥ ओमापोहिष्ठा० जनयथाचनः ॥ ३ ॥ अग्निश्चेति मंत्रस्य याज्ञवल्क्युपनिषद ऋषिः ॥ अग्निमन्युमन्युपत्यहानि देवताः ॥ गायत्रीपंक्तिविराट्छंदांसि ॥ आचमने विनियोगः ॥ ४ ॥ ओमग्निश्च मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युंकृतेभ्यः । पापेभ्यो रक्षंताम् ॥ यदन्हापापमकार्षम् ॥ मनसावाचा हस्ताभ्याम् ॥ पभ्द्यामुदरेण शिस्ना ॥ अहस्तदवलुंपतु ॥ यत्किंच दुरितं मयि ॥ इदमहंमाममृतयोनौ ॥ सत्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ ५ ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ ६ ॥ प्रणवस्य ब्रह्माग्निर्दैवी गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती ॥ मार्जने विनियोगः ओं भूर्भुवः स्वः ॥ ७ ॥ गायत्र्या विश्वा-

## सायंसंध्या.[1]

अर्थ पूर्वीं लिहिला १–२–३ ‘ अग्निश्च ’ इत्यादि मंत्राचा याज्ञवल्क्याचा पुत्र उपनिषद नांवाचा ऋषि, अग्न्यादिदेवता, गायत्र्यादि छंद व मंत्राचमनाकडे उपयोग ४. अग्नि, कोपाभिमानी देव व जितक्रोधदेव हे माझ्या कोपजनित दुःखापासून माझें रक्षण करोत. मनानें, वाचेनें, हातांनीं ( जारणमारणादिक ), चरणांनीं ( गोब्राह्मणस्पर्शादिक ), उदरानें आणि शिस्नानें जें गतदिवसामध्यें मीं पाप केलें असेल त्या पापाचा दिवसाभिमानी देवता नाश करो. अथवा अशी गणना कशा करतां ? जें कांहीं पाप माझ्या शरीरांत उत्पन्न झालें असेल त्या पापाचें व त्या पापकर्त्या मत्स्वरूप लिंगदेहाचें अविनाशी व निर्बाध अशा स्वयंप्रकाशात्मक ब्रह्मवस्तूमध्यें मी हवन करून भस्म करतों. यासाठीं हें मंत्रित केलेलें उदक माझ्या मुखरूप अग्नीमध्यें

१. संध्याकाळची संध्या.

मित्रः सविता गायत्री ॥ मार्जने विनियोगः ॥ ओं तत्सवितु वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि ॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ ८ ॥ आपोहिष्ठेति नवर्चस्य० मार्जने विनियोगः ॥ ओमापोहिष्ठा० स्वंजवर्चसा ॥ ९ ॥ शिरसः प्रजापतिर्ब्रह्माग्निवाय्वादित्या यजुः ॥ आत्मपरिषेचने विनियोगः ॥ आमापोज्योती रसोऽमृतं ब्रम्हभूर्भुवः स्वरोम् ॥ १० ॥ ऋतं चेति त्र्यृचस्य० अघमर्षणे विनियोगः ओं भूः० स्वरोम् ॥ प्रणवस्य० गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां० बृहती ॥ गायत्र्या० गायत्री ॥ अर्घ्यनिवेदने विनियोगः ॥ शिरसः० यजुः ॥ तेजआकर्षणे विनियोगः ॥ १२ ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ तत्सवितुर्वरेण्यं भर्गोदेवस्य धीमहि ॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ ओं श्री सवित्रे इदमर्घ्यं समर्पयामि ॥ ओमापोज्योती रसोमृतं ब्रम्हभूर्भुवः स्वरोम् ॥ ओं तेजोसि तेजोमयिधेहि ॥ एवं त्रिः ॥ ओमसावादित्यो ब्रह्म ॥ १३ ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ समस्तव्याहृतीनां० बृहती ॥ आसन उपवेशने विनियोगः ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ १४ ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ इति त्रिः ॥ १५ ॥ समस्तव्याहृतीनां० बृहती ॥ आत्माभ्युक्षणे विनियोगः ॥ ओं भूर्भुवः स्वः ॥ १६ ॥ प्रणवस्य० गायत्री ॥ समस्तव्याहृतीनां० बृहती ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ जपे विनियोगः ॥ तत्सवितुर्हृदयाय नमः० अस्त्रायफट् ॥ १७ ॥ वृद्धां वृद्धादित्यमंडलमध्यस्थां श्यामवर्णां श्यामांबरानुलेपनस्रगाभरणामेकवक्त्रां द्विनेत्रां. शंखचक्रगदापद्मांकचतुर्भुजां गरुडासनरूढां विष्णुदैवत्यां सामवेदमुदाहरंतीं स्वर्लोकाधि-

उत्तम प्रकारानें हुत केलेलें असो. ५. अर्थ प्रातःसंध्यादि प्रकरणांत लिहिला आहे. ६-७-८-९-१०-११-१२-१३-१४-१५-१६-१७.

वृद्धावस्थेनें युक्त; सायंकाळच्या सूर्यमंडळांत उपलक्षित होणारी; कृष्णवर्णा; कृष्णवस्त्रें, उटी, माळा व अलंकार धारण करणारी; एकमुखी; द्विनयना; जिच्या चार हातांत शंख, चक्र, गदा व कमळ हीं आहेत अशी; गरुडासनावर बसलेली;

ष्ठात्रीं सरस्वतीं नामदेवतां ध्यायामि ॥ १८ ॥ आगच्छ वरदे देवि जपे मे सन्निधौ भव ॥ ब्रह्मणःप्रसवित्री वाग्रूपत्वाच्चं सरस्वती ॥ १९ ॥ ओं भूर्भुवःस्वः ॥ तत्सवितु र्वरेण्यम् ॥ भर्गोदेवस्य धीमहि ॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ २० ॥ तत्सवितुर्हृदयाय नमः० अस्त्रायफट् ॥२१॥ जातवेदस्य इत्यस्य० अग्निस्त्रिष्टुप् ॥ तच्छंयो० शक्करी ॥ नमो ब्रह्मण० जगती ॥ उपस्थाने विनियोगः ॥ ओंजातवेदसे० दुरितात्यग्निः ॥ तच्छंयोश० चतुष्पदे ॥ नमो ब्रम्हणे० करोमि ॥ २२ ॥ इमं मे वरुण तत्वायामीत्यृचोराजीगर्तिःशुनःशेप ऋषिः ॥ वरुणोदेवता ॥ आद्याया गायत्रीछंदः ॥ द्वितीयायास्त्रिष्टुप् छंदः ॥ उपस्थाने विनियोगः ॥ २३ ॥ ओंमिमं मे वरुणश्रुधी हवं मद्याचंमृळय ॥ त्वामंवस्युराचके ॥ २४ ॥ ओंतत्वांयामि ब्रह्मणावंदमानस्तदाशास्ते यजमानो हविर्भिः ॥ अहेळमानो वरुणे हबोध्युरुशं समानऽआयुः प्रमोषीः ॥ २५ ॥ प्राच्यै दिशे चेंद्राय नमः ॥ भो गुरोत्वामभिवादयामि ॥ २६ ॥ ओं श्रीकेशवाय नमः ॥ ओं श्रीकृष्णाय नमः ॥ इतिद्विः ॥ ओं भूःस्वरोम् ॥ अनेन सायंसंध्याख्येन कर्मणा श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ २७ ॥ **इति सायंसंध्या.**

विष्णुरूप दिव्यमूर्ति; सामवेदाचें पारायण करणारी आणि स्वर्गलोकांत रहाणारी अशा सरस्वती नांवाच्या संध्यादेवतेचें मी ध्यान करतों. १८. हे अभीष्ट देणारी देवि, तूं ये आणि मी जप करीत असतां माझ्या संनिध रहा. तूं ब्रह्मज्ञान उत्पन्न करणारी वेदांत वाणीमय आहेस म्हणून तुला सरस्वती असें म्हणतात. म्हणून मी तुझी उपासना करतों ह्यास्तव तूं मला ब्रह्मज्ञानी कर. १९. प्रातःसंध्येंत अर्थ लिहिला. २०-२१-२२. 'इमं मे वरुण' व 'तत्वायामि' या दोन ऋचांचा अजीगर्ताचा पुत्र शुनःशेप नांवाचा ऋषि, वरुणदेवता, पहिलीचा गायत्री व दुसरीचा त्रिष्टुभछंद आणि उपस्थानाकडे उपयोग. २३. हे वरुणा, तूं मीं केलेलें हें आव्हान श्रवण कर, आज मला सुखी कर. रक्षणाची इच्छा करणारा मी तुझ्या समोर स्तुति करतों. २४ स्नानप्रकरणांत अर्थ लिहिला. २५. प्रातःसंध्येंत अर्थ लिहिला. २६-२७.

**याप्रमाणें सायंसंध्या ( सांगितली ).**

## ॥ अथ दीपविधिः ॥

मरीचिः--रवेरस्तं समारभ्य यावत्सूर्योदयो भवेत् ॥ यस्य तिष्ठेद्गृहे दीपस्तस्य नास्ति दरिद्रतेति ॥१॥ स्मृतिरत्नाकरे— पूर्वप्रदीपे पशुवर्धनं स्याद्याम्यप्रदीपे पशुनाशनं च ॥ प्रतीच्य-दीपे बहुधान्यवृद्धि रुदीच्यदीपे बहुराज्यलक्ष्मीरिति ॥२॥ धर्मवृत्तौ—स्थापिता यदि चैतास्तुदिक्षु दीपाश्चतसृषु ॥ शुभदास्ते सदा सर्वे न दोषस्तत्र कश्चनेति ॥ ३ ॥

॥ इति दीपविधिः ॥

## दीपाचा ( दिव्याचा ) विधि.

**मरीचि**—ज्याच्या घरांत सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत दिवा राहील त्याला दरिद्र प्राप्त होणार नाहीं. १. **स्मृतिरत्नाकरांत**—दिव्याचें तोंड ( दिव्याची वात अर्थात् दिव्याची ज्योत ) पूर्वेकडे केलें असतां गोमहिष्यादि पशूंची समृद्धि होते. दक्षिणेकडे केलें तर पशूंचा नाश होतो. पश्चिमेकडे केलें तर धान्याची पुष्कळ समृद्धि होते, आणि उत्तरेकडे केलें तर राजकीय संपत्ति पुष्कळ प्राप्त होते. २. **धर्मवृत्तिग्रंथांत**—जर ह्या पूर्वादि चारही दिशांकडे दिव्यांचें मुख करून ते स्थापन केले तर सर्वही शुभकारक होतात. त्यांमध्यें दक्षिणेकडे तोंड करून ठेवलेल्या दिव्याचा दोष नाहीं. ३. **याप्रमाणें दीपाचा विधि ( सांगितला ).**

## ॥ अथ दीपः ॥

दीपोज्योतिः परंब्रह्म दीपोज्योतिर्जनार्दनः ॥ दीपो हरतु मे पापं संध्यादीप नमोस्तुते ॥ १ ॥

॥ इति दीपः ॥

## दीप ( दिवा ).

दीप ( दिवा ) हा प्रकाशात्मक ज्योतिरूप आहे म्हणून केवळ परब्रह्मच होय. दीप हा अंधकारादि पीडांचें निवारण कर्ता आहे म्हणून केवळ जनार्दन विष्णुच होय. असा दीप माझें कंटककुत्सितमार्गादि प्रदर्शनद्वारा दुःख निवारण करो. अशा कारणानें संध्याकाळीं प्रज्वलित केलेल्या हे दीपा, तुला नमस्कार असो.

**याप्रमाणें दीप ( सांगितला ).**

## ॥ अथ सायमौपासनम् ॥

ओं श्रीकेशवाय नमः ॥ ओं श्रीकृष्णाय नमः ॥ एवं द्विः ॥ ओं भूः० स्वरोम् ॥ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायमौपासनहोमं करिष्ये ॥ १ ॥ चत्वारि शृंगेति० विनियोगः ॥ ओं चत्वारि शृंगा० आविवेश ॥ सप्तहस्त० हुताशनः ॥ परिसमूहनम् (३) परिस्तरणं ॥ पर्युक्षणम् (३) ॥ होमद्रव्यसंस्कारं कृत्वा ॥ विश्वानिन इति० विनियोगः ॥ ओं विश्वानिनो० स्वस्ति ॥ अग्नौतूष्णीं समिधं क्षिप्त्वा हविर्गृहीत्वा ॥ २ ॥ ओं अग्नये स्वाहा ॥ अग्नय इदं न मम ॥ ओं प्रजापतये स्वाहा ॥ प्रजापतय इदं न मम ॥ परिस्तरणं विसृज्य ॥ परिसमूहनम् (३) ॥ पर्युक्षणम् (३) ॥ ३ ॥ अग्न आयूंषीत्यादि मंत्र त्रयस्य शतं वैखानसा ऋषयः ॥ पवमानोऽग्निर्देवता ॥ गायत्री छंदः ॥ अग्न्युपस्थाने विनियोगः ॥ ४ ॥ ओमग्न आयूंषि पवस आसुवोर्जमिषंचनः ॥ आरेबाधस्वदुच्छुनाम् ॥ ५ ॥ अग्निर्ऋषिः पवमानः पांचजन्यः पुरोहितः ॥ तमीमहे महागयम् ॥ ६ ॥ अग्ने पवस्वस्वपाऽअस्मेवर्चः सुवीर्यं ॥ दधद्रयिं

### सायमौपासन[1].

प्रातःकाळच्या गृह्याग्निहोमप्रकरणांत अर्थ लिहिला आहे. १–२–३. 'अग्न आयूंषि' इत्यादि तीन ऋचांचे वैखानस नावाचे शंभर ऋषि, पवमानसंज्ञक अग्नि-देवता, गायत्रीछंद आणि अग्नीच्या प्रार्थनेकडे उपयोग. ४. हे पवमानरूप अग्नी, तूं ज्या अर्थी आमच्या आयुष्याचें रक्षण करतोस त्या अर्थी आम्हांस बळ व अन्न दे; आणि आह्मांपासून दूरच्या प्रदेशांत राक्षसांस पीडा कर, म्हणजे त्यांपासून आह्मांस त्रास होणार नाहीं. ५. जो अग्नि सर्वद्रष्टा; देव, मनुष्य, गंधर्व, अप्सरा व पितर ह्या पंच-जनांमध्यें ( पांचजणांत ) त्यांचें अभीष्ट पूर्ण करीत असतां राहणारा, आणि ऋत्वि-जांनीं सोमयागादि कर्माकरितां अग्रभागीं स्थापन केलेला असा आहे, देवादि श्रेष्ठांनींहि स्तवन केलेला, अशा त्या अग्नीपाशीं आह्मी धनादिकांची याचना करतों. ६. हे अग्नी, तूं

---

१ संध्याकाळचा गृह्याग्निहोम.

मयिपोषम् ॥ ७ ॥ अग्नेत्वं न इत्यादि द्वयोर्ऋचोर्गौपायनौ बंधु-सुबंधू ऋषी ॥ अग्निर्देवता द्विपदाविराट् छंदः ॥ अग्न्युपस्थाने विनियोगः ॥ ८ ॥ ओमग्नेत्वंनोऽअंतमऽउतत्राता शिवोभवा-वरूथ्यः ॥ वसुरग्निर्वसुश्रवाऽअच्छानक्षिद्युमत्तमं रयिंदाः ॥९॥ सनोबोधिश्रुधी हवं मुरुष्याणोऽअघायतः समस्मात् ॥ तंत्वा शोचिष्ठदीदिवः सुम्नायनूनमीमहे सखिभ्यः ॥ १० ॥ प्रजापते० विनियोगः ॥ ओं प्रजापते० रयीणाम् ॥ तंतु० विनियोगः ॥ ओं तंतुं० जनम् ॥ हिरण्यगर्भ० विनियोगः ॥ ओं हिरण्यगर्भः० विधेम ॥ मानस्तोकेति० विनियोगः ॥ ओं मानस्तोके० हवामहे ॥ त्र्यायुषं० शिरसि ॥ ओं चमे० नमः ॥ स्वस्ति० हव्यवाहन ॥ प्रमादात्कुर्वतां० श्रुतिः ॥ ११ ॥ अनेन सायमौपासनहोमाख्येन कर्मणा श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ १२ ॥

॥ इति सायमौपासनम्. ॥

---

उत्तम कर्म करणाऱ्या आमच्या शरीरांमध्यें उत्तम पराक्रमयुक्त तेज प्राप्त कर, आणि आमच्या घरांत धन व पुष्टियुक्त पुत्र भृत्य गाय महिषी इत्यादि प्राणी स्थापन कर ( रहातील असें कर ). ७. 'अग्ने त्वंनो अंतम' इत्यादि दोन ऋचांचे क्रमानें गोपाचे पुत्र बंधुनामक व सुबंधुनामक ऋषि, अग्निदेवता, द्विपदादि विराट् छंद आणि अग्नीच्या उपस्थानाकडे उपयोग. ८. हे अग्नी, अतिशय सेवा करण्यास योग्य असा तूं आमच्या अगदीं जवळ असून आमचें रक्षण करणारा व आह्मांस सुख देणारा हो. हे अग्नी, गार्हपत्यादि अग्निरूपानें सर्वांच्या पुढें रहाणारा तूं अन्नयुक्त होत्साता आमच्या समोर ये, आणि आम्हांस अत्यंत सुशोभित द्रव्य दे. ९. हे अग्नी, असा सेवनीय तूं आम्हांस प्रबोधित कर. ( आह्मांस ज्ञान दे ). आमचें आव्हान श्रवण करून पापाचरण करणाऱ्या सर्व लोकांतून आमचें रक्षण कर. हे अतिशयित उज्वलित असून स्वतेजानें सर्वांस प्रकाश करणाऱ्या अग्नी, त्या तुझी आह्मी द्रव्याच्या प्राप्तीकरितां व मित्रांच्या प्राप्तीकरितां निश्चयानें प्रार्थना करतों. १०. प्रातरौपासनांत व वैश्वदेवांत अर्थ लिहिला आहे. ११-१२.

**याप्रमाणें सायमौपासन ( सांगितलें ).**

---

## ॥ अथ रात्रिभोजनादिविधिः ॥

शौनकः—निशायाः प्रथमे यामे जपयज्ञार्चनादिकं ॥
स्वाध्यायोभोजनं प्रोक्तं वर्जयित्वा महानिशामिति ॥ १ ॥
गौतमसूत्रम्—रात्रौ भोजनं कुर्याद्बलवीर्यवर्धनमिति ॥ २ ॥
शंखः—त्रयाणामपि वर्णानां पूर्वरात्रे प्रजागर इति ॥ ३ ॥

॥ इति रात्रिभोजनादिविधिः ॥

---

## रात्रिभोजनादिकाचा विधि.

**शौनक**—गृहस्थानें रात्रीच्या पहिल्या प्रहरांत संध्यादिगत जप, वैश्वदेव व देवांची पंचोपचारादि पूजा हीं कर्मे करावीं आणि अवकाशानुसार अध्ययन करून भोजन करावें. कदाचित् वेदादिकांच्या अर्थाविषयीं अथवा पाठाविषयीं विशेष आसक्त होऊन भोजनाचा एक प्रहररात्रीपेक्षां अधिक कालातिक्रम झाला तरी बाध नाहीं परंतु, मधरात्रीच्या पुढें मात्र अध्ययन व भोजन करूं नये. १. **गौतमसूत्रांत**—गृहस्थानें, रात्रीं बळ व वीर्य वाढविणाऱ्या स्निग्ध पदार्थांचेंच भोजन करावें. २. भार्यासहत्रैवर्णिक[1] गृहस्थानें दोन प्रहर रात्र होईपर्यंत जागृत असणें आवश्यक आहे. ३.

यांप्रमाणें रात्रिभोजनादिकाचा विधि ( सांगितला ).

---

## ॥ अथ रात्रिभोजनम् ॥

ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ॥ ओं भूः०
स्वरोम् ॥ ओं तत्सवि० यात् ॥ ओं स्वादों० भव ॥ ऋतंत्वा
सत्येन परिषिंचामि॥ ओं भूपतये० नमः॥ अमृतोपस्तरणमसि ॥
ओं प्राणाय स्वाहा० ओं ब्रह्मणे स्वाहा०॥ अमृतापिधानमसि ॥

॥ इति रात्रिभोजनम् ॥

---

## रात्रिभोजन.

**ऋतंत्वा**—हे अग्नी, ऋतशब्दानें विवक्षित अशा तुला सत्यशब्दानें विवक्षित अशा सूर्यानें मी आसमंतभागीं सिंचन करतों. हा केवळ मंत्रार्थ होय. बाकीच्यांचा अर्थ भोजनांत लिहिला आहे. यांप्रमाणें रात्रिभोजन ( सांगितलें ).

---

१ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांतील.

## अथ स्वापादिविधिः

गर्गः—शुचिदेशं विविक्तं तु गोमयेनोपलेपयेत् । मंगल्यं पूर्णकुंभं च शिरःस्थाने निधापयेत् ॥ अभीष्टदेवतां ध्यात्वा संविशेन्मंगलध्वनाविति ॥ १ ॥ स्कांदे—उपानहौ वेणुदंडमंबुपात्रं तथैव च । तांबूलादीनि सर्वाणि समीपे स्थापयेद्गृहीति ॥ २ ॥ सौभाग्यकल्पद्रुमे—संपच्यनागवल्ली विशिरदलकुलं पूगखंडं सुपेषत् सारोऽल्पः खादिरोथाग्निशिखमृगमदः स्वर्णवातामकं च । कंकोलं जातिपत्रं फलमपि च तथैलाफलं सलवंगं तांबूले संप्रयोज्या इति मदनमितास्तत्प्रवृध्यै पदार्था इति ॥ ३ ॥ शिल्पशास्त्रे—चतुरशीति पर्वाणि दैर्घ्येण परिकल्पयेत् ॥ षष्टिपर्वाणि विस्तारं मंचकं हस्तसंमितम् ॥ एवं शय्या विधातव्या सर्वेषां शयनोचितेति ॥ ४ ॥

## स्वापादिकांचा विधि.

**गर्ग**—गृहस्थानें पांढरा पिंवळा इत्यादि रंगांनीं रंगवून स्वच्छ केलेल्या विस्तीर्ण घराची जमीन नोकर वगैरेंकडून शेणानें सारवावी. अशा सिद्ध घरांत शय्येच्या शिरोभागच्या जमिनीवर वीणामृदंगादि मंगळकारक पदार्थ व पिण्यास योग्य अशा पाण्यानें भरलेला कलश ठेववावा, आणि इष्टदेवतेचें स्मरण करून गीतवाद्यांचा मधुर व देवक्रीडादिवर्णनरूपानें श्रवणीय असा ध्वनि होत असतां शयन करावें. १. **स्कंदपुराणांत**—पायांत घालावयाचा जोडा, वेळूची काठी, उदकानें भरलेलें भांडें आणि तांबूल पुष्पमाळा इत्यादि क्रीडोपयुक्त सर्व पदार्थ गृहस्थानें शय्येच्या समीपभागीं ठेवावे. २. **सौभाग्यकल्पद्रुमांत**—नागवेलेचीं पिकवून शिरा काढलेलीं पानें, कातरलेली सुपारी, थोडा चुना, खैराच्या गाभ्यांत निघालेला थोडा काथ, केशर, कस्तूरी, सोन्याचा वर्ख, कंकोळ, जायपत्री, जायफळ, वेलदोडा आणि लवंग हे पदार्थ वीर्यास स्तंभन करणारे व वाढविणारे आहेत म्हणून तांबूलांत घालावे. ३. **शिल्पशास्त्रांत**—चवऱ्यांशी अंगुळें लांब, साठ अंगुळें रुंद व एक हात ऊंच असा पलंग शयनासाठीं करावा हा ब्राह्मणादि ज्ञातीय सर्व गृहस्थांस उपयोगी आहे. ४.

१ निजणें वगैरेंचा विधि.

विष्णुपुराणे—नाविशालां न वा भग्नां नासमां मलिनां न च॥ न च जंतुमयीं शय्यामधितिष्ठेदनास्तृतामिति ॥५॥ ऋग्विधाने—रात्रिसूक्तं जपेद्रात्रौ त्रिवारं तु दिने दिने ॥ भूतप्रेतादिचोराणांव्याघ्रादीनां विनाशनमिति ॥ ६ ॥ गौतमसूत्रम्—अलक्ष्मीपरिहारार्थं यत्किंचित्पुष्पानुलेपने कुर्याच्छुद्धशय्यायां भार्यया सह गृहे प्राक्शिराः सुप्यात् श्वशुरगृहे दक्षिणशिराः प्रवासे प्रत्यक्शिराः कदाचिन्नोदक्शिरा इति ॥ ७ ॥ गर्गः—भर्तुः पादौ नमस्कृत्य पश्चाच्छय्यां समाविशेत् । सा नारी सुखमाप्नोति न भवेद्दुःखभागिनीति ॥८॥ आपस्तंबः—सदा निशायां दारान्प्रत्यलं कुर्वीतेति ॥९॥ आश्वलायनः--पत्नीमृतुमतीं स्निग्धां तृप्तां भोगविवर्जितां ॥ उपेयान्मध्यरात्रांते

" पलंग, गाद्या, उशा इत्यादिकांनीं सिद्ध केलेल्या शय्येमध्यें कोणते कोणते दोष नसावेत हें सांगतो. " विष्णुपुराणांत—योग्य प्रमाणापेक्षां लहान, मोडकी, अंगास रुपेल अशी ऊंच सखल, मळकट, ढेंकूण पिसा इत्यादि किड्यांनीं युक्त अथवा जिच्यावर स्वच्छ धुतलेलें वस्त्र हांतरलेलें नसेल अशा शय्येवर शयन करूं नये. ५. ऋग्विधानांत—भूत, प्रेत, चोर, वाघ इत्यादिकांच्या नाशाकरितां ब्राह्मणानें प्रतिदिवशीं रात्रीं त्रिवार रात्रिसूक्ताचा जप करावा. ६. गौतमसूत्रांत—गृहस्थानें दरिद्राच्या ( विमनस्कतेच्या ) व दुष्कांतीच्या नाशाकरितां सुवासिक चंदनादि पदार्थांची उटी, सुवासिक पुष्पमाळांचें धारण, असें शरीरकांतिकारक आणि अंतःकरणास संतोषकारक कर्म थोडें तरी करून निर्मळ शय्येवर भार्येसह आपल्या घरीं पूर्वेकडे मस्तक करून निजावें; सासऱ्याच्या घरीं दक्षिणेस मस्तक करून, आणि प्रवासांत पश्चिमेकडे मस्तक करून निजावें. स्थलसंकोचादि आपत्तिपक्षांत सर्वत्र पूर्वादि तीनहि दिशांकडे मस्तक करून निजावें, परंतु कधींहि उत्तरेकडे मस्तक करून निजूं नये. ७. गर्ग—भार्येनें पतीच्या चरणांस नमस्कार करून त्यानंतर शय्येवर पतीच्या सेवेस प्रवेश करावा. अशी जी स्त्री पतीची नमस्कारपूर्वक सेवा करणारी आहे ती पतिक्रोधादिजन्य दुःख न भोगतां सुखास प्राप्त होते. ८. आपस्तंब—गृहस्थानें नित्यशः रात्रीं भार्येस पुष्पचंदनसुवर्णादि आभरणांनीं अलंकृत करावी. ९. आश्वलायन --गृहस्थानें रात्रीं भक्षण केलेल्या अन्नाचें पचन झाल्यावर व प्रसन्नांतःकरण होऊन, ऋतुस्नात व जिचें अंग मंगलकारक सुगंधि तैलानें युक्त आहे अशी भार्या आलिंगन चुंबनादि क्रीडेनें

जीर्णेऽन्ने तृप्तमानस इति ॥ १० ॥ याज्ञवल्क्यः—षोडशर्तु-
निशाः स्त्रीणां तस्मिन्युग्मासु संविशेत् । यथाकामी भवेद्वापि
स्त्रीणां वरमनुस्मरन् इति ॥ ११ ॥ मनुः—तासामाद्याश्चतस्र-
स्तु निंदितैकादशी तथा ॥ त्रयोदशी च शेषास्तु प्रशस्तास्त्वत्र
रात्रयः ॥ अमावास्याष्टमी चैव पौर्णमासी चतुर्दशी ॥ ब्रह्म-
चारी भवेन्नित्यमप्यृतौ स्नातको द्विज इति ॥ १२ ॥ पराशरः—
ऋतुस्नातां तु योभार्यां सन्निधौ नोपगच्छति ॥ घोरायां
भ्रूणहत्यायां युज्यते नात्र संशयः ॥ १३ ॥ ऋतुस्नाता तु या
भार्या भर्तारं नानुमन्यते । मृता सा नरकं याति विधवा
भर्तृवर्जितेति ॥ १४ ॥ उज्वलायाम्—कामातुरेण पतिना

संतुष्ट झाली असतां तिच्याशीं एकदां मध्यरात्री नंतर सुरत करावें १०. याज्ञवल्क्य—गर्भ धारण करण्याविषयीं योग्य अवस्थेस ऋतु असें म्हणतात. स्त्रियांच्या आर्तव-दर्शनापासून सोळा रात्रि होईपर्यंत जो काळ तो स्पष्टानुनेय ऋतुकाळ होय. भार्येच्या अशा ऋतुकाळात सहावी, आठवी इत्यादि समरात्रीमध्यें उत्तम पुत्राची इच्छा करणाऱ्या पतीनें एकवार सुरत करावें, आणि ऋतुहून भिन्नकाळीं भार्येची कामना जशी असेल तसें एकवार अथवा अनेकवारहि रात्रीं सुरत करावें; कारण पूर्वी इंद्रानें स्त्रियांस असा वर दिला आहे कीं, तुमच्या इच्छेप्रमाणें तुम्हांस पति उपभोग देतील. हा इंद्राचा वर वारंवार स्मरण करावा. ११. मनु—त्या ऋतुसंबंधी सोळा रात्रींत पहिल्या चार, अकरावी व तेरावी ह्या रात्रि आणि ऋतु नसेल त्याकाळीं व ऋतुकाळींहि अमावास्या, अष्टमी, पूर्णिमा व चतुर्दशी ह्या रात्रि निंदित आहेत म्हणून वर्ज करून बाकीच्या रात्रि सुरत करण्याविषयीं प्रशस्त आहेत; परंतु जो गृहस्थ केवळ ऋतुमध्येंच पूर्वोक्त नियमानें सुरत करील तो ब्रह्मचारिव्रताचरणाच्या फळास प्राप्त होईल. १२. पराशर—समाधानयुक्त असून जो गृहस्थ ऋतुस्नात अशी भार्या जवळ असूनहि तिच्याशीं रति करीत नाहीं तो भयंकर गर्भहत्येच्या पातकास अधिकारी होतो, ह्यांत संशय नाहीं. १३. जी भार्या ऋतुस्नात असून पतीस रती-विषयीं अनुमति ( संमति, प्रोत्साहन ) देत नाहीं ती मेल्यावर विधवा व मातापितरादि आपलें पोषण करणाऱ्या मनुष्यांनीं रहित होत्साती अत्यंत दुःखास प्राप्त होते. १४. सत्याषाढ सूत्राच्या उज्वला नावाच्या व्याख्येंत—मदानें संतप्त झालेल्या

संयोगे यदि याचिता ॥ निवारयति तं नारी बालरंडा भवे-
त्सदेति ॥ १५ ॥ बृहस्पतिः—स्त्रियाः शुक्रेऽधिके स्त्री स्या-
त्पुमान् पुंसोऽधिके भवेत् ॥ समेऽपुमान्पुंस्त्रियौ वा क्षीणेऽल्पे
च विपर्ययः ॥ तस्माच्छुक्रविवृद्ध्यर्थं स्निग्धमिष्टं च भोजयेत् ॥
लघ्वाहारां स्त्रियं कुर्यादेवं संजनयेत्सुतमिति ॥१६॥ विष्णुः—
स्नातः सुगंधधृक् प्रीतोऽनाध्मातोऽक्षुधितोऽथ वै ॥ सकामः

पतीनें सुरताविषयीं प्रार्थना केली असतां जर भार्या त्यास निवारण करील तर ती प्रत्येक जन्मांत बाळविधवा होईल. १५. बृहस्पति—सामान्यतः गर्भसंभवमात्राविषयीं स्त्रीचें व पुरुषाचें जितकें नियमित प्रमाणानें शुक्र ( शरीरस्थ मद्यात्मक सातवा धातु ) स्त्रीच्या गर्भाशयांत प्राप्त असावें यापेक्षां स्त्रीचें शुक्र अधिक झालें तर स्त्रीरूप गर्भ उत्पन्न होतो. पुरुषाचें शुक्र अधिक झालें असतां पुरुषरूप गर्भ उत्पन्न होतो, स्त्रीचें व पुरुषाचें शुक्र सारखें झालें असतां केवळ नपुंसकरूप गर्भ उत्पन्न होतो. परंतु त्यांतहि किंचित् न्यूनाधिक्य तारतम्यानें पुरुषाकार स्त्रीरूप गर्भ उत्पन्न होतो, अथवा स्त्रीचे आकारासारखा पुरुषरूप गर्भ उत्पन्न होतो; आणि रोगादिकानें क्षीण ( अल्पशक्तिक ) झालेलें शुक्र असल्यास किंवा रति करण्याविषयीं अंतःकरणाची सुप्रसन्नता नसल्यानें अल्पस्खलित झालेलें शुक्र असल्यास पूर्वोक्त व्यवस्थेनें स्त्रीरूप पुरुषरूपादि गर्भ उत्पन्न होतो परंतु त्याच्या हस्तपादादि अवयवांत व नेत्रगोलक कर्णरंध्रादिनिष्ठ अवयवशक्तींत, खंजत्व, कुब्जत्व ( लंगडेपणा, कुबडेपणा ) दर्शनश्रवणादिकां विषयीं अल्प सामर्थ्य, बुद्धिमांद्य इत्यादि न्यूनाधिक्य रूपानें; अथवा त्याचाच स्राव, पात, स्तंभन इत्यादि रूपानें विपर्यास होतो. म्हणून शुक्राच्या पूर्वोक्त क्षीणत्वाल्पत्वरूपदोषनिवृत्तिपूर्वक अत्यंत वृद्धीकरितां दोघांनींहि घृतदुग्धादियुक्त व प्रिय अशा अन्नाचें भक्षण करावें; आणि सुगंधि तेल पुष्प चंदन तांबूलादि क्रीडासाधनभूत प्रिय पदार्थांचा उपभोग करावा, परंतु भार्येकडून आहार मात्र अल्प करवावा. असें कृत्य करून उत्तम पुत्र उत्पन्न करावा. ‘ भोजयेत् ’ हें क्रियापद भोजनार्थाचें व उपभोगार्थाचें वाचक आहे. १६. विष्णु—शरीराचें हस्तपादप्रक्षालनादि शुद्धिकर्म केल्यानें अत्यंत स्वच्छ, पुष्प चंदनादि सुगंध पदार्थ धारण केलेला, आलिंगन चुंबनादि क्रीडेनें संतुष्ट झालेला, अतिशयित श्रमानें न दमलेला, क्षुधित नसलेला, मदाच्या अधिकाधिक संचलनानें युक्त आणि भार्येविषयींच अंतःकरणानें परमप्रीतियुक्त

सानुरागश्च व्यवाये पुरुषो व्रजेदिति ॥ १७ ॥ उज्ज्वलायाम्-उपचारक्रियाकेलिः स्पर्शो भूषणवाससाम्॥ एकशय्यासन—क्रीडाश्चुंबनालिंगने तथा ॥ १८ ॥ पादलग्नतनुश्चैव उच्छिष्टं ताडनं तथा ॥ कोपोरोषश्च निर्भर्त्सः संभोगे च न दोषभाक् ॥१९॥ भर्त्रुच्छिष्टं सदा भोज्यमन्नं तांबूलमेव च । उच्छिष्टं तु न भुंजीत गृहस्थो गर्धनं विना ॥ २० ॥ कंचुकेन समं नारी भर्तुः संगं समाचरेत् ॥ त्रिभिर्वर्षैश्च मध्ये वा विधवा भवति ध्रुवमिति ॥ २१ ॥ यमः—धौतवस्त्रं च तांबूलं संयोगे

अशाच पुरुषानें सुरत करण्याकरितां प्रवृत्त व्हावें. १७ "सुरताची अभिलाषसंपत्ति प्राप्त होण्याकरितां पूर्वी करावयाच्या क्रीडांचा क्रम सांगतो." उज्वला नांवाच्या व्याख्येंत--दंपतीमध्यें ( नवरा व बायकोमध्यें ) परस्परांनीं केशर चंदनादि सुगंध व रंगयुक्त वस्तूंनीं पत्रवल्लीरचना ( शरीरावर ) करून पुष्प तांबूलादिक पदार्थ देणें, शृंगाररसाभिव्यंजक काव्यांचें वर्णन, समस्यापूरण, इत्यादि सुंदर वाक्यानीं हास्य-विनोद करणें; वस्त्र भूषणांनीं स्वस्वप्रियरचनेविषयीं कोटिक्रम पुरस्सर अलंकार करणें; एकशय्येवर बसून उत्संगोपवेशन शयनादि ( मांडीवर बसणें, निजणें इत्यादि ) यथा-संभव क्रीडा करणें; चुंबन करणें आणि आलिंगन करणें, हा मदोद्दीपक क्रीडाक्रम होय. १८. शरीरास पाय लागणें, मुखांतील तांबूलादिकांचा शरीरावर तुषार उडणें; नितंब, स्तन, अधर इत्यादिकांवर मुष्टिप्रहार, नखनिक्षेप, दंतनिक्षेप इत्यादिरूपानें ताडन करणें; आपल्यास अप्रिय अशी कृति न करूं देण्याविषयीं रागावणें; इष्ट वस्तूच्या प्राप्तीकरितां रुसणें; मदाच्या-उत्तेजनास्तव निर्भर्त्सना करणें; अशीं ही आणि आणखीहि असत्य भाषण, सामर्थ्यादिकांविषयीं अपह्नव ( पदार्थ असतांहि नाहीं म्हणणें ), कपटानें आक्रोशादिपूर्वक दुःखादिकांचें प्रदर्शन करणें इत्यादि कर्में संभोग काळीं उत्तम सुरताच्या सिद्धीकरितां केलीं असतां त्या कर्मांनीं पति व भार्याहि दोषा-धिकारी होत नाहींत. १९. भार्येनें नेहमीं पतीचेंच अन्न, तांबूल हें उच्छिष्ट प्राप्त झाल्यास भक्षणाविषयीं योग्य आहे, आणि गृहस्थानें कोणाचें कधींहि उष्टें खाऊं नये. परंतु रतिकालीं भार्येचा उष्टा तांबूल भक्षण केला तर दोष नाहीं. २०. जी स्त्री अंगांत चोळी घालून पतीशीं संग करील ती तीन वर्षांनीं अथवा मध्येंहि पतीच्या वियो-गास प्राप्त होईल असा तर्क होतो. २१. यम—संयोगकाळीं नेसण्याकरितां धुतलेलें

च सुखावहं ॥ २२ ॥ संस्मृत्य परमात्मानं पत्न्या जंघे प्रसार-
येत् ॥ योनिं स्पृष्ट्वा जपेत्सूक्तं विष्णुर्योनिं प्रजापतिम् ॥ रेतः
सिंचेत्ततो योन्यां तस्माद्गर्भं बिभर्ति सेति ॥२३॥ शिवार्चन--
चंद्रिकायाम्—पुष्पवतीं स्त्रियं रात्रावेकस्यां च सकृद्व्रजेत् ॥
विशुद्धमृदुशय्याकः शुद्धवस्त्रः सुगंधवान् ॥ चारुस्रग्गंधभूषा-
ढ्यः सुगंधिद्रव्यलेपनः ॥ कुंडलादिविभूषावान् पृष्ठतो यज्ञ-

स्वच्छ वस्त्र व भक्षणास तांबूल असावा, आणि हे पदार्थ सुखकारकहि आहेत. २२. रति-कालीं गृहस्थानें सृष्टीस पालन करणाऱ्या परमात्म्याचें (विष्णूचें) स्मरण करून पत्नीच्या चरणाचें प्रसारण करावें (दोन्ही पाय पसरावे), आणि शिस्नानें योनीस स्पर्श (स्पर्शविशेष) करीत असतां 'विष्णुर्योनिं कल्पयतु' ह्या सूक्ताचा अंतःकरणांत जप करावा; आणि नंतर योनीमध्यें वीर्याचा निषेक करावा. अशा विधियुक्त रतिक्रियेनें पत्नी सुलक्षण अशा गर्भास धारण करते. २३. शिवार्चनचंद्रिकाग्रंथांत—पत्नी ऋतुमती असतां पांचव्या रात्रीपासून सोळाव्या रात्रिपर्यंत तिच्याशीं एका रात्रीमध्यें एकवार पतीनें सुरत करावें तें असें—स्वच्छ व मृदुशय्येनें युक्त, शुद्ध वस्त्र धारण केलेला, शय्यागृहांतील धूपादिकांचा सुगंध घेणारा, सुंदर पुष्पमालांच्या सुगंधांनीं व भूषणांनीं युक्त, केशर चंदन इत्यादि सुगंध पदार्थांची उटी घेतलेला, कुंडलादि आभरणांनीं युक्त, ज्यानें यज्ञोपवीताचें निवीत करून (गळ्यांत लोंबकळतें करून) पाठीवर टाकिलें आहे असा आणि ज्याचा रतिविषयीं साधनभूत अवयव दृढ झाला आहे असा होत्साता आसक्त झालेल्या भार्येच्या गर्भाशयांत वीर्य सिंचन करावें. वीर्य सिंचन झाल्यावर दंपतींनीं आलिंगित असतां तसेंच क्षणभर थांबावें, आणि त्यांतहि विशेषतः पतीनें भार्येस तर ती रतिसमर्थी शरीरानें जशी सुयंत्रित (अवस्थित) असेल तशीच तिला अगदीं हलूं न देतां दाबून धरावी; कारण संभोगकाळीं भार्याहि स्वकीय शुक्राचें अत्यंत स्खलन करते म्हणून ती अशक्त होते. त्यानंतर दोघांनीहि उठून अशुचि अवयवांचें व करचरण मुखांचें प्रक्षालन करून अमंत्रक आचमन करावें. इतकें कृत्य झाल्यावर पतीनें आपल्या अंगाला भार्येकडून सुगंधि तेल लावून उष्णोदकानें स्नान घालून घ्यावें, व पुन्हा यथाविधि आचमन करून, शरीराचा म्लानपणा जाण्याकरितां यथेष्ट दूध पिऊन विडा खावा; आणि भार्येनें प्रकृतीस सोसेल इतका केशरयुक्त हिरडा खावा. ह्या प्रमाणें सोळावी रात्र होईपर्यंत दररोज आचरण करावें. ह्या आच-

मूत्रकः ॥ स्त्रियामासज्यमानायां सिंचे द्रव्ये दृढध्वजः ॥ रेतः सिक्ते तथाश्लिष्टौ तिष्ठेतां दंपती क्षणम् ॥ सुयंत्रिता तथा नारी कर्तव्या यत्नतस्तनोः ॥ संभोगेपि निषीदंती यतः शक्तिमुपैति सा ॥ उत्थायाचामतस्तौ हि शूद्रवच्छौच माश्रितौ ॥ स्नायतां च कृताभ्यंग आचामेत्तर्पणं पृथक् ॥ पयः पीत्वा यथावांछं पुमान्तांबूलमाचरेत् ॥ नारी हरीतकी भक्षेत् प्रायः कुकुमसंयुतां ॥ पूर्ववत्तौ शयीयातां यावत्षोडशवासरान् ॥ देवपुत्रो भवेत्तत्र नात्रकार्या विचारणेति ॥ २४ ॥ सुश्रुतः—श्रमोग्लानिः पिपासा सक्थिसदनं शुक्रशोणितयोरनुबंधः स्फुरणं च योनेरिति ॥ २५ ॥ मनुः—ऋतौ तु मैथुने

रणानें सुंदर कांतिमान व ज्ञानवान पुत्र होईल, ह्याविषयीं मनांत संशय आणूं नये. 'स्नायतां' हें क्रियापद पतिकर्मक भार्याकर्तृक स्नापन क्रियावाचक अंतर्भावितण्यर्थक स्नाधातुहून पतिरूपकर्माचें आशौच निवृत्तीकरितां स्नानाविषयीं विशेषतः प्रवर्तकत्व आहे म्हणून कर्तृत्वविवक्षेनें 'कर्मवत्कर्मणा तुल्यक्रियः' ह्या सूत्रानें यक्-विकरण व आत्मनेपद संज्ञक त-प्रत्यय केल्यानें सिद्ध झालें आहे. ह्याच क्रियेविषयीं प्रथमतः भार्येस कर्तृत्वविवक्षा व पतीस कर्मत्वविवक्षा आणि नंतर पतीसच कर्तृत्वविवक्षा, असें गौरव स्वीकृत केल्यानें जो अर्थ निष्पन्न होतो तो असा—भार्या जेव्हां आपल्या शरीरांत गर्भधारणजन्य तात्कालिकच होणाऱ्या भावनांच्या अनुभवानें गर्भाविषयीं निश्चितबुद्धि होऊन पतीस सूचना करील तेव्हां तो आपलें वीर्य मूत्रासारखें निरर्थक न होतां भार्येच्या गर्भाशयांत गर्भरूपानें राहिलें आहे असें समजून स्वकीय वीर्यात्मक गर्भपाताच्या आशौचाविषयीं संदेहरहित होऊन त्याच्या निवृत्तीकरितां स्नान करावयास प्रवृत्त होईल. अर्थातच ह्या स्नानाविषयीं भार्या प्रयोजककर्त्री व पति मुख्य क्रियाकर्ता होय. ह्या प्रकारानें असें सिद्ध होतें कीं, गर्भसंभव झाला अथवा झाला नाहीं ह्या दोन गोष्टींचा जर भार्येच्या चातुर्यानें तत्काळींच निर्णय होत आहे तर गर्भसंभव झाला नसल्यास ऋतुकालींहि मैथुन केल्यानें स्नान करण्याचें प्रयोजन नाहीं. २४ 'मैथुन केल्यानंतर भार्येनें गर्भ धारण केला असें समजतांच पतीनें आपल्या बीजरूप गर्भाचा पात झाला असें समजून पातजन्य अशौचाच्या निवृत्तीकरितां त्याचवेळीं स्नान करावें, आणि गर्भ धारण केला नसल्यास जें बीज पतित झालें तें निरर्थक म्हणून केवळ मूत्रासारखें होय

**स्नायात् गर्भसंभूतिशंकया ॥ अनृतौ तदभावाच्च शौचं त्रिर्मूत्रवच्चरेदिति ॥ २६ ॥**

**इति स्वापादिविधिः**

---

असें समजून त्याच्या पतनापासून उत्पन्न झालेल्या अशुचित्वाच्या निवृत्तिकरितां मूत्रोत्सर्गाच्या शौचापेक्षां तीनपटच शुचिकर्म करावें, असा शास्त्रनियम आहे. ह्यासाठीं भार्येनें गर्भधारण केला किंवा नाहीं ह्याचा निश्चय करणें आवश्यक आहे. म्हणून गर्भाच्या परीक्षेकरितां ज्यावेळीं गर्भधारण झालें त्यावेळीं स्त्रियेच्या शरीरांत काय काय भावना होतात हें सांगतो कीं, जेणें करून तिच्या ज्ञानानें पुरुष ज्ञानवान होऊन एक प्रकारचेंच शुचिकर्म करण्याविषयीं संशयरहित होईल." सुश्रुत--जेव्हां स्त्री गर्भधारण करते तेव्हां तिच्या शरीरांत नित्यापेक्षां कांहीं विलक्षण भावना होतात त्या अशा,—अंतःकरणास खेद होतो, ग्लानि येते, तहान लागते, मांड्या गळून जातात, योनींत मिश्रित झालेल्या स्त्री पुरुष संबंधी मदात्मक सातव्या धातूचा अवरोध होतो, आणि योनीचें स्फुरण होतें. २५. "प्रथम गर्भधारणाच्या वेळींहि शरीरांत होणाऱ्या पूर्वी सांगितलेल्या भावना समजण्यास स्त्रियेच्या अंगीं कौशल्य पाहिजे, आणि द्वितीयादि गर्भधारणकाळीं होणाऱ्या भावना तर सूक्ष्म असतात त्या समजण्यास अत्यंत कौशल्यच पाहिजे. म्हणून साधारण स्त्रियांनीं त्या भावना समजावयास फार कठीण आहेत, ह्या शंकेनें सामान्य नियम सांगतो." मनु--गृहस्थानें भार्येच्या ऋतुकाळीं मैथुन केलें तर गर्भसंभव झाला असेल ह्या शंकेनें आपल्या वीर्यरूप गर्भाच्या पातापासून उत्पन्न झालेल्या आशौचाच्या परिहाराकरितां लिंगास तीन वेळां माती लावून प्रत्येक वेळीं पाण्यानें प्रक्षालन करून हातपाय यांचें प्रक्षालन करून बारा चूळ टाकावे, आणि नंतर स्नान करावें. ऋतूहून दुसऱ्या काळीं मैथून केलें असतां गर्भसंभव व्हावयाचाच नाहीं म्हणून तीन वेळां माती लावून प्रत्येक वेळीं उदकानें प्रक्षालन करून हातपाय धुवून बारा चूळी मात्र टाकाव्या. २६.

**याप्रमाणें स्वापादिकांचा विधि ( सांगितला ).**

---

## अथ स्वापादि.

अगस्तिर्माधवश्चैव मुचकुंदो महामुनिः ॥ कपिलो मुनिरास्तीकः पंचैते सुखशायिनः ॥ १ ॥ रात्रीव्यख्यदित्यष्टर्चस्य सूक्तस्य ॥ सौभरिः कुशिक ऋषिः ॥ रात्री देवता ॥ भूतप्रेतादि-विनाशने विनियोगः ॥ २ ॥ ओं रात्रीव्यख्यदायती पुरुत्रा-देव्य१क्षभिः ॥ विश्वाअधिश्रियोधित ॥ ३ ॥ ओर्वप्राअमर्त्या निवतो देव्यू१द्वतः ॥ ज्योतिषा बाधते तमः ॥ ४॥ निरुस्वसारमस्कृतोषसंदेव्यायती ॥ अपेदुहासते तमः ॥ ५ ॥ सानोअद्ययस्यावयं निते यामन्नविक्ष्महि ॥ वृक्षे न वसतिंवयः ॥ ६ ॥ निग्रामासोअविक्षत निपद्वंतोनिपक्षिणः ॥ निश्येनासश्चिदर्थिनः ॥ ७ ॥ यावयावृक्यं१वृकंयवयस्तेनमूर्म्ये ॥

## स्वापादि.[1]

अगस्त्य, माधव, मुचकुंद, कपिल आणि आस्तीक हे पांच महामुनि मीं शयन केलें असतां मला सुख देवोत. १. ह्या आठ ऋचांच्या सूक्ताचा सुभराचा पुत्र कुशिक नांवाचा ऋषि, रात्री देवता, गायत्री छंद व भूतप्रेतादिकांच्या नाशाकडे उपयोग. २. सूर्याच्या अंतर्धानरूपानें येणारी व आक्षि (नेत्र) स्थानापन्न नक्षत्रांनीं बहुत प्रदेशीं क्रीडा करणारी रात्रीदेवता अतिशयित प्रसरण करते, आणि दीपचमत्कारादिक सर्व शोभा स्थापन करते. ३. मरणरहित रात्रीदेवी अंधकारानें प्रथमतः आकाशास आणि लतागुल्मादि नीच पदार्थांस व वृक्षपर्वतादि ऊंच पदार्थांस व्याप्त करते. त्यानंतर ग्रहनक्षत्रादिरूप तेजानें त्या अंधकारास क्षीण करते. ४. येणारी रात्रीदेवी जेव्हां आपल्या भगिनीस-उषोवेळेस-प्रकाशानें उत्पन्न करते तेव्हां अंधकार परावर्तनच करतो. ५. हे रात्रि, ज्या तुझा प्रहर प्राप्त झाला असतां जसें, सर्व रात्रभर पक्षी वृक्षावर खोप्यांत निवास करतात तसें—आम्हीं घरांत सुखानें निवास करतों, ती तूं आज आम्हांस प्रसन्न हो. ६. जी रात्री प्राप्त झाली असतां ग्रामवासी लोक निजतात, गाय घोडा इत्यादि चतुष्पाद प्राणी निजतात, पक्षी निजतात, आणि शीघ्र गमन करणारे श्येन पक्षीहि निजतात. अशी ही रात्री आपण येऊन दिवसां थकून

---

१ निजणें वगैरे.

अर्थानः सुतराभव ॥८॥ उपमापेपिशत्तमः कृष्णं व्यक्तमस्थित ॥ उषऽऋणेवयातय ॥९॥ उपंते गाऽइवाकरं वृणीष्वदुहितर्दिवः॥ रात्रिस्तोमं न जिग्युषे ॥ १० ॥ विष्णुर्योनिमिति त्र्यृचस्य- सूक्तस्य ॥ त्वष्टा ऋषिः ॥ विष्णवादयो देवताः ॥ अनुष्टुप् छंदः ॥ गर्भार्थं तद्रक्षणार्थं च प्रार्थने विनियोगः ॥ ११ ॥ ओं विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु ॥ आसिंचतु प्रजा- पतिर्धाता गर्भं दधातु ते ॥ १२ ॥ गर्भं धेहि सिनीवालि गर्भं धेहि सरस्वति ॥ गर्भंतेऽश्विनौ देवा वाधत्तां पुष्कर-

गेलेल्या जीवमात्रांस निद्रारूप सुख देते. ७. हे रात्रि, तूं आम्हांस मारणाऱ्या वृकीस ( लांडगीस ) आम्हांपासून दूर कर, आणि चोरास दूर कर. आणखी आम्ही तुझ्या- मध्यें सुखानें राहूं अशी कल्याण करणारी हो. ८. हे उषोदेवते, तूं जसें—स्तुति करणारांचें ऋण धनादिकानें निवृत्त करतेस ( घालवितेस ), तसें--सर्व वस्तूंस आलिं- गित करणारा, कृष्णवर्ण व आपल्या वर्णानें सर्वांस कृष्णवर्ण करणारा असा अंधकार माझ्याशीं संगत झाला आहे त्यास दूर कर. ९. हे दिवसाची कन्ये रात्रिदेवते, जसें--दूध देणाऱ्या गाईपाशीं जाऊन तिला दूध देण्याविषयीं प्रवृत्त करतात, तसें--मी तुझ्यापाशीं येऊन तुला स्तुतींनीं संबोधित करतों, म्हणून शत्रूंस जिंक- ण्याची इच्छा करणाऱ्या माझें ( म्यां केलेलें ) स्तोत्र स्वीकृत करतेस तसा मीं दिलेला हविर्भागादि ग्रहण कर. १०. 'विष्णुर्योनि' इत्यादि तीन ऋचांच्या सूक्ताचा त्वष्टा ऋषि, विष्णु त्वष्टा इत्यादि देवता, अनुष्टुभछंद आणि गर्भाच्या उत्पत्तीसाठीं व रक्षणाकरितां प्रार्थना करण्याकडे उपयोग. ११. माझ्या प्रार्थनेनें विष्णु गर्भस्थानास गर्भधारण करण्याविषयीं समर्थ असें करो. त्वष्टा देव स्त्रीत्वाच्या व पुरुषत्वाच्या लक्षक चिन्हांस पृथक् पृथक् त्यांच्या त्यांच्या गर्भोत्पादन कर्तृत्वरूप कार्याविषयीं समर्थ अशीं करो. प्रजापतिदेव वीर्याचा धारणयोग्यस्थानीं निषेक करो. हे भार्ये, विष्णु, त्वष्टा व प्रजापति ह्यांच्या अशा शक्तिप्रेरणेनें तुझ्या गर्भस्थानांत उत्पन्न झाले- ल्या गर्भास धाता देव धारण करो कीं, जेणेंकरून स्राव, पात व दुष्प्रसव हे विकार होऊं नयेत. १२. हे सिनीवाली नामक देवि, मीं भार्येच्या गर्भाशयांत निषिक्त केलेल्या गर्भास तूं विकार न होईल असें धारण कर. हे सरस्वति. तूं गर्भास धारण कर. हे

स्रजा ॥ १३ ॥ हिरण्ययीऽअरणीयं निर्मंथतोऽअश्विना ॥ तंते गर्भं हवामहे दशमे मासि सूतवे ॥ १४ ॥

### इति स्वापादि.

---

भार्ये, सुवर्ण कमळांच्या माळा धारण करणारे अश्विनीकुमारदेव तुझ्या गर्भास धारण करोत. १३. हे भार्ये, तुझ्या ज्या गर्भाच्या उद्देशानें अश्विनीकुमारदेव सुवर्णमय वृष्टि आसमंतभागीं करतात, त्या गर्भास दहाव्या महिन्यांत प्रसूत व्हावयाकरितां आम्हीं आव्हान करतों. १४.

### याप्रमाणें स्वापादि ( निजणें वगैरे ) ( सांगितलें ).

---

## अथ सौभाग्यवतीकृत्यविधिः

सौभाग्यकल्पद्रुमे—बुध्वा ब्राह्मे मुहूर्ते निजपतिचरणौ संप्रणम्यास्यमस्य प्रेक्ष्य प्रेम्णाथ नैजं शुभमुकुरतले भूमिमभ्यर्च्य पत्नी ॥ प्रातःस्मृत्यादि कृत्वा पतिपरिचरणं संविधायैव वेणीं संरच्याधाय भाले तिलकमथ गलाधोनिमज्जेत्सभूषा ॥१॥

### सौभाग्यवतीच्या कृत्याचा विधि.

" आतां सौभाग्यवती स्त्रियेनें पहाटेपासून दुसरी पहाट होईपर्यंत कसें वागावें हें सांगतो. " सौभाग्य कल्पद्रुमांत—सौभाग्यवती ( सुवासिनी ) बायकोनें पहाटेस चार घटिका रात्रीं उठून फार नम्रपणानें आपल्या नवऱ्याच्या पायांपडून त्याचें तोंड मोठ्या आवडीनें पहावें, व चांगल्या आरशांत आपलें तोंड पाहून पृथ्वीला नमस्कार करावा, आणि पुराणोक्त श्लोकांनीं प्रातःस्मरण करून परसाकडे जाऊन तोंड धुवावें. नंतर नवऱ्यास हातपाय धुण्यास, अंघोळीस पाणी वगैरे जें जें पाहिजे असेल तें तें देऊन त्यानें सांगितलें असतां त्याचें अंग चोळून द्यावें. मग आपली सघळे केस आवरून घट्टवेणी घालून कपाळाला सुरेख कुंकूं लावावें, आणि नेहमीं असावयाचें डागिणे अंगावर असतांनाच गळ्याखालून अंग धुवावें. १. सौभाग्यवती बायकोनें

तूष्णीं सूर्याय दत्वार्घ्यमथ तदितरं वासरं प्राप्य मथ्यं दध्य-त्रापीष्टमेतत् किल समुदयतः पूर्वमेवेति वृद्धाः ॥ दुग्धं ताम्रान्य-पात्रे सजलमधिश्रित्य तद्भांडशुद्धिः कार्या पूजोपचारोचितर-चनमथो शाकसंशोधनादि ॥ २ ॥ सामग्रीं संनिवेश्यां समु-चितपचनस्योत्तमां संविशोध्य वारां पात्राणि वार्भिः पटशुचि-भिरलं पूरणीयानि नूत्नैः ॥ गंगादेः संगृहीतैः करसहजनितं स्पर्शमद्धा विहाय भर्तुः स्नानादिसामग्र्यपि तदभिमता तत्र तत्रोपनेया ॥ ३ ॥ स्नायात्पाकार्थमग्रे स्वयमतुलशुचिः पावकं संनिवेश्यश्चुल्ल्यां संप्रोक्षितैंधस्तदुपरि सुनिरीक्ष्यैव संस्थापनी-यम् ॥ त्रिज्वालं तं प्रणम्य व्यजनसुषिमरुद्भीमसप्यूर्ध्वमत्र स्थाप्यं चर्वादि पात्रं समुचित जलवत्संपिधानादियुक्तम् ॥ ४ ॥ पाके सिद्धे निवेद्यः स च पतिचरणे वैश्वदेवादिसिध्यै

आपलें अंग धुणें झाल्यावर सूर्याला नुसतेंच ( मंत्रावाचून ) पाण्याचें अर्घ्य देऊन आदितवारा शिवाय वेगळ्या दिवशीं ताक करावें. आदितवारींहि ताक करण्याची गरज असेल तर उजाडण्याच्या पूर्वींच करावें, असें वाडवडील म्हणत आले आहेत. तांब्याच्या भांड्याखेरीज निराळ्या भांड्यांत दूध ठेवून त्यांत थोडें पाणी घालून साय येईल इतकें तापवून विरजावयाचें असेल तितकें मध्यम निवालें म्हणजे विरजावें. नंतर तें दूध तापविलेलें भांडें स्वच्छ घासावें. नवऱ्यास देवपूजेसाठीं गंध, फुलें, उप-करणीं, वगैरे पूजेचें सर्व सामान तऱ्हेवार जेथल्या तेथें नीट मांडून द्यावें. मग भाजी-पाला निवडणें, पानपत्रावळ नीट करून ठेवणें असें जें जें काम करावयाचें असेल तें करावें. २. जसा व जितका स्वयंपाक करावयाचा असेल त्याप्रमाणें डाळ, तांदूळ पीठ वगैरे सगळें साहित्य चाळून पाखडून निवडून ठेवून, पाण्याचीं भांडीं चकचकीत घासून त्यांत नदी विहीर वगैरे जेथून आणावयाचें असेल तेथून आंत हात न बुचकळतां आणलेल्या व फडक्यानें गाळलेल्या नवीन पाण्यानें भरून ठेवावीं. आणखी नवऱ्याला मध्यान्हस्नानाचें वगैरे जें जें सामान पाहिजे असेल तें सघळें नेऊन द्यावें. ३. मग स्वयंपाकाकरितां हातपाय धुऊन चांगलें सोंवळें होऊन स्वयंपाकाच्या चुलींत विस्तव घालावा व त्यास गोंवऱ्या लांकडें वगैरे सर्पणाचा सुतदोरा पाहून त्यावर पाण्याचा शिंतोडा टाकून तें लावावें, आणि विंझण्याच्या व फुंकणीच्या वाऱ्यानें चांगला

तत्तत्पात्रेषु चर्वाद्युपचितमुपवेश्याथभिक्षादि देयम् ॥ पत्या-
ज्ञामाप्य तूर्णं तदभिहितलसत्सर्वपात्रेषु चान्नं युक्त्या भूयो-
विविक्तं सपदि सुपरिवेष्यं यथाशास्त्रमेव ॥ ५ ॥ पत्युस्तृ-
प्तावथै तत्परममृतमिति प्रज्ञयोच्छिष्टमस्य पात्रेऽन्यान्नेन सार्धं
द्रुततरमुपभुज्यास्य तांबूलशेषम् ॥ भुक्त्वा भूम्यादिशुद्धिं
निखिलपचनवत्पात्रशुद्धिश्च कार्या दत्वा चांडालमन्नं समुचि-
तनिलये स्थापनीयं च किंचित् ॥ ६ ॥ धान्यद्रव्यस्वभूषा-
रसविविधलसत् खाद्यदिव्यौषधानां स्थानान्यालोच्य शय्या-
रचनमुखमलं गंधपुष्पादि सर्वम् ॥ सामग्रीजात माराग्निजसु-

पेटून तीनदां जाळ झाला म्हणजे त्यास नमस्कार करून त्या चुलीवर वरणभात वगैरेंच्या भांड्यांत बेताचें पाणी घालून झांकणा सुद्धां आधण ठेवावें. ४. स्वयंपाक झाल्यावर नवऱ्याला वैश्वदेव नैवेद्य करावयाकरितां हळूंच तजविजीनें सुचवून वैश्व-देवाच्या कुंडांत विस्तव, फुंकावयास फुंकणी, पूजेचीं गंध फुलें, भात वगैरे जें जें पाहिजे असेल तें तें देऊन माधुकरी आला असल्यास त्यास आपल्या ऐपती प्रमाणें भिक्षा घालावी; नवऱ्यानें सांगितल्यावर लागलेंच त्याला आवडेल अशा थाटानें सगळ्या पानांवर हरएक पदार्थ लवकर लवकर निरानिराळ्या खेपेनें आणून वाडवडील जसें सांगत आले आहेत तशा चालीनें सगळें अन्न लवून थोडें थोडें, वेगळें वेगळें व गोजिरवाणें वाढावें. ५. नवऱ्याचें जेवण झाल्यावर त्याच्या पानांत जें उष्टें अन्न राहिलें असेल तें फार गोड अमृत आहे असें मानून त्या अन्नाच्या भरतीला दुसरें अन्न घेऊन लवकर जेवावें, आणि नवऱ्यानें खावयास घेतलेल्या विड्यांतून राहिलेला विडा खावा. मग घरांत ठेवण्यासारखें अन्न असेल तें झाकून ठेवून बाकीचें अन्न बाहेरच्या भणंग-भिकारी महार पोर वगैरे गरीबगुरीब माणसांस द्यावें आणि उष्टीं खरकटीं काढून, चूल जमिनी सारवून स्वयंपाकाचीं सगळीं भांडीं घासून ठेवावीं. ६. धान्य, कापडचोपड, आपले डागिणे, तेलें, तूप, नाना प्रकारचे आवडते खाण्याचे पदार्थ, चांगलीं चांगलीं औषधें वगैरे ज्या ज्या वस्तु ठेवल्या असतील त्या त्या वस्तु नीट तपासून पहाव्या. बिछाना, उटीचें गंध, फुलांचे तऱ्हेतऱ्हेचे हार गजरे वगैरे, मसालेदार विडे वगैरे आपल्यास संभोग करण्याचें सर्व सामान रंगमहालांत उत्तम रीतीनें तयार करून

रतविधेः साधनीयं प्रयत्नान्नैजांगे वस्त्रभूषाप्रभृति पतिमनस्तोषकृद्धारणीयम् ॥ ७ ॥ पत्ये पाद्यं निवेद्यं रजनिमुजियुजे वैश्वदेवादिसिध्यै सामग्रीं संनिवेश्याशुपचनगृहे दीपनीयाः प्रदीपाः ॥ नत्वा देवाग्निवृद्धान्पतिमपि सहसा होमपूजादिसिध्यै सामग्रीं संनिवेद्याहरिव भुजिविधौ प्रस्वपेत्तेन साधम् ॥ ८ ॥ इत्थं पत्न्या विभक्तं व्यवहरणमहर्दिग्विभागेषु सर्वं सा मान्या तेन नित्यं स्वपतिपदसरोजैकसक्तांतरंगा ॥ नारी वर्तेत चेत्स्यात्तदनुगमनिशं चारुधर्मार्थकामैःसाकं कैवल्यमत्रेत्युदितमिदमभूदच्युतेनेशतुष्ट्येति ॥ ९ ॥ मनुः—सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ॥ सुसंस्कृतोपस्करया व्यये

ठेवावें. चोळी, लुगडें, बुगडी, बाळी, काजळ, कुंकूं वगैरे जें जें लेणें आपल्या अंगावर घालावयाचें तें तें सगळें नवऱ्याच्या मनास आवडेल तसें घालावें. ७. नवऱ्यास संध्याकाळची संध्या करावयाकरितां पाय धुवावयास पाणी देऊन संध्येचें मांडून द्यावें. स्वयंपाकघरांत वैश्वदेव नेवैद्य वगैरे करण्याकरितां साहित्य आणून ठेवून लागलेच दिवे लावावे. आणि अग्नीस व सासू, सासरा वगैरे वडील माणसांस आणि पतीस नमस्कार करून दिवसा प्रमाणें होम, देवपूजा वगैरेचें मांडून देऊन जेवण्याचें वगैरे सगळें काम करून नवऱ्याजवळ निजावें. ८. ह्या प्रमाणें सौभाग्यवती स्त्रीनें नेहमीं सर्व काम करावें, म्हणजे ती निरंतर नवऱ्याची आवडती होईल. जी सौभाग्यवती बायको आपल्या पतीच्या चरणकमळींच एकनिष्ठेनें मन ठेवून राहील ती ह्या लोकांत आपल्या पतीबरोबर उत्तम प्रकारच्या धर्मानें अर्थानें व कामानें युक्त होऊन मोक्षास जाईल. ही पद्यरचना शास्त्रास अनुसरून परमेश्वराची प्रीति होण्याकरितां अच्युत नावाच्या ब्राह्मणानें केली आहे. ९. मनु—सौभाग्यवती स्त्रीनें नेहमीं आनंदानें (हसत मुखानें) रहावें. जातें, कुंचा, उखळ, मुसळ, पाट, वरंवटा, सूप, चाळणी, धान्याचीं मापें, चूल, पाळें, घागर, दोरी, हंडा, तांब्या, फणी, करंडा वगैरे संसारांतलें सगळें सामान जेथल्या तेथें नीट मांडून ठेवावें व घरांतील सर्व काम साटोपानें करावें; आणि खर्च करण्याकडे ओढता हात धरावा ( बेतानें खर्च करावा ). १०. ज्या

चामुक्तहस्तया ॥ १० ॥ संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च। यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवमिति ॥११॥

इति सौभाग्यवतीकृत्यविधिः

———

कुळात नेहमीं नवरा मनांत कुभाव न धरतां बायकोवर प्रीतिच करतो आणि त्याच प्रमाणें बायकोही निष्कपटपणानें नवऱ्यावर प्रीति करील त्याच कुळांत अखंड कल्याणच होईल असें समजावें. ११.

याप्रमाणें सौभाग्यवतीच्या कृत्याचा विधि ( सांगितला ).

———

## अथ रात्रिस्वप्नफलनिर्णय.

वैद्यः--सर्वेंद्रियव्युपरतौ मनोनुपरतं यदा ॥ विषयेभ्यस्तदा स्वप्नं नानारूपं प्रपश्यति ॥ १ ॥ नदीसमुद्रतरणमाकाशगमनं तथा ॥ भास्करोदयनं चैव प्रज्वलंतं हुताशनम् ॥ ग्रहनक्षत्रताराणां चंद्रमंडलदर्शनम् ॥ हर्म्यस्यारोहणं चैव प्रासादशिरसोऽपि वा ॥ एवमादीनि संदृष्ट्वा नरःसिद्धिमवाप्नुयात् ॥ २ ॥

## रात्रीं स्वप्नाच्या फळाचा निर्णय.

वैद्य—ज्या प्राण्याची जेव्हां रूपशद्बादि सर्व विषयांपासून नेत्रकर्णादि सर्व इंद्रियें अत्यंत विराम पावतात, आणि अंतःकरण मात्र त्याच विषयांच्या ठायीं आसक्त असतां तदाकार होतें, तीच स्वप्नावस्था होय. तेव्हां तो मनोवृत्तीनेंच अनेक प्रकारचे पदार्थ पहातो. १. जो मनुष्य आपणास स्वप्नामध्यें मी नदींत अथवा समुद्रांत तरतों; आकाशांत उडतों; उदय पावणारा सूर्य, प्रज्वलित अग्नि, मंगळादि ग्रह, अश्विन्यादि नक्षत्रें, इतर तारा किंवा चंद्रमंडळ ह्यांस पहातों; हवेलीवर अथवा देवळांच्या कळसांवर चढतों; इत्यादि प्रकारचें पहातो त्या मनुष्यास स्वप्नाच्या पूर्वी जो पदार्थ साधन करावयाचा असेल तो सिद्ध होईल असें समजावें. २. जो मनुष्य स्वप्नांत

स्वप्नेतु मदिरापानं वसामांसस्य भक्षणं ॥ कृमिविष्ठानुलेपं च रुधिरेणाभिषेचनम् ॥ भोजनं दधिभक्तस्य श्वेतवस्त्रानुलेपनम् ॥ रत्नान्याभरणादिनि स्वप्ने दृष्ट्वा प्रसिध्यति ॥ ३ ॥ देवविप्र-द्विजच्छत्रतुषपंकजपार्थिवान् ॥ शुक्लपुष्पांबरधरान् प्रशस्ता-भरणांगनाः ॥ वृषेभपर्वतक्षीरिफालिवृक्षाधिरोहणम् ॥ दर्पणा-मिषमाल्याप्तिस्तरणं च महांभसाम् ॥ दृष्ट्वा स्वप्नेऽर्थलाभः स्यात् व्याधिमुक्तश्च जायते ॥ ४ ॥ पूयकिंशूकवल्मीकपारि-भद्राधिरोहणम् ॥ तैलकार्पासपिण्याकलोहावाप्ति विंपत्तये ॥ ५ ॥ विवाहकरणं स्वप्ने रक्तस्रग्वस्त्रधारणम् ॥ स्रोतसा हरणं नेष्टं पक्कमांसस्य भोजनमिति ॥ ६ ॥ स्वप्नाध्याये— स्वप्नास्तु प्रथमे यामे संवत्सरविपाकिनः ॥ द्वितीये चाष्टभि-र्मासै स्त्रिभिर्मासैस्त्रियामिके ॥ चतुर्थयामे यः स्वप्नोमासेन

मद्य पिणें, वसेचें ( मांसांतील तुपासारख्य[1] स्निग्ध पदार्थाचें=चरबीचें ) अथवा मांसाचें भक्षण, कृमियुक्त विष्ठेनें अंग भरणें, अंगावर रक्त पडणें, दहिभाताचें भोजन, अंगावर शुक्ल वस्त्राचें अथवा शुभ्र चंदनाचें धारण, किंवा हिरे मोतीं इत्यादि रत्नें अथवा सोनें वगैरेंचे डागिणे पहातो तो विख्यात होतो. ३. देव; ब्राह्मण; पांढरीं फुलें व वस्त्रें धारण केलेले क्षत्रिय किंवा वैश्य; छत्र; कोंडा ( भूस ); कमळ; राजा व उत्तम डागिणे धारण केलेल्या स्त्रिया ह्यांचें दर्शन; बैल, हत्ती, पर्वत, ज्यास चिक येतो असा वृक्ष व फळें आलेला असा वृक्ष ह्यांवर चढणें; आरसा, मांस, किंवा फुलें यांचा लाभ; अथवा मोठ्या पाण्यांत तरणें; अशीं आपल्यासंबंधी कृत्यें स्वप्नांत पाहिलीं असतां त्यास द्रव्य मिळतें व तो रोगापासून मुक्त होतो. ४. स्वप्नांत ज्या मनुष्याच्या अंगास पू लागेल; अथवा जो पळसाच्या झाडावर, वारुळावर किंवा कडुनिंबाच्या ( लिंबड्याच्या ) झाडावर चढेल; अथवा ज्यास तेल, कापूस, पेंड किंवा लोखंड याचा लाभ होईल तो दरिद्री होईल. ५. ज्या मनुष्याचें स्वप्नांत लग्न होईल; जो तांबड्या फुलांच्या माळा किंवा तांबडें वस्त्र धारण करील; पुरांत वाहून जाईल; अथवा शिजविलेलें मांस खाईल त्यास अरिष्ट प्राप्त होईल. ६. **स्वप्ना-ध्यायांत**—रात्रीच्या पहिल्या प्रहरांत स्वप्न पाहिलें असतां एक वर्षानें त्याचें फळ

---

[1] तिळपिळून कुचा रहातो तो.

फलदः स्मृतः ॥ अरुणोदयवेलायां दशाहेन फलं भवेत् ॥ गोविसर्जनवेलायां सद्य एव फलं भवेत् ॥ ७ ॥ यस्तु पश्यति वै स्वप्ने राजानं कुंजरं हयं ॥ सुवर्णं वृषभं गां वा कुटुंबं तस्य वर्धते ॥ ८ ॥ आरोहणं गोवृषकुंजराणां प्रासादशैलाग्रवनस्पतीनाम् ॥ ९ ॥ विष्ठानुलेपो रुदितं मृतं वा स्वप्नेष्वगम्यागमनं च धन्यम् ॥ ९ ॥ क्षीरिणं फलिनं वृक्षमेकाकी योऽधिरोहति ॥ तत्रस्थः स विबुध्येत धनं शीघ्रमवाप्नुयात् ॥१०॥ यस्य श्वेतेन सर्पेण ग्रस्यते दक्षिणः करः ॥ सहस्रलाभस्तस्य स्यात्पूर्णे दशमे दिने ॥ ११ ॥ उरगोवृश्चिकोवापि जले ग्रसति यं नरम् ॥ विजयं चार्थसिद्धिं च पुत्रं तस्य विनिर्दिशेत् ॥१२॥ प्रासादं शैलमारुह्य समुद्रं तरते नरः ॥ अपि दासकुले जातो राजा भवति वै ध्रुवम् ॥ १३ ॥ यस्तु मध्ये तडागस्य भुंक्ते च घृतपायसम् ॥ अखंडे पुष्करे पत्रे तं विद्यात्पृथिवीपतिम् ॥

मिळेल, दुसऱ्या प्रहरांत पाहिलें असतां आठ महिन्यांनीं, तिसऱ्या प्रहरांत पाहिलें तर तीन महिन्यांनीं, चवथ्या प्रहरांत पाहिलें तर एक महिन्यानें, अरुणोदयसमयीं पाहिलें तर दहा दिवसांनीं आणि सूर्योदयकाळीं पाहिलें तर त्याचें फळ लागलेंच मिळेल. ७. जो मनुष्य स्वप्नांत राजा, हत्ती, घोडा, सोनें, बैल अथवा गाय पाहील त्याच्या कुटुंबाची वृद्धि होईल. ८. जो मनुष्य स्वप्नांत गाय, बैल, हत्ती, देऊळ, डोंगराचें शिखर किंवा झाड या वर बसेल; विष्ठेनें भरेल; रडेल; मरेल किंवा अयोग्य स्त्रीशीं मैथुन करील त्यास धन मिळेल. ९. जो मनुष्य स्वप्नांत चिकाळ्या झाडावर अथवा फळें आलेल्या झाडावर एकटा बसून तेथें असतांच जागा होईल त्यास लवकर धन मिळेल. १०. स्वप्नांत ज्या मनुष्याच्या उजव्या हातास पांढरा साप गिळील त्या मनुष्यास दहा दिवसांच्या आंत नेहमीच्या फायद्यापेक्षां हजारपट फायदा होईल. ११. स्वप्नांत ज्या मनुष्यास पाण्यांत साप अथवा विंचू चावेल त्यास विजय, संपत्ति व पुत्र यांचा लाभ होईल. १२. जो मनुष्य स्वप्नांत देवळावर अथवा डोंगरावर नावेसारखे बसून समुद्रांत तरेल तो नीच कुळांत जरी जन्मला असला तरी खचीत राजा होईल. १३. जो मनुष्य स्वप्नांत तळ्यांत कमळाच्या धडक्या पानावर तूप व खीर खाईल तो पृथ्वीचा राजा होईल; आणि

बलाकां कुक्कुटीं क्रौंचीं दृष्ट्वा यः प्रतिबुध्यति ॥ कुलजां लभते कन्यां भार्यां स प्रियवादिनीम् ॥ १४ ॥ निगडैर्बध्यते यस्तु बाहुपाशेन वा पुनः ॥ पुत्रो वा जायते तस्य धनं शीघ्रमवाप्नुयात् ॥ १५ ॥ आसने शयने याने शरीरे वाहने गृहे ॥ ज्वलमाने विबुध्येत तस्य श्रीः सर्वतोमुखी ॥ १६ ॥ आदित्यमंडलं स्वप्ने चंद्रं वा यदि पश्यति ॥ व्याधितो मुच्यते रोगादरोगी श्रियमाप्नुयात् ॥ १७ ॥ रुधिरं पिबति स्वप्ने सुरां वापि तथा नरः ॥ ब्राह्मणो लभते विद्यामितरो लभते धनम् ॥ १८ ॥ शुक्लांबरधरा नारी शुक्लगंधानुलेपना ॥ अवगूहति यं स्वप्ने श्रियं तस्य विनिर्दिशेत् ॥ १९ ॥ पादुकोपानहं छत्रं लब्ध्वा यः प्रतिबुध्यते ॥ असिं वा निर्मलं तीक्ष्णं साध्वन्नं तस्य निर्दिशेत् ॥ २० ॥ रथं गोवृषसंयुक्त मेकाकी यः प्ररोहति ॥ तत्रस्थः स विबुध्येत धनं शीघ्रमवाप्नुयात् ॥ २१ ॥

जो तळयांत बगळी, रानकोंबडी अथवा क्रौंचपक्षीण हिला पाहून लागलाच जागा होईल त्याचें प्रिय भाषण करणाऱ्या कुलीन मुलीशीं लग्न होईल. १४ जो मनुष्य स्वप्नामध्यें दोरीनें बांधला जातो अथवा हातानें आवळला जातो त्यास लवकर धन किंवा पुत्र प्राप्त होईल. १५. जो मनुष्य स्वप्नामध्यें आपलें आसन, शय्या, रथ, गाडी इत्यादि यान, शरीर, घोडा, पालखी इत्यादि वाहन अथवा घर जळत आहे असें पहात असतां जागा होईल त्यास विद्या, धन, अधिकार ( सत्ता ) व कीर्ति अशी चार प्रकारची संपत्ति प्राप्त होईल. १६. स्वप्नामध्यें जो मनुष्य सूर्यास किंवा चंद्रास पहातो तो रोगी असल्यास रोगापासून मुक्त होईल आणि निरोगी असल्यास त्यास संपत्ति प्राप्त होईल. १७. जो मनुष्य स्वप्नांत रक्त अथवा मद्य प्राशन करतो तो ब्राह्मण असल्यास विद्यावान होईल. ब्राह्मणाहून अन्य असल्यास धनवान होईल. १८. ज्या मनुष्यास स्वप्नामध्यें शुभ्र वस्त्र व शुभ्र चंदनाची उटी धारण केलेली स्त्री आलिंगन करते त्यास संपत्ति मिळेल. १९ स्वप्नांत ज्यास पादुका, जोडा, छत्री अथवा धारेची चकचकीत तरवार प्राप्त होऊन जो जागा होतो त्यास सुंदर अन्न मिळेल. २०. स्वप्नामध्यें जो मनुष्य गाय व बैल जोडलेल्या गाडींत एकटा बसून तेथें असतांच जागा होतो त्याला लवकर धन मिळेल. २१.

दधिलाभे भवेदर्थो घृतलाभे ध्रुवं यशः ॥ घृताशने ध्रुवः क्लेशो यशस्तु दधिभक्षणे ॥ २२ ॥ आंत्रैस्तु वेष्टितो यो वै नगरेपि गृहेपि वा ॥ गृहे मांडलिको राजा नगरे पार्थिवो भवेत् ॥ २३ ॥ मानुषाणि तु मांसानि स्वप्नांते यस्तु पश्यति॥ हरितानि तु पक्वानि शृणु तस्य च यत्फलम् ॥ २४ ॥ पद्भक्षणे शतं लाभः सहस्रं बाहुभक्षणे ॥ राज्यं शतसहस्रं वा भवेद्वै शीर्षभक्षणे ॥ २५ ॥ सर्वाणि शुक्लान्यतिशोभनानि कार्पास-भस्मौदनतक्रवर्जं ॥ सर्वाणि कृष्णान्यतिनिंदितानि गोहस्ति-देवद्विजवाजिवर्जम् ॥ २६ ॥ क्षीरं पिबति यः स्वप्ने सफेनं दोहने कृते ॥ सोमपानं भवेत्तस्य भुक्त्वा भोगानशेषतः ॥२७॥ दधि दृष्ट्वा भवेत्प्रीतिर्गोधूमैश्च धनागमः ॥ यवैर्यज्ञागमं विद्या-ल्लाजाः सर्वार्थसिद्धिदाः ॥ २८ ॥ नागपत्रं लभेत्स्वप्ने कर्पूरमगरुं तथा ॥ चंदनं पांडुरं पुष्पं तस्य श्रीः सर्वतो

स्वप्नांत मनुष्यास दहिं मिळालें असतां द्रव्य मिळतें व तूप मिळालें असतां अचल यश प्राप्त होतें, आणि तूप खाल्लें असतां दुःख प्राप्त होतें, व दहिं खाल्लें असतां यश प्राप्त होतें. २२. जो मनुष्य स्वप्नांत घरांत आंतड्यांनीं वेढला जाईल तो मांडलिक राजा होईल आणि जो शहरांत आंतड्यांनीं वेढला जाईल तो सार्वभौम राजा होईल. २३. जो मनुष्य स्वप्नांत जागें व्हावयाच्या सुमारास हिरवीं अथवा शिजविलेलीं मनुष्यांचीं मांसें आपण खातांना पहातो त्याचें जें फळ मिळेल तें ऐक. २४. पाय खाल्ला असतां नेहमीच्या लाभापेक्षां शंभरपट लाभ होतो. हात खाल्ला असतां हजारपट लाभ होतो. डोकें खाल्लें असतां राज्य प्राप्त होतें अथवा लाखपट लाभ होतो. २५. स्वप्नामध्यें पाहिलेले कापूस, राख, भात व ताक ह्यांवाचून सर्व शुभ्र पदार्थ हित-कारक होत; आणि गाय, हत्ती, देव, ब्राह्मण व घोडा ह्यांवाचून सर्व काळे पदार्थ अशुभकारक होत. २६. स्वप्नामध्यें जो ब्राह्मण दुध काढल्यावर तें फेसासकट पिईल त्यास सर्व उपभोग्य वस्तूंचा उपभोग झाल्यावर सोमपान ( सोमयज्ञकर्तृत्व ) प्राप्त होईल. २७. स्वप्नामध्यें दहीं पाहिलें असतां संतोष ( समाधान=स्वस्थता ) प्राप्त होतो. गहूं पाहिले असतां धन प्राप्त होतें. जव पाहिले असतां जाणतेपणा प्राप्त होतो, आणि लाह्या पाहिल्या असतां सर्व मनोरथांची सिद्धि होते. २८. ज्या मनुष्यास

सुखीति ॥ २९ ॥ शौनकः—अथ स्वप्नानि वक्ष्यंते दुर्निमित्ताद्भुतानि तु ॥ आदित्यं वाथ चंद्रं वा विगतच्छविकं तथा ॥ पतंतं वाथ नक्षत्रं तारकादींश्च मानवः ॥ यदि वीक्षेत वा स्वप्ने मरणे शोकमाप्नुयादिति ॥ ३० ॥ स्वप्नाध्याये—अशोकं करवीरं वा पलाशं वाथ पुष्पितं ॥ स्वप्नांते यस्तु पश्येत नरः शोकमवाप्नुयात् ॥ ३१ ॥ नावमारोहयेद्यस्तु नदीनां च समुत्तरे ॥ प्रवासं निर्दिशेत्तस्य शीघ्रं च पुनरागमम् ॥ ३२ ॥ रक्तांबरधरा नारी रक्तगंधानुलेपना ॥ अवगूहति यः स्वप्ने मृत्युं तस्य विनिर्दिशेत् ॥३३॥ तैलेनाभ्यक्तकायस्तु पयसा तु घृतेन वा ॥ स्नेहेन वा तथान्येन व्याधिं तस्य विनिर्दिशेत् ॥ ३४ ॥ केशा यस्य विशीर्यंते यदि दंताः पतंति वा ॥ अर्थनाशो भवेत्तस्य पुत्रो वा यदि नश्यति ॥३५॥ खरोष्ट्रमाहिषरथमेकाकी यः प्ररोहति ॥ तत्रस्थः स तु बुध्येत

स्वप्नांत नागवेलीचें पान, कापूर, अगरु, चंदन अथवा पांढरें फूल मिळेल त्यास विद्या, धन, अधिकार व यश अशा चार प्रकारची संपत्ति प्राप्त होईल. २९. **शौनक—** आतां उल्कापातासारखीं अद्भुत दुःसहनिमित्तभूत अशीं स्वप्नें सांगतों. जो मनुष्य स्वप्नांत सूर्य अथवा चंद्र निस्तेज आहे; अश्विन्यादि नक्षत्रें अथवा इतर तारा, ग्रह इत्यादि पडत आहेत; असें पहातो त्यास मरणनिमित्तक दुःख प्राप्त होतें. ३०. **स्वप्नाध्यायांत—**जो मनुष्य स्वप्नांत जागें होण्याच्या सुमारास अशोक, कण्हेर किंवा पळस हे वृक्ष फुललेले आहेत असें पहातो त्याला दुःख प्राप्त होतें. ३१. जो मनुष्य स्वप्नांत नदींतून तरून जावयाकरितां नावेंत बसेल त्यास प्रवास घडेल, परंतु तो पुन्हा परत लागलाच येईल. ३२. स्वप्नांत ज्या मनुष्यास तांबडें वस्त्र व तांबड्या गंधाची उटी लावलेली अशी स्त्री आलिंगन करील तो मरेल. ३३. जो मनुष्य स्वप्नांत तेलानें, दुधानें, तुपानें अथवा मेण, चर्बी इत्यादि इतर स्नेह पदार्थांनें नहातो त्यास रोग होईल असें समजावें. ३४. ज्या मनुष्याचे स्वप्नांत केश गळतील किंवा दांत पडतील त्याच्या द्रव्याचा अथवा पुत्र असला तर पुत्राचा नाश होईल. ३५. जो मनुष्य स्वप्नांत गाढव, उंट अथवा हेला ( रेडा ) जोडलेल्या गाडींत एकटा बसून तेथें असतांच जागा होतो, त्यास लवकर मृत्यु प्राप्त होईल. जो मनुष्य स्नप्नांत

मृत्युं शीघ्रमवाप्नुयात् ॥ कर्णनासाकरादीनां छेदनं पंकमज्जनम् ॥ पतनं दंतकेशानां पक्वमांसस्य भक्षणम् ॥ खरोष्ट्रमाहिषं यानं तैलाभ्यंगं च मृत्यव इति ॥ ३६ ॥

## इति रात्रिस्वप्नफलनिर्णयः

---

आपल्या शरीराच्या कान, नाक, हात इत्यादि अवयवांचें छेदन; चिखलांत बुडणें; दांत किंवा केस गळून पडणें; शिजविलेलें मांस खाणें, गाढवावर, उंटावर किंवा हेल्या ( रेड्या ) वर बसणें अथवा तेलानें नाहाणें अशी अवस्था पाहील तर तें स्वप्न त्याच्या मृत्यूस कारणभूत होईल. " साहजिकपणानें जें स्वप्न पडतें त्याचेंच फळ मिळतें. उत्तम स्वप्नाविषयीं अंतःकरणांत ध्यास धारण केल्यानें जें स्वप्न पडेल तें फळ देण्याविषयीं उपयोगी नाहीं असाच अर्थ ह्या स्वप्ननिर्णयांत विवक्षित आहे, म्हणून प्रायः जो अमुक स्वप्न पहातो त्यास अमुक फळ प्राप्त होईल, अशा हेतुविषयीं व्यस्त क्रियापदांनींच प्रत्येक श्लोकाचा अर्थ लिहिला आहे. "

याप्रमाणें रात्रीं ( पडलेल्या ) स्वप्नाच्या फळाचा निर्णय ( सांगितला ).

---

## अथ दुःस्वप्नशांतिः

शौनकः—एवमादीनि चान्यानि श्रुत्युक्तानि बहून्यपि ॥ स्वप्नोत्पातानि चैतेषां कालरात्र्यधिदेवता ॥ पूजाविधानं

## दुष्ट स्वप्नांची शांति.

शौनक—ह्या प्रकारचीं आणखीहि सांगितलेलीं अरिष्टकारक पुष्कळ स्वप्नें आहेत. ह्या स्वप्नांची कालरात्री नांवाची मुख्य देवता आहे. अरिष्टकारक स्वप्नांच्या शांतिविषयीं ह्या देवतेचें पूजाविधान पूर्वीं सांगितलें आहे. त्याप्रमाणें ज्याला दुष्ट स्वप्न पडलें असेल त्यानें करावें, परंतु त्यांतहि विशेषतः चांगल्या आचरणांचे व वेद-

पूर्वोक्तं कुर्यादत्रापि यत्नतः ॥ ब्राह्मणान्भोजयेच्छक्त्या सुशीलान्वेदपारगानिति ॥ १ ॥

इति दुःस्वप्नशांतिः

---

पारंगत अशा ब्राह्मणांस प्रयत्नानें आपल्या सामर्थ्यानुरूप भोजन घालावें, म्हणजे दुष्ट स्वप्नापासून होणाऱ्या अरिष्टाची शांति होईल. १.

याप्रमाणें दुष्ट स्वप्नांची शांति ( सांगितली ).

---

## अथ यज्ञोपवीतधारणविधिः

विष्णुः—कार्पासक्षौमगोवालशणवल्कतृणादिकम् ॥ यथासंभवतो धार्यमुपवीतं द्विजातिभिः ॥ १ ॥ शुचौ देशे शुचिः सूत्रं संहतांगुलिमूलके ॥ आवेष्ट्य षण्णवत्या तत्त्रिगुणीकृत्य यत्नतः ॥ अब्लिंगकैश्च मंत्रैस्तत्प्रक्षाल्योर्ध्ववृतं कृतम् ॥ पुनस्तत्त्रिगुणीकृत्य नवसूत्र मधोवृतम् ॥ अप्रदक्षिणमावृत्तं सावित्र्या त्रिगुणीकृतम् ॥ त्रिरावेष्ट्य दृढं कृत्वा हरि

## यज्ञोपवीत[1] धारण करण्याचा विधि.

विष्णु--ब्राह्मणानें कापूस, जवस, गोवाल, ताग, घायपात, गवत इत्यादि पवित्र औषधींच्या सुताचें यथाविधि केलेलें यज्ञोपवीत एकाच्या अभावीं दुसरें असें धारण करावें. १. ब्राह्मणानें शुचिर्भूत असतां पवित्र स्थळीं कापसाचें उजवा पीळ देऊन काढलेलें सूत तुटूं न देतां उजव्या हाताच्या जुळलेल्या कनिष्ठिकादिक चार अंगुळींच्या मूळभागीं शाण्णव वेढे गुंडाळून तें त्या गुंडाळलेल्या वेढ्यांच्या अखंड तीनपट करावें. ह्या तिसुतीस ‘ आपोहिष्ठा ’ इत्यादि मंत्रांनीं उदकांत प्रक्षालन करून डावा पीळ द्यावा. ही डावा पीळ देऊन तयार झालेली तिसुती गायत्रीमंत्रानें त्रिपदरी करावी. एकंदर अखंड नवसुती झाल्यावर तिला पुन्हा उजवा पीळ द्यावा.

---

[1] जानवें घालण्याचा विधि.

ब्रह्मेश्वरान्नमेत् ॥ एवं कृत्वोपवीतं स्यात्तस्यैको ग्रंथिरिष्यत इति ॥ २ ॥ देवलः—ग्रंथेश्च नवसूत्रस्य वक्ष्यंते देवताः क्रमात् ॥ ओंकारोग्निस्तथा नागः सोमः पितृप्रजापती ॥ वायुः सूर्यश्च विश्वे च इत्येता नव तंतवः ॥ रुद्रेण दीयते ग्रंथिः सावित्र्या चाभिमंत्रितम् ॥ तद्धार्यमुपवीतं स्यान्नातिलंबं न चोच्छ्रितम् ॥ सावित्र्या दशकृत्वोद्भिर्मंत्रिताभिस्तदुक्षयेत् ॥ ३ ॥ ब्रह्मचारिण एकं स्यात्स्नातके द्वे बहूनि वा ॥ यज्ञोपवीतं परममिति मंत्रेण धारयेत् ॥ बहूनां धारणे तत्र प्रत्येकं मंत्र इष्यत इति ॥ ४ ॥ पारिजाते—मासत्रयांते संत्याज्यमुपवीतं सदा द्विजैः ॥ उपाकर्मणि चोत्सर्गे चाशौचांते च सर्वदा ॥ ५ ॥ यज्ञोपवीतं विप्रस्तु स्कंधेनैव च धारयेत् ॥ गंधादिपूजनार्थं

अशी सिद्ध झालेली नवसुती विष्णु, ब्रह्मदेव व महादेव ह्यांस नमस्कार करून गुडघ्यांवर तीन वेढे होतील अशी गुंडाळावी, आणि ते तीन वेढे सारखे करून त्या नवसुतीचीं दोनहि अग्रें ( टोकें ) एकत्र करून त्यांस तीं अग्रें व ते तीनहि वेढे बाहेर न राहतील अशी एकच बळकट गांठ द्यावी. असें केलें असतां यज्ञोपवीत होतें. २. देवल-- यज्ञोपवीताच्या अखंड सुतांच्या नऊ पदरांच्या नऊ देवता व गांठीची देवता अशा दहा देवता क्रमानें सांगतो. द्विजानें ओंकार, अग्नि, नाग, सोम, पितर, प्रजापति, वायु, सूर्य, आणि विश्वेदेव ह्या देवता सुताच्या नऊ पदरांच्या आश्रयीभूत कराव्या. त्या सुतास 'त्र्यंबकं' ह्या रुद्रमंत्रानें गांठ द्यावी; आणि गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित करावें. फार लांब व आखूड नाहीं असें हें तयार झालेलें यज्ञोपवीत धारण करावयास योग्य होय. त्या यज्ञोपवीतास दहादा गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित केलेल्या उदकांनीं प्रोक्षण करावें. ३. असें यज्ञोपवित ब्रह्मचाऱ्यानें एक व गृहस्थानें दोन अथवा तीन 'यज्ञोपवीतं परमं' ह्या मंत्रानें धारण करावीं. त्यांत अनेक यज्ञोपवीतें धारण कर्तव्य असतां प्रत्येक यज्ञोपवीतास पृथक् पृथक् मंत्र म्हटला पाहिजे. ४. पारिजातांत—नेहमीं द्विजानें यज्ञोपवीत घालून तीन महिने झाल्यावर, उपाकर्म झाल्यावर, उत्सर्जन झाल्यावर अथवा आशौचाची निवृत्ति झाल्यावर नवीन यज्ञोपवीत धारण करून जुनें टाकावें. ५. ब्राह्मणानें यजमानकर्तृक दैवकर्मांत व पैतृककर्मांत गंधादिपूजा ग्रहण कर्तव्य असतांहि यज्ञोपवीत निवीत न करतां खांद्यावरच

च दैवे पित्र्ये च कर्मणि ॥ कंठे कृत्वोपवीतं तु कुर्याद्गंधानुलेपनमिति ॥ ६ ॥ हारीतः—मंत्रन्यस्तोपवीतं यद्विनाभ्यंगं न चोध्दरेत् ॥ त्रुटितं वा यदि भ्रष्टं पुनर्मंत्रेण धारयेत् ॥ नवीनं धारयेद्विप्रो न जीर्णं न परैर्धृतमिति ॥७॥ मनुः—मंत्रेण धारणं कार्यं मंत्रेणैव विसर्जनमिति ॥ ८ ॥

## इति यज्ञोपवीतधारणविधिः

---

धारण करावें. क्रीडादिनिमित्तक मात्र गंधाची उटी अंगास लावावयाची असल्यास यज्ञोपवीताचें निवीत करून लावावी. ६. " अभ्यंग करावयाचें असतां निवीत करण्यास मात्र डाव्या खांद्यावरून यज्ञोपवीत काढावें अन्य लौकिक कार्याकरितां काढूं नये असें सांगतो. " हारीत—ब्राह्मणानें समंत्रक घातलेलें यज्ञोपवीत अभ्यंग स्नानावाचून लौकिक कार्याकरितां डाव्या खांद्यावरून काढूं नये. जर तुटलें अथवा खांद्याखालीं पडलें तर पुन्हा नवीन समंत्रक धारण करावें. एकदा घालून आशौचादि निमित्तानें काढलेलें असें जुनें व इतर द्विजानें घातलेलें असें मात्र यज्ञोपवीत कधींहि घालूं नये. ७. ब्राह्मणानें यज्ञोपवीताचें मंत्रानें धारण करावें, आणि मंत्रानेंच विसर्जन करावें. ८.

यांप्रमाणें यज्ञोपवीत धारण करण्याचा विधि ( सांगितला ).

---

## अथ यज्ञोपवीतधारणम्.

ओंश्री केशवाय नमः० ओंश्रीकृष्णाय नमः ॥ ओंभूः० स्वरोम् ॥ मम श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानफलसिध्यर्थं यज्ञोपवीत-

## यज्ञोपवीतधारण.[1]

ओंश्री--आचमन करून प्राणायाम करावा. मम--माझ्या वेदस्मृतिप्रणीत-कर्मकर्तृत्वाच्या फलप्राप्तीकरितां मी यज्ञोपवीताचें धारण व धारणाकरितां त्याचा

---

१ यज्ञोपवीत ( जानवें ) घालणें.

धारणं तदंगतत्संस्कारं च करिष्ये ॥ १ ॥ आपोहिष्ठेति त्र्यृचस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोगायत्री ॥ त्रिसूत्रीप्रक्षालने विनियोगः ॥ २ ॥ आमापोहिष्ठामयो भुवस्तानऊर्जे दधातन ॥ महेरणायचक्षसे ॥ योवः शिवतमोरसस्तस्य भाजयतेहनः ॥ उशतीरिव मातरः ॥ तस्माऽअरंग मामवो यस्य क्षयाय जिन्वथ ॥ आपो जनयथाचनः ॥ ३ ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ नवसूत्रीकरणे विनियोगः ॥ ओंतत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ॥ धियोयोनः प्रचोदयात् ॥ ४ ॥ ओंश्रीहरिब्रह्मेश्वरेभ्योनमः ॥ ५ ॥ त्र्यंबकमिति वसिष्ठोरुद्रोऽनुष्टुप् ॥ ग्रंथिकरणे विनियोगः ॥ ओंत्र्यंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं ॥ उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीयमामृतात् ॥ ६ ॥ गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ यज्ञोपवीताभिमंत्रणे विनियोगः ॥ ओं तत्स० यात् ॥ ७ ॥ ओंकारं प्रथमतंतौ न्यसामि ॥ अग्निं द्वितीयतंतौ न्यसामि ॥ नागान्तृतीयतंतौ न्यसामि ॥ सोमं चतुर्थतंतौ न्यसामि ॥ पितॄन्पंचमतंतौ न्यसामि ॥ प्रजापतिं षष्ठतंतौ न्यसामि ॥ वायुं सप्तमतंतौ न्यसामि ॥ सूर्यमष्टमतंतौ न्यसामि ॥ विश्वान्देवान्नवमतंतौ न्यसासि ॥८॥ गायत्र्या० गायत्री ॥ यज्ञोपवीतोक्षणे विनियोगः ॥ ओंतत्स० यात् ॥ ९ ॥ यज्ञोपवीतमितिमंत्रस्य ब्रह्मा वेदास्त्रिष्टुप् ॥ यज्ञोपवीतधारणे विनियोगः ॥ १० ॥ ओं यज्ञोपवीतं परमं पवित्रं प्रजापतेर्यत्सहजं पुरस्तात् ॥ आयुष्यमग्र्यं

त्यावर देवता सांनिध्यकरणरूप संस्कार करतो. १. पूर्व प्रकरणांत अर्थ लिहिला आहे. २–३–४–५–६–७–८–९. या मंत्राचा ब्रह्मदेवऋषि, वेददेवता, त्रिष्टुपछंद व यज्ञोपवीतधारणाकडे उपयोग. १०. "यज्ञोपवीत धारणकरणारा द्विज यज्ञोपवीताभिमानि दैवताची वर्णनपूर्वक प्रार्थना करतो". 'यत्' म्हणजे जें 'यज्ञोपवीतं' संध्या, देवपूजा, ब्रह्मयज्ञ, अग्निहोत्र इत्यादि सर्व यज्ञांच्या कर्तृत्वाविषयीं अधिकार देणारें; 'परमं पवित्रं' शुद्धीविषयीं साधनभूत अशा कुश मुंजादि सर्व पदार्थांपेक्षांहि श्रेष्ठ; आणि 'पुरस्तात्' पूर्वीं 'प्रजापतेः सहजं' ब्रह्मदेवाच्या उत्पत्तिसमकालीं

प्रतिमुंच शुभ्रं यज्ञोपवीतं बलमस्तु तेजः ॥ ११ ॥ ओं श्रीकेशवाय नमः० ओं श्रीकृष्णाय नमः ओं भूः० स्वरोम् ॥ ओं भूर्भुवः स्वः समुद्रं गच्छ स्वाहा ॥ १२ ॥

## इति यज्ञोपवीतधारणम्

---

उत्पन्न झालेलें असें ' यज्ञोपवीतं ' यज्ञोपवीताभिमानि दैवत आहे तेंच माझें ' बलं तेजः अस्तु ' सामर्थ्य व वीर्य होय. तस्मात् हे यज्ञोपवीताभिमानि देवता, तूं मला ' आयुष्यं ' शतवर्षप्रमाण जीवित्व, ' अग्र्यं ' नित्यनैमित्तिक कर्मकर्तृत्वद्वारा अतिशयित प्राधान्य आणि ' शुभ्रं ' उपनिषदादि वेदांताच्या अत्यंत परिचयद्वारा ब्रह्मज्ञान असें ' प्रतिमुंच ' संमुख होतसातें हो. ११. ओंश्री--आचमन करून प्राणायाम करावा. असें ओंभूः—व्याहृतींचा अर्थ पूर्वीं लिहिला आहे. समुद्रं गच्छ--हे जीर्ण यज्ञोपवीता, तूं समुद्राला जा. स्वाहा--यज्ञोपवीताभिमानि देवतेच्या प्रीतिकरितां हाच माझा यज्ञ असो. १२.

याप्रमाणें यज्ञोपवीतधारण ( सांगितलें ).

---

## अथ आचारोपयुक्तस्फुटसंग्रहः

बौधायनः—नित्यं शुद्धः कारुहस्तः पण्यं यच्च प्रसारितं ॥
ब्रह्मचारिगतं भैक्ष्यं नित्यं शुद्धमिति श्रुतिः ॥ १ ॥ आकराः

## आचारास उपयोगी पडणाऱ्या स्फुट ( स्पष्ट ) श्लोकांचा संग्रह.

बौधायन—सुतार, लोहार, साळी, शिंपी इत्यादि कारागिरांनीं सिद्ध केलेला ग्राह्य पदार्थ प्रक्षालनादि शुद्धि केल्यावाचूनहि नेहमीं शुद्ध होय. व्यापाऱ्यानें धान्यें, फळें, तेल, तूप इत्यादि कोणताहि विकावयास उघडा करून ठेवलेला पदार्थ अनेक मनुष्यांच्या हस्तस्पर्शानें दूषित झाला तरी तो घ्यावयास शुद्ध होय; आणि ब्रह्मचाऱ्यानें अनेक गृहस्थांकडून शुद्ध रीतीनें मार्ग चालूनहि आणलेलें भिक्षान्न भक्षण करावयास सर्वदा शुद्ध आहे; असा वेदाचा अभिप्राय आहे. १. मद्याची

शुचयः सर्वे वर्जयित्वा सुराकरम् ॥ अदूष्या संतता धारा वातोध्दूताश्च रेणवः ॥ २ ॥ अमेध्येषु च ये वृक्षा उप्ताः पुष्पफलोपगाः ॥ तेषामपि न दुष्यंति पुष्पाणि च फलानि च ॥३॥ आत्मशय्यासनं वस्त्रं जायापत्यं कमंडलुः ॥ आत्मनः शुचिरेतानि परेषामशुचीनि तु ॥ ४ ॥ आसनं शयनं यानं नावा पथतृणानि च ॥ श्वचांडालतः स्पष्टं मारुतेनैव शुध्यतीति ॥५॥ अंगिराः—बहूनां संहतानां च यद्येकोप्यशुचिर्भवेत् ॥ तस्य मात्रस्य तच्छौचं नेतरेषां कदाचनेति ॥ ६ ॥ शातातपः—अशुचिं स्पृशते यस्तु एक एव स दुष्यति ॥ तं स्पृष्ट्वान्योन दुष्येत सर्वद्रव्येष्वयं विधिरिति ॥ ७ ॥ चतुर्विंशतिमतं—

वखार खेरीज करून ज्यांत अनेक वस्तु साठविल्या आहेत अशा सर्व वखारी, त्यांत ग्राह्य वस्तु घेण्याकरितां प्रवेश करावयास शुद्ध होत. ज्या पदार्थांतून निघालेली उदकादिकांची संतत (सबंध) धार अस्पर्शनीय वस्तूस लागली असतां धारेच्या संबंधानें तो पदार्थ अस्पर्शनीय होत नाहीं. वायूनें उडालेले रजःकण शुद्ध होत. २. मलमांसादिसंपर्कयुक्त अपवित्र जागेंत फुलझाडें व फळझाडें लाविलीं असतां त्यांचीं फुलें व फळें घेण्यास हरकत नाहीं. ३. शरीर, शय्या, दर्भादि आसन, परिधानीय (नेसण्याचें) वस्त्र, भार्या, पुत्रपौत्रादि अपत्य आणि संन्याशाचा कमंडलु हे पदार्थ आपआपल्या कार्याविषयीं ज्याचे त्यासच शुद्ध होत, व दुसऱ्याचे अशुद्ध होत. ४ धुण्यास योग्य नाहीं असें रुजामा, जाहाजीम इत्यादि प्रकारचें बसणें, गादी उशी इत्यादि प्रकारचा बिछाना, रथ पालखी इत्यादि प्रकारचें वाहन, नौका, संकुचित मार्ग, आणि दर्भमुंजादि तृण ह्या पदार्थांस कुत्र्याचा अथवा चांडाळाचा स्पर्श झाला असतां तें वायूनेंच शुद्ध होतात. ५. अंगिरा—बहुत मनुष्यांच्या समुदायामध्यें जर मलमूत्रादि निंद्य पदार्थानें एखादा मनुष्य अशुचि होईल तर तन्निमित्तकस्नानादि शुचिकर्म त्या एकट्यानेंच करावें, त्याचा इतरांस कांहीएक संबंध नाहीं. ६. शातातप—रजस्वला, चांडाल, मळ, अस्थि अशा प्रकारच्या अशुद्ध पदार्थाचा ज्या ब्राह्मणास स्पर्श होईल तो एकटाच स्पर्शनिमित्तक दोषाचा अधिकारी होतो. त्यानेंच स्नानादि शुद्धि केली पाहिजे, परंतु त्याचा स्नानाच्या पूर्वीं दुसऱ्या ब्राह्मणास स्पर्श झाला असतां तो दोषी होत नाहीं अर्थातच त्यास स्नान करावयाचेंहि कारण नाहीं. तसेंच धान्य,

कंदमूलफलादीनि अज्ञातानि च भक्षयेत्॥ उपवासो भवेत्तत्र पाराशर्यवचोयथेति ॥ ८ ॥ अत्रिः—मक्षिका संतता धारा भूमिस्तोयं हुताशनः ॥ मार्जारश्चैव दर्वी च नकुलश्च सदा शुचिरिति ॥ ९ ॥ लिखितः—धान्यं फलं घृतं क्षौद्रं स्नेहाश्च फलसंभवाः ॥ अंत्यभांडस्थिता ह्येते निष्क्रांताः शुचयः स्मृता इति ॥ १० ॥

## इत्याचारोपयुक्तस्फुटसंग्रहः

---

फळ, इत्यादि कोणत्याहि द्रव्यास अशुचि पदार्थाचा स्पर्श झाला असतां तेवढेंच दूषित होतें, परंतु त्यास लागलेलें अन्य द्रव्य दूषित नाहीं. ७. **चतुर्विंशतिमतांत**—कोणत्याही अनोळखी औषधीचा कंद, मूळ, फळ इत्यादि प्रकारचा पदार्थ भक्षण करावा. तो भक्षण केला असतां उपवास मोडत नाहीं असें व्यासाचें वचन आहे. ८. **अत्रि**—माशी, अविच्छिन्न धार, भूमि, नदी विहीर इत्यादिकांतलें उदक, अग्नि, मांजर, बिजूं ( काळमांजर ) आणि मुंगूस हे पदार्थ नेहमीं शुद्ध आहेत. म्हणजे ह्या पदार्थांस अशुचि वस्तूचा स्पर्श झाला तरी हे अशुद्ध होत नाहींत. ९. **लिखित**—धान्य, फळ, तूप, मध आणि तीळ करडई इत्यादि फळांचीं तेलें हे पदार्थ चांडाळाच्या भांड्यांत असलेले अथवा चामर्डे इत्यादिकांच्या अग्राह्य भांड्यांत असलेले त्यांतून काढले असतां शुद्ध होतात. असें धर्मशास्त्र आहे.

**याप्रमाणें आचारास उपयोगी अशा स्फुट श्लोकांचा संग्रह ( समाप्त झाला ).**

---

**आह्निककर्मप्रकाश ( मराठी भाषांतरासहित )**

**समाप्त.**

---

# परिशिष्ट.

## आह्निक विधींतील कृत्यांची यादी.

१ वेदकालीनः—१ अग्नि, सूर्य, इंद्र, वरुण, प्रजापति, रुद्र, इत्यादि देवतांच्या स्तुति.

२ गृह्यसूत्रकालीनः—१ प्रातःसंध्योपासन, २ प्रातर्होम, ३ पंचमहायज्ञ, ४ सायंसंध्योपासन, ५ सायंहोम.

३ स्मृतिकालीन व अर्वाचीन*—१ प्रातःस्मरण, २ अजपाजप, ३ शौचविधि, ४ आचमन, ५ पवित्रधारण, ६ प्रातःस्नान, ७ वस्त्रधारण, ८ तिलकविधि, ९ प्रातःसंध्या, १० प्रातर्होम, ११ नित्यदानविधि, १२ देवपूजा, १३ वेदाभ्यास, १४ धनसंपादन, १५ मध्याह्नस्नान, १६ मध्याह्नसंध्या, १७ ब्रह्मयज्ञ व तर्पण, १८ वैश्वदेव व बलिहरण, १९ भिक्षादान, २० देवतानैवेद्य, २१ दिवाभोजन (अतिथीसह), २२ तांबूलविधि, २३ सायंसंध्या, २४ दीपविधि, २५ सायंहोम, २६ रात्रिभोजन, २७ स्वापादिविधि.

——

* प्रातःस्नान, वेदाध्ययन, धनसंपादन, दिवाभोजन, रात्रिभोजन वगैरे विधि सर्वांस आवश्यक आहेत व होते, व ते स्मृतिकालाच्या पूर्वीही करीत असत; मात्र इतकेंच कीं त्यावेळीं त्यांना आह्निक विधींचें विशेष स्वरूप धर्मग्रंथांत दिलें नव्हतें.

## पारिभाषिक शब्दांचे अर्थ.

विशिष्ट पारिभाषिक शब्दांचे अर्थ ज्या त्या ठिकाणीं दिले आहेत. त्या शिवायचे कठिण शब्द खालीं लिहिल्याप्रमाणें—

अघमर्षण—पापाचें दूरीकरण.

आह्निकविधि—दररोजचीं धार्मिक कृत्यें.

उपस्थान—प्रार्थना.

औपासनविधि—गृह्याग्नीवर करावयाचें स्मार्तकर्म.

गृह्याग्नि—विवाह समयीं घेतलेला अग्नि.

तर्पण—देव पितर इत्यादींस जलदान.

त्रिसुपर्ण—तीन चांगलीं पानें; भोजनापूर्वीं म्हणावयाचे मंत्र; या मंत्रात तीन प्रकार आहेत; म्हणून त्यास त्रिसुपर्ण म्हणतात.

त्रेताग्नि—अग्निहोत्र्याचे तीन अग्नि ( गार्हपत्य, दक्षिण, आहवनीय ).

नैमित्तिककर्म—प्रसंग विशेषीं करावयाचें.

न्यास—मंत्रांनीं देव इत्यादींचीं शरीरावयवावर स्थापना करणें.

पंचमहायज्ञ—पांच मोठे यज्ञ.

ब्राह्म मुहूर्त—रात्रीचा शेवटचा प्रहर.

संध्याविधि—प्रातःकाळ, मध्याह्नकाळ व सायंकाळ. या वेळीं करावयाचें धार्मिक कृत्य.

सौर—सूर्याचें स्तोत्र.

स्वापविधि—झोंप घेण्याचा विधि.



# सूचिपत्र.



## (१) वेदमंत्रांचें—

( कौंसांतील आंकडे ऋग्वेदांतील अष्टक, अध्याय व वर्गाचे, तसेंच तैत्तिरीय संहितेंतील कांड, प्रपाठक व अनुवाकाचे आहेत. )

## न.

## ( २ ) उपयुक्तवचनांचें.

अ.